# सावरकर-काव्य-समालोचन

संपादक

**वासुदेव गोविंद मायदेव**

मूल्य २ रुपये

प्रथमावृत्ति
२८ मे १९४३

प्रकाशक
केशव भिकाजी ढवळे
श्रीसमर्थसदन, बनाम हॉल लेन, गिरगांव, मुंबई.

मुद्रक
विठ्ठल हरि बर्वे
आर्यभूषण प्रेस, ९१५।१ शिवाजीनगर, पुणें ४.

# प्रस्तावना



गेल्या वर्षी डिसेंबरांत मला सावरकरभक्त असे कांहीं तरुण भेटले व त्यांनीं बोलतां बोलतां आपण सावरकरांचें काव्य त्यांच्या ६० व्या वाढदिवसाचे निमित्तानें प्रसिद्ध करणार आहोंत असें सांगितलें. तें ऐकून मीं त्यांना उत्तेजन दिलें व या काव्याचे प्रकाशनाबरोबरच त्यांचे काव्याचे समालोचनपर असा एक लहानसा ग्रंथही त्यांनीं प्रसिद्ध करावा असें सुचविलें. समालोचनपर ग्रंथ बऱ्याच मंडळींच्या साहाय्यानें निर्माण होणार असल्यामुळें व तितक्या त्यांच्या ओळखी नसल्यामुळें हें काव्य-समालोचन करवून घेण्याच्या बाबतींत मींच पुढाकार घ्यावा असें उलट त्यांनीं मला सुचविलें. समालोचनपर ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें काम कोणींही केलें तरी आरंभीं सावरकरांच्या काव्यनिर्मितीची स्पष्ट कल्पना होणें जरूर होतें. म्हणून फुरसतीचा वेळ मी मिळेल तेवढें सावरकर-वाङ्मय वाचण्यांत घालवूं लागलों. त्याच्या टिपणी करून त्यांच्या काव्यलेखनाच्या इतिहासाची संगति लावूं लागलों. ती नीट लागेना. तेव्हां विनायकरावांना भेटल्याशिवाय त्याची संगति लागणार नाहीं असें वाटून खुद्द विनायकरावांना पांचसहादां भेटून त्यांच्या काव्यनिर्मितीचा संगतवार इतिहास लिहून त्यांना दाखविला. तो बरोबर आहे असें त्यांच्याकडून समजतांच कोण कोण स्नेही अशा कार्यांत पुढाकार घेतील व मदत करतील हें पाहूं लागलों. पुढाकार तर कोणीच घेईना, परंतु मदतीचीं आश्वासनें पुष्कळांनीं दिलीं. या सुमारास त्यांची कविताही मींच प्रसिद्ध करावी असें ठरवलें गेल्यामुळें कवितेच्या जुळवाजुळवींत माझा फार वेळ गेला. परंतु एक गोष्ट झाली कीं, समालोचनग्रंथाचे लेखनांत भाग घेणाऱ्या प्रत्येक लेखकास मात्र जरूर ते ग्रंथ, कविता व निर्मितीचा इतिहास पोंचवतां आला.

हें सर्व करितांना थोडी धावपळ झाली. कांहीं लेखकांची थोडीफार गैरसोयही झाली. मीं विनंति केल्यापैकीं कांहीं स्नेह्यांचा घरगुती अडचणी वगैरे कारणांनीं नाइलाज झाला. तथापि इतर लेखकांनीं अत्यंत अल्प काळांत व व्यवसायव्यग्रतेंत असतांही आपलें आश्वासन पुरें केलें व त्यामुळेंच हा संकल्पित ग्रंथ अशा दृश्य-स्वरूपांत मी वाचकांस सादर करूं शकलों आहें. आणि म्हणून माझे स्नेही

प्रो. वसंतराव नाईक, श्री. दा. ना. आपटे, श्री. अ. का. प्रियोळकर, प्रो. जोग, कवि साधुदास, श्री. बाळशास्त्री हरदास, प्रो. केळकर, प्रो. कानेटकर, प्रो. खानवेलकर, श्री. काणेकर, श्री. य. न. केळकर, व श्री. ना. ग. जोशी यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच होणार आहेत.

सावरकर-व्यक्ति व सावरकर-काव्य या भिन्न गोष्टी. सावरकरांबद्दल प्रत्येक लेखकाला व्यक्तिशः आदर असला तरी त्यांची काव्यकृति प्रत्येकास पूर्णतया सरस वाटेल असें नाहीं. काव्य हें भाषा, कला व रस यांच्या कसोटी लावून परीक्षणें इष्ट होय. काव्यगुणांत काव्यकृति कमी ठरली तरी विनायकरावांचे विभूति-मत्त्वाला ती बाध आणूं शकणार नाहीं. बरे, काव्यगुणांत ती सरस ठरल्यास दुधांत साखरेसारखें होईल. अभ्यास करणारांचे दृष्टीनें अंधभक्ति ही युक्त नसून यथार्थ ज्ञान हें महत्त्वाचें आहे. वरील सर्व लेखक व्यासंगी असल्यामुळें त्यांचे लेखांचा सावरकरांच्या प्रकाशित व उपलब्ध अशा काव्याच्या यथार्थ ज्ञानास उपयोग होईल. तो तसा होत आहे किंवा कसें हें विद्वान् ठरवतीलच.

मला वाटतें, या लहानशा ग्रंथाच्या रूपरेषेचें केलें एवढें दिग्दर्शन पुरे आहे. या ग्रंथाचे संपादनाचा मान जरी माझेकडे असला तरी संकल्पित दिवशीं तो प्रसिद्ध होऊं देण्याचें सर्व श्रेय वरील व्यासंगी लेखकांकडे व मुद्रक रा. विठ्ठलराव बर्वे, प्रकाशक रा. केशव भिकाजी ढवळे व माझे कष्टाळू साहाय्यक मित्र हरि सखाराम गोखले यांचेकडे आहे, हें कृतज्ञतापूर्वक सांगून ही प्रस्तावना संपवितों.

पुणें, २८ मे १९४३. वा. गो. मायदेव

# सावरकर-काव्य-समालोचन

## अनुक्रम

# सावरकरांची कविता

स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या गेल्या ५० वर्षांतील

स्फुट कवनांचा संग्रह

संपादक

वासुदेव गोविंद मायदेव

मूल्य २ रुपये

प्रकाशक

केशव भिकाजी ढवळे

*श्रीसमर्थसदन, बनाम हॉल लेन, गिरगांव, मुंबई.*

# सावरकर-काव्यसमालोचन

## सावरकरांच्या काव्यनिर्मितीचा इतिहास

### प्रो० वासुदेव गोविंद मायदेव, एम्. ए.

विनायकराव सावरकर यांचा जन्म १८८३ मध्यें, मे महिन्यांत, सोमवार तारीख २८ रोजीं नाशिक जिल्ह्यांतील भगूर गांवीं झाला. विनायकरावांच्या आईचें नांव राधाबाई व वडिलांचें नांव दामोदरपंत होय. त्यांचें घराणें चित्पावन ब्राह्मण ज्ञातीचें व अत्यंत कुलीन म्हणून नांवाजलेलें होतें. त्यांच्या पूर्वजांनीं पेशवाईमध्यें एक लहानशी जहागीर स्वपराक्रमानें संपादन केली होती. दामोदरपंतांना अपत्यें चार, गणेशपंत ऊर्फ बाबा, विनायकराव ऊर्फ तात्या, मैनाबाई व सर्वांत धाकटे नारायणराव. दामोदरपंत हे अतिशय धार्मिक, सदाचरणी व विद्वान् गृहस्थ होते. त्यांचें मॅट्रिकपावेतों इंग्रजी शिक्षण झालें होतें. ते प्रतिभासंपन्न कवि होते. विनायकरावांचे मामा रा. गोविंदपंत मनोहर यांनाही काव्यरचनेचा नाद होता. त्यांची कविता बहुतांशीं प्रासंगिक असली तरी तिच्यांत शब्दसौष्ठवाचा गुण असे. तेव्हां विनायकरावांत काव्यगुण हा मातृवंश व पितृवंश या दोहोंकडचा वारसा आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

विनायकरावांचे आईचे आईला गजगौरीव्रतासारखीं जुनीं आख्यानें पाठ येत असत. लहानपणीं विनायकराव तीं ऐकत बसत व त्यामुळें त्यांतील भावनापूर्ण उद्गारांनीं त्यांचें हृदय कितीदां तरी उचंबळून येत असे.

विनायकराव पांच सहा वर्षांचे असतील नसतील तोंच त्यांचे वडिलांनीं त्यांस मोरोपंतांच्या कांहीं आर्या शिकविण्यास प्रारंभ केला व संशयरत्नमाला नी कर्णार्जुन-युद्धांसारखीं प्रकरणें नीट समजावून देऊन पंतांच्या काव्याची गोडी विनायकरावांचे मनांत लहानपणींच उत्पन्न केली.

विनायकराव सातआठ वर्षांचे असतील तेव्हां घरांत वाचल्या जाणाऱ्या

रामविजय, हरिविजय, भक्तिविजय, पांडवप्रताप व जैमिनी अश्वमेध या ग्रंथांतील कथांकडे त्यांचें लक्ष वेधलें. हळूहळू त्यांनीं ते ग्रंथ वाचले व साहजिकच श्रीधर-महिपतीसारख्या रसाळ कवींशीं त्यांचा परिचय होऊं लागला. या सुमारास वामन-पंडितांचीं कांहीं आख्यानें वडिलांनीं त्यांस शिकवलीं. घरीं शुचिर्भूत व गंभीर अशा वातावरणांत सप्तशतीचा पाठ नेहमींच चालत असे. भामिनी-विलासांतील कांहीं श्लोक त्यांचे कानावरून जात. या योगानें समजलें नाहीं तरी संस्कृत प्रौढ रचनेची गोडी त्यांचे कानांना आनंदवूं लागली होती. या वयांतच नवनीत हें पुस्तक त्यांच्या हातीं पडलें. तें तर कितीदां तरी विनायकरावांनीं वाचलें. यामुळें इतर जुन्या मराठी कवींशीं त्यांचा परिचय झाला पण पंतांच्या आर्यांनीं त्यांना खरा आनंद वाटला. यावेळीं पंतांच्या बऱ्याच आर्या त्यांना पाठ येऊं लागल्या होत्या. दामोदर-पंत विनायकरावांस त्या आर्या निरनिराळ्या मंडळीपुढें म्हणण्यास सांगत व या उत्तेजनानें विनायकरावांची पाठांतरांत चांगलीच प्रगति होऊं लागली.

विनायकराव नऊदहा वर्षांचे असतील त्यावेळीं त्यांची वाचनाची हौस वाढत जाऊन घरांतील पुस्तकांचे संग्रह ते बारकाईनें धुंडूं लागले. त्यांचे घरांत कोन-फळ्यांवरून ठेवलेले विष्णुशास्त्र्यांच्या निबंधमालेचे अंक, केसरी पत्राच्या फाइली, व कित्येक जुन्या बखरी त्यांस सांपडल्या. त्या मिळतांच त्यांतीलही मजकूर वाचण्याची त्यांस अतिशय गोडी लागली व त्यांचे मनांत देशभक्तीचें बीजारोपण आपोआप होऊन गेलें.

दामोदरपंतांना शिकवण्याची हौस असे. ते आपल्या मुलांस इंग्रजी कवितांचे चांगले नमुने वाचून दाखवीत व त्यांचें सुंदर भाषांतरही करून सांगत. अॅगमेम्नॉन व अॅकिलिससारख्या ग्रीक योद्ध्यांचीं वर्णनें ते मुलांस ऐकवीत. निरनिराळ्या कवनांतून केलेलीं सदाशिवरावभाऊ, शिवाजी व प्रताप यांचीं वर्णनें व रामायणमहाभारतांतून वर्णिलेल्या पराक्रमी योद्ध्यांचीं वर्णनें ते मुलांच्या नजरेस आणून देत. या योगानें न कळत मुलांतील काव्यशक्ति व वीरवृत्ति या दोहोंचाही परिपोष होत असे.

या सुमारास विनायकरावांची इतिहास व काव्य यांत किती प्रगति झाली होती हें दाखवणारें एक सुंदर गमक आढळतें. विनायकरावांची बहीण व इतर मुली खेळण्यासाठीं घरीं जमत तेव्हां झोंपाळ्यावर ओंव्या म्हणण्याचे वेळीं खंड पडूं नये म्हणून त्या विनायकरावांस आपले बाजूस अहमहमिकेनें घेत; याचें उघड कारण हें होतें कीं, विनायकरावांना मराठ्यांचा इतिहास अवगत असल्यामुळें व

मराठी कवितेशीं परिचय झाल्यामुळें मराठ्यांच्या इतिहासावर सुटसुटीत यमकाच्या ओंव्या त्यांना चटाचट जुळवतां येत व त्यांचा तासन् तास त्यांस पुरवठा करतां येई.

विनायकराव दहा वर्षांचे झाले तोंच एक दुर्दैवी घटना घडून आली. विनायकरावांच्या मातुःश्री सौ. राधाबाई ह्या यावेळीं निवर्तल्या. या दुःखाची झळ मुलांस अगदीं कमी लागावी म्हणून दामोदरपंतांनीं दुसरे लग्नाचे भरीस न पडतां हातानें स्वयंपाक करून, जेवूं घालून मुलांचें संगोपन करण्याचें काम हौसेनें पतकरलें.

विनायकराव अकराबारा वर्षांचे झाले त्यावेळीं त्यांचे हातांत वर उल्लेखिलेलीं वृत्तपत्रें तर येतच पण शिवाय त्यांनीं मिळतील तितक्या बखरी व चरित्रें वाचून काढण्याचा सपाटा चालविला. जुनी कविता छापणारे वामन दाजी ओक यांचें काव्यसंग्रह मासिक त्यांचे हातांत पडत असे. त्यावरून मोरोपंतांचे महाभारताप्रमाणें पेशव्यांवर आपणही एक महाकाव्य लिहावें असा विचार त्यावेळीं त्यांचे मनांत चमकून गेला. मराठ्यांचे इतिहासाची तर त्यांस इतकी गोडी लागली कीं, एकदां त्यांनीं आपले वडिलांजवळ पेशव्यांची बखर आपणांस आणून द्यावी असा अतिशय हट्ट घेतला. दामोदरपंतांनीं त्यांस जेव्हां ती बखर आणून दिली तेव्हां विनायकरावांना खरोखर निरतिशय आनंद झाला.

या वयांतच त्यांचे हातांत करमणूक, केरळकोकिळ, जगद्धितेच्छु, गुराखी, काळ व केसरी हीं वृत्तपत्रें पडूं लागलीं. त्यांतील विचारप्रणालीकडे त्यांचें मन हळूहळू जास्त आकर्षिलें जाऊन देशप्रीति, स्वदेशी वगैरे विषय त्यांस आवडूं लागले. निरनिराळ्या लेखकांच्या भाषासरणीनें मोहून आपणही त्याप्रमाणें लेख अगर कविता कां लिहूं नये असेंही त्यांना वाटूं लागलें. केसरी व काळ हीं पत्रें भारदस्त. तीं मोठ्या देशभक्तांनीं चालविलेलीं. त्यांचेकडे आपलें लिखाण पाठवल्यास तें कितपत स्वीकारलें जाईल याबद्दल त्यांना शंका वाटली. म्हणून त्यांनीं यावेळीं पोवाडे व बखरीचे आधारानें लिहिलेली 'सवाई माधवरावाचा रंग' ही कविता जगद्धितेच्छु वर्तमानपत्राकडे विनायक या सहीनें पाठवली. त्या संपादकांना कवीचें वय माहीत नव्हतें म्हणून बरें झालें. नाहींतर त्यांनीं कदाचित् ही कविता छापली नसती. पण ती वृत्तपत्रांत छापली गेल्यामुळें विनायकरावांचे काव्यस्फूर्तीस चांगलें उत्तेजन मिळालें.

विनायकरावांतील काव्यगुणाचा परिपोष करण्याचा वांटा त्यांचे थोरले बंधु गणेशपंत यांच्या पत्नी सौ. येसूताई यांच्याकडेही जातो. १८९६ त गणेशपंत यांचें लग्न झालें. महिला वर्गांत प्रचलित असलेलीं ८०।९० गाणीं त्यांस पाठ येत असत व तींही विनायकरावांना कितीदां तरी ऐकावयास मिळाल्यानें सहजसुंदर भावनिदर्शनाची मौज या आख्यानांचे द्वारां त्यांनीं खूप अनुभविली होती.

या काळांत विनायकराव थोड्या आर्याही जुळवूं लागले होते. परंतु हें त्यांचें लिखाण म्हणजे एक प्रकारचा वाचनाचा व श्रवणभक्तीचा थोडा परिणाम होतें. त्याला शास्त्रशुद्ध पाया नव्हता. या शास्त्रशुद्धतेच्या अभावाची जाणीव एका प्रसंगानें त्यांचे ध्यानांत लौकरच आली. तो मनोरंजक प्रसंग असा.

भगूर येथें असतांना कुळकर्णी या नांवाचा एक विद्यार्थी त्यांच्या वर्गांत होता. त्याला विनायकरावांच्या काव्यशक्तीबद्दल अचंबा वाटे. विनायकरावांच्या कवितांची वही वाचीत असतांना एका शिक्षकाचें लक्ष या कुळकर्ण्याकडे गेलें. कसली वही वाचतो आहेस असें विचारतांच कुळकर्णी यानें विनायकरावांच्या कवितांची वही शिक्षकास दाखविली. शिक्षकानें तें काव्य वाचून पाहिलें. आंतील कवितांनीं तो स्तिमितही झाला. परंतु जरा असूया वाटली म्हणून म्हणा अगर निष्काळजीपणानें म्हणा त्यांतील दोषांचा नेमका उल्लेख करून, "काय रे विनायक, काय या भिकारड्या आर्या लिहितोस? आर्येच्या पहिल्या पदांत बारा व दुसऱ्या पदांत अठरा मात्रा असतात हेंही तुला माहित नाहीं ना?" असें म्हणून त्यानें वही फेकून दिली. या वेळेस विनायकरावांना मात्रा शब्दाचा ए या संयुक्त स्वराची खूण एवढाच अर्थ माहीत होता त्यामुळें ते फार बुचकळ्यांत पडले. स्वभाव तर मानी पडला. मोरोपंतांच्या कितीतरी आर्या त्यांस पाठ येत होत्या. पण त्यांतील कोणत्याही आर्येच्या प्रथम व द्वितीय पदांत शिक्षकानें सुचविल्याप्रमाणें १२ व १८ मात्रा त्यांस आढळेनात. अशा गोंधळांत त्यांचे कितीतरी महिने गेले. शेवटीं त्यांना वृत्तदर्पण हें वरच्या वर्गास लावलेलें पुस्तक पहाण्यास मिळालें व क्षणांत त्यांची चूक त्यांना कळून आली.

हें सर्व लिहिण्याचें कारण एवढेंच कीं, त्यांचे प्रथमचे कवितांत वृत्तदोष आढळल्यास त्यांकडे त्यांचें लक्षच गेलें नसल्यामुळें ते झाले आहेत हें वाचकांच्या ध्यानांत यावें. परंतु विनायकरावांच्या याही वेळच्या कविता कांहीं संपादकांनीं छापल्या आहेत.

कारण त्यांच्या काव्यविषयाचा ताजेपणा, आंतील चमत्कृति, काव्यकल्पना व अंतःकरणाची तळमळ त्यांत दिसून येई हें होय.

विनायकराव पंधरा वर्षांचे झाले त्यावेळीं त्यांचे शिक्षणसाठीं नाशिक येथें त्यांस ठेवण्यांत आलें. त्यावेळीं विनायकराव इंग्रजी चौथ्या इयत्तेंत होते. बडोद्याचे राष्ट्र-कथामालेचीं कित्येक पुस्तकें त्यांनीं यावेळीं वाचलीं. दामोदरपंत या वेळेस विनायकरावांचे थोरले बंधूंस होमरच्या इलिअडचें पोपकृत रूपांतर वाचून दाखवीत असत. तेंही विनायकरावांनीं ऐकावें व आपणही पेशव्यांवर अशा प्रकारचें महाकाव्य लिहिण्याचा धाडसी विचार मनांत आणावा. पुढें शालिग्रामचे पोवाड्यांचा काव्य-संग्रहही त्यांचे हातांत पडला होता. या संग्रहाचे वाचनानें लोकांचीं अंतःकरणें थरारून व उचंबळून टाकणाऱ्या पोवाड्यांचें वाङ्मयही त्यांना आवडूं लागलें.

१८९७ हें वर्ष पुण्याचे बाजूस फार धामधुमीचें गेलें. राष्ट्रीय सभेचें अधिवेशन संपून सामाजिक-सुधारणा-परिषदेला तेथें जागा द्यावी किंवा नाहीं याचा वाद उप-स्थित झाला होता. तो पार पडतो न पडतो तोंच शिवाजीउत्सव व गणेशोत्सव यांची लाट उसळली. ती संपते न संपते तोंच दुष्काळ व प्लेग यांनीं लोक त्रस्त झाले. त्यांतच सरकारी अधिकाऱ्यांनीं महाराणी व्हिक्टोरिआ हिच्या राज्यारोहणाचा हीरकमहोत्सव करण्याचें ठरवलें. त्यामुळें चिडून ज्या अधिकाऱ्यांनीं लोकांना त्रास देऊन व छळून त्राहि भगवान् करून सोडलें त्यांचा उलट या प्रसंगीं सूड घेण्याचें कांहीं तरुण मंडळींनीं ठरवलें व गणेशखिंडीमध्यें चाफेकरबंधूंच्या धाडसापायीं रँड साहेबाचा बळी पडला. थोडकेच दिवसांत चाफेकरबंधूंचें नांव फोडणाऱ्या द्रविडाचा वासुदेवराव रानडे नांवाचे तरुणानें बळी घेतला. अशा रीतीनें चाफेकरबंधु व रानडे हे तिघेही खटले होऊन येरवड्यास फांशीं दिले गेले. या बातम्या इतक्या विचित्र व क्षोभकारक होत्या कीं त्याबद्दलचे वृत्तांत वाचण्यासाठीं विनायकराव अत्यंत उत्सुक व उतावीळ होऊन जात व वर्तमानपत्रें कधीं हातांत येतात असें त्यांस होऊन जाई. या सर्व गोष्टींचीं रोमांचकारक वर्णनें वाचून त्या अनावर तरुणांच्या देशभक्तीचें विनायकरावांस अतिशय कौतुक वाटे व बळी पडलेल्या तरुणांना ते हुतात्मे म्हणून अंतःकरणांत मान देत. यानंतर कांहीं महिन्यांचे आंत एका मध्यरात्रीं विनायकराव अश्रु गाळीत व पुशीत चाफेकरबंधूंवर पोवाडा लिहीत असलेले त्यांचे वडिलांस आढळले. त्यांस हा तेजस्वीपणा जरा भीतिदायकच वाटला म्हणून प्रकृतिदृष्ट्या असें जागत राहणें चांगलें नाहीं, वगैरे सांगून व रागावून ते निघून गेले. हा पोवाडा

अप्रसिद्ध आहे व कुठेंकुठें ऐकावयास मिळतो; पण या पोवाड्यांत लहानपणींच संस्कार झालेल्या मोरोपंती वळणाचे प्रास, अनुप्रास, यमकें व लकबी यांचा थाट छान आढळून येतो व देशभक्तीसारख्या सुंदर विषयाशीं त्याचा संयोग झालेला पाहून हा पोवाडा ऐकावयास मिळाला तर रसिकांस फार आनंद वाटेल असा आहे.

या पोवाड्याचे कांहीं कांहीं चौक विनायकरावांनीं गुपचूप लिहावे व आपल्या थोरल्या भावजयीस वाचून दाखवावे. ते ऐकतांच तिनें ते पाठ करून टाकावे व अशा रीतीनें हा सर्व पोवाडा १८९९ च्या मे महिन्यापर्यंत लिहून झाला असावा.

१८९७ या वर्षी प्लेगची झळ नाशकासही लागली. प्लेग ओसरतांच १८९८ चे आरंभीं विनायकराव आपल्या बंधूंसह नाशिक येथें वर्तकांचे वाड्यांत राहावयास आले. यावेळीं नगर जिल्ह्यांत मूळ रहाणाऱ्या पण नाशकास वास्तव्य करून राहिलेल्या गोविंद त्र्यंबक दरेकर यांनीं विनायकरावांशीं परिचय करून घेतला. हे दरेकर म्हणजेच गोविंद कवि. विनायकरावांचे सहवासानें या समानधर्म्याची काव्यांत चांगलीच प्रगति झाली. देशस्थितीच्या चर्चेमुळें व समानध्येयी मित्रांच्या सान्निध्यानें विनायकरावांचा देशभक्तीचा अंकुर चांगलाच वाढीस लागला.

१८९९ सालीं नाशिक येथें परत प्लेग सुरू झाला व म्हणून सावरकरबंधु आपल्या भगूर गांवीं परत रहावयास गेले. आतां विनायकरावांचे मनांत देशभक्ति व वाङ्मय या विषयांचे प्रांतांत टिळक व परांजपे यांना गुरु मानण्यापर्यंत विकास झाला होता. या वर्षांतील त्यांच्या कांहीं कविता जगद्धितेच्छु व काळ या पत्रांतून छापून आल्या होत्या.

सावरकरबंधु भगूर गांवीं जाऊन फार दिवस झाले नाहींत तोंच प्लेगची वक्रदृष्टि भगूर गांवाकडे वळली. त्या दुष्ट रोगानें प्रथमच दामोदरपंतांचा पांच एप्रिल रोजीं बळी घेतला व नंतर त्यांच्या बंधूंचा म्हणजे विनायकरावांचे चुलते बापूकाका यांचाही बळी घेतला. विनायकरावांच्या धाकट्या भावासही प्लेग आला. परंतु गणेशपंतांनीं न घाबरतां घर सोडलें व आपली तरुण पत्नी नी विनायकराव यांच्यासह नारायणरावांस घेऊन एका देवळांत तळ ठोकला. नाशकास नेल्यावर सर्वांच्या परिश्रमानें नारायणराव बरे झाले. तोंच गणेशपंतांसही प्लेग झाला परंतु कुणींही धीर सोडला नाहीं व उत्कृष्ट शुश्रूषेमुळें गणेशपंतही बचावले गेले.

अशा रीतीनें ज्ञानेश्वरादिकांसारखीं पोरकीं झालेलीं हीं भावंडें धीर खचूं न देतां

नाशकास रहावयास आलीं व आपापले उद्योगास लागलीं. १८९९ च्या मे महिन्यांत देशभक्तीच्या वृद्धयर्थ त्यांनीं मित्रमेळा या नांवाची एक संस्था स्थापन केली. मित्रमेळा ही संस्था निरनिराळ्या राष्ट्रवीरांचे व धर्मवीरांचे उत्सव साजरे करी. दासनवमी, गणेशोत्सव वगैरे उत्सव साजरे करून धर्मप्रेम व राष्ट्रभक्ति या गुणांचें संवर्धन करण्यांत ही संस्था अविश्रांत खटपट करीत असे. या उत्सवप्रसंगीं ऐतिहासिक व धार्मिक विषय मनोरमपणें व स्फूर्तिप्रद पद्धतीनें पदांतून अगर पोवाड्यांतून मांडण्याचें काम कवि गोविंद व विनायकराव बरोबरीनें करीत. या उत्सवांतून विनायकरावांचीं वक्तृत्वपूर्ण अशीं भाषणेंही होत. या सुमारास विनायकरावांचें मराठी काव्याचें परिशीलन करमणूक, मनोरंजन, विविधज्ञानविस्तार वगैरे मासिकांवरून होई. त्या नादानें 'चुकलेलें कोंकरूं' ही त्यांची कविता करमणूक या वृत्तपत्रांत छापून आली.

१९०० त विनायकराव इंग्रजी सहाव्या इयत्तेंत असतांना त्यांना इंग्रजी कवि स्कॉट यांच्या लेडी ऑफ दि लेकचा पांचवा सर्ग लावला होता. त्यांतील कांहीं भागाचें सारांशवजा भाषांतर मराठींत करण्याचा उद्योगही विनायकरावांनीं केलेला आढळतो. मोरोपंतांचे गंगावकिलीप्रमाणें सुंदर यमकांची गोदावकिलीही याच वेळीं त्यांनीं लिहिली. त्यांच्या काव्यशक्तीचा थोडा बोलबाला आजूबाजूस झाल्यामुळें कांहीं कलगीतुऱ्याचे लावणीवाले त्यांना भेटूं लागले. व ते आपल्याला आवश्यक अशी रचना त्यांचेकडून करून घेत असत. विनायकरावांना याच सुमारास भजनी मंडळीच्या मंडळांतही जाण्याचा योग आला व या सर्वांमुळें मराठी वाङ्मयांतील पोवाडे, लावण्या व अभंग या तिन्ही प्रकारच्या मराठीच्या अस्सल गेय विभागांशीं त्यांचा परिचय वाढला.

मॅट्रिकच्या वर्गांत शिक्षण संपादन करीत असतां जव्हारच्या राजांचे कारभारी श्री. भाऊराव चिपळूणकर यांच्या यमुना नांवाच्या ज्येष्ठ कन्येबरोबर विनायकरावांचा विवाह झाला. विनायकराव व त्यांचे सहकारी मित्र शाळेबाहेरच्या चळवळीकडे जसें लक्ष देत, तसें शाळेंतील अभ्यासाकडेही देत. अशा रीतीनें १९०१ सालीं विनायकराव आपली मॅट्रिकची परीक्षा पास झाले.

विनायकरावांचे श्वशुरांनीं कॉलेजचा खर्च देऊं केल्यामुळें विनायकरावांस पुण्यास फर्ग्युसन कॉलेजमध्यें उच्च शिक्षणासाठीं जातां आलें. नाशिकचे मित्रमेळ्यांतील मंडळींस विनायकरावांचें पुण्यास जाणें बरें न अवघड वाटलें. परंतु आपण चाल-

विलेल्या कार्याला विनायकरावांचे जाण्यानें जास्त व्यापक कार्यक्षेत्र मिळणार हें ओळखून त्यांनीं त्यांस आनंदानें निरोप दिला.

विनायकरावांचे स्वभावांत व विचारांत जात्याच एक आकर्षक अशी शक्ति आहे. त्यामुळें फर्ग्युसन कॉलेजमध्यें जातांच त्यांचेभंवतीं समानशीलाची मित्रमंडळी येऊं लागली. ही मंडळी लेखन, वाचन, वक्तृत्व, बलसंवर्धन व संघटन या कार्यांत पुढाकार घेऊं लागल्यामुळें सावरकरसंघ या नांवानें कॉलेजमध्यें लौकरच ओळखली जाऊं लागली. त्यांनीं Aryan Weekly नांवाचें एक हस्तलिखित साप्ताहिकही सुरू केलें व त्यांत येणारे लेख व कविता गुराखी, भाला, व काळ या वृत्तपत्रांत उद्धृत होऊं लागल्या.

राम गणेश गडकरी यांनीं विनायकरावांशीं परिचय करून घेतला होता व विनायकरावांनीं उत्तेजनार्थ गडकऱ्यांचा पानपतचा फटका Aryan Weekly मध्यें घेतला होता. पण याशिवाय इतर आधुनिक मराठी कवींशीं विनायकरावांचा परिचय होण्याचा योग आला नाहीं.

फर्ग्युसनमधील कॉलेजजीवनांत विनायकरावांचे हातून त्यांचे मित्रांत चाललेल्या वैचारिक व संघटनात्मक कार्याशिवाय प्रत्यक्ष अशी वाङ्मयीन कृति विपुल झाली नाहीं. पण पुढें झालेल्या वाङ्मयीन कृतीसाठीं लागणारी पूर्वसिद्धता मात्र या चार वर्षांतच त्यांनीं फार केली हें पुढील वृत्तांतावरून ध्यानांत येईल.

कॉलेजच्या प्रथम वर्षांत त्यांना अत्यंत आवडणारा रोमचा इतिहास लावलेला होता. या इतिहासाबरोबर त्यांनीं राजवाडे व साने यांचे ऐतिहासिक लेखसंग्रह वाचण्याचें कार्य चालू ठेवलें होतें. करमणूक पत्राचे संपादक रा. हरिभाऊ आपटे यांच्या तोंवरच्या सर्व कादंबऱ्या त्यांनीं वाचल्या होत्या. हरीभाऊंशीं त्यांचा पत्रव्यवहारही होता. पण प्रत्यक्ष ओळख नव्हती. करमणुकीनें सर्व पेशव्यांत थोर पेशवे कोण व कां या विषयावर निबंध मागवले होते. त्यांत विनायकरावांचा निबंध श्रेष्ठ ठरून त्याबद्दल त्यांना पारितोषिकही मिळालें होतें. कॉलेजच्या प्रथम व द्वितीय वर्षांत त्यांना कालिदास व भवभूति यांचें एकेक नाटक लावलें होतें. परंतु विनायकरावांनीं कालिदास भवभूतींचीं सर्व नाटकें वाचून त्यांच्या नाट्यकृतीवर एक तुलनात्मक निबंध लिहिला. त्या विषयाला लागणारा त्यांनीं केलेला अभ्यास व लिहिलेला इंग्रजी निबंध पाहून प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन यांनीं मुक्तकंठानें त्यांची प्रशंसा

केली होती. त्यांनीं इलिअड व रामायण या दोन्ही काव्यांचीही तुलना एका निबंधांत केली होती. त्यांना इंग्रजीसाठीं स्कॉट, मिल्टन, शेक्सपिअर व गोल्डन ट्रेझरींत आलेले कांहीं कवि अभ्यासास नेमले होते. पॅरॅडाइज लॉस्टच्या पहिल्या पुस्तकांतील सेटन व त्याचे अनुयायी यांच्या अजब भाषणांची मिल्टननें केलेली रचना पाहून ते थक्क होऊन गेले व पॅरॅडाइज लॉस्टचे कांहीं सर्गच्या सर्ग त्यांनीं पाठ केले. आपल्या मराठीं काव्यांतही अशाच तऱ्हेचीं पल्लेदार भाषणें उठावदार रीतीनें मांडल्यास मोठीं परिणामकारक होतील असा विचार त्यांचे मनांत येऊन गेला. यावेळीं शेक्सपिअरचींही नाटकें त्यांनीं वाचून संपवलीं. या दोघांही कवींची वाचलेली निर्यमक रचनाही कशी आकर्षक आहे हें पाहून ते आनंदून जात. यावेळीं शेले, कीट्स, वर्डस्वर्थ व बायरन् याही कवींशीं त्यांचा अल्प परिचय झाला. विनायकराव कॉलेजमधील व्याख्यानांस फारसे बसत नसत. परंतु अशा रीतीनें मिळालेला वेळ ते एक एक ग्रंथकार पूर्णतया वाचण्याकडे खर्च करीत. इंग्रजीबरोबर संस्कृत घेतल्यानें काव्य, भाष्य व वेद यांच्याशींही त्यांचा परिचय वाढला. या काळांत दासबोधाचींही त्यांनीं पारायणें केलीं.

विनायकराव १९०५ सालीं बी. ए. ची परीक्षा पसार झाले. कॉलेजच्या त्यांच्या चार वर्षांचे काळांत त्यांची काव्यरचना हजार एक ओळी असेल नसेल. त्यांनीं केरळकोकिळकारांस उद्देशून एक कविता लिहिली होती. जव्हारला जातांना घाटावर गाडी ओढणाऱ्या बैलावरून वृषोक्ति नांवाची त्यांनीं उपरोधक कविता लिहिली. बी. ए. होण्यापूर्वीं विधवांच्या स्थितीवर त्यांचे सुधारणाप्रिय विचार व्यक्त करणारें एक काव्य त्यांनीं लिहिलें होतें व त्याबद्दल विविधज्ञानविस्तारामार्फत कै. श्री. ना. मुजुमदार व ते या दोघांत तीस रुपयांचें बक्षीस विभागून मिळालें होतें. परंतु या काळांतील त्यांची डोळ्यांत भरण्याजोगी काव्यरचना म्हणजे देशाभिमानानें रसरसलेल्या आरत्या, पदें, स्तोत्रें व पोवाडे हे होत. त्यांची शिवाजीची आरती तर क्लबांतून नेहमीं म्हटली जात असे. स्त्रियांकरितां शिवाजीवर एक गाणें त्यांनीं लिहिलें होतें. त्यांचें स्वतंत्रतेचें स्तोत्र व तानाजी आणि बाजीप्रभूचा पोवाडा देशाभिमानानें ओथंबणारीं मुलें म्हणत व त्यायोगें हजारोंनीं जमलेला श्रोतृसमाज ते पोवाडे ऐकून रोमांचित होऊन जाई.

१९०६ सालीं एम्. ए. व एल्एल. बी. परीक्षांचा अभ्यास करण्यासाठीं

विनायकराव मुंबईस आले. यावेळीं त्यांनीं रामानुजाचें भाष्य वाचलें. योगवासिष्ठ याही ग्रंथाचा परिचय त्यांना याच वेळीं झाला.

विनायकरावांनीं १९०६ च्या जून महिन्यांत राजकारणांत समान ध्येय बाळगणाऱ्या त्यांच्या मित्रांच्या साहाय्यानें अभिनव भारत नांवाची संस्था नाशिक येथें स्थापन केली. यावेळीं या संस्थेचे दोनशेंच्या वर सभासद होते.

पंडित शामजा कृष्णवर्मा यांनीं विलायतेंतील अभ्यासक्रमासाठीं व त्यांनीं काढलेल्या होमरूलचें राजकारण चालवणारी मंडळी तयार करावी म्हणून एक शिष्यवृत्ति हिंदुस्थानांतील मुलांना देऊं केली होती. लोकमान्य टिळकांचे व काळकर्ते परांजपे यांचे शिफारसीमुळें ' शिवाजी ' शिष्यवृत्ति विनायकरावांस मिळाली. हातीं घेतलेल्या कार्याचा विस्तार करण्याची संधि विलायतेंतील वातावरणांत अधिक मिळेल या कल्पनेनें विनायकरावांनीं विलायतेस जाण्याचा आपला संकल्प दृढ केला. व १९०६ च्या जूनमध्यें पहिल्या तारखेस त्यांनीं हिंदुस्थानाचा किनारा सोडला.

मुंबई सोडतांना बोटीचे धक्क्यावर त्यांचे बंधु, सौ. येसूवहिनी, लहानग्या प्रभाकरासह त्यांची पत्नी, इतर नातेवाईक व जिवलग सोबती हीं सर्व निरोप द्यावयास आलीं होतीं. जड अंतःकरणानें त्या सर्वांचा त्यांनीं निरोप घेतला. पण बोटीवर या सर्वांच्या ममतेची ओढ त्यांना फार जाचली. यावेळीं हा वियोग विसरावा म्हणून बोटीच्या डेकवर रात्रीं फिरत असतां त्यांनीं तारकांना पाहून ' नांवाची एक कल्पनातरंगपूर्ण अशी सुंदर कविता लिहिली.

त्यांनीं विलायतेस पोंचल्यावर जव्हार संस्थानचे अधिपति 'श्रीमान् राजे कृष्णशहा यांस ' ही एक पत्रात्मक कविता त्यांचा गौरवपूर्वक उल्लेख करून पाठवली. विनायकराव विलायतेंत १९०६ ते १९१० पर्यंत साडेचार वर्षें होते. एवढ्या अवधींत त्यांनीं कायद्याचे अभ्यासाबरोबरच भारतीय विद्यार्थ्यांचें विलक्षण संघटन व उत्तम ग्रंथलेखन केलें.

१९०६ सालीं त्यांनीं प्रथम ' मॅझिनीचे आत्मचरित्रा 'चें मराठींत भाषांतर केलें व पाठोपाठ 'स्वातंत्र्ययुद्धाचा इतिहास' हाही ग्रंथ इंग्रजींत लिहून पूर्ण केला. नानकजयंतीच्या दिवशीं प्रमुख वक्ते म्हणून भाषण करण्याची संधि त्यांना आली असतां शिखांच्या इतिहासावर त्यांनीं इतकें हृदयस्पर्शी भाषण केलें कीं, तेथील सर्व शीख

समाजाचें अंतःकरण त्यायोगें त्यांनीं काबीज केलें. येथेंच ते पंजाबी मंडळीजवळ गुरुमुखीही शिकले.

१९०७ सालीं त्यांच्या मनानें १८५७ सालचे क्रांतीचा अभ्यास करण्याचें ठरवलें. यासाठीं ब्रिटिश म्युझियममध्यें महिनेच्या महिने, दिवसाचे कित्येक तास ते वाचनांत घालवीत. त्यांचा हा अभ्यासाचा हव्यास पाहून त्या वाचनालयाचे प्रमुखानें दुर्मिळ असा इंग्रजी पत्रव्यवहारही अवलोकनार्थ त्यांचे हवालीं केला. याच वेळीं पुष्कळ बंगाली त्यांचे मित्र झाले होते. त्यांच्या आग्रहावरून रजनीकान्त बाबूचें 'शिपाईयुद्धेर इतिहास' हें पुस्तक मुद्दाम बंगाली भाषा शिकून बंगाली भाषेंतून त्यांनीं वाचलें. वरील अभ्यासाचे वेळींच शिखांच्या इतिहासाची त्यांना चांगलीच माहिती झाली. याचे आधीं "प्रियकर हिंदुस्थान" व "हिंद सुंदरा ती" या कविता त्यांनीं लिहिल्या होत्या व ज्या लाडक्या मुलाला–प्रभाकराला ते आपला शिखांचा इतिहास अर्पण करणार होते तो मुलगा वारलेला ऐकून त्याला उद्देशून 'प्रभाकरास' ही भावमधुर कविता लिहिली.

१९०८ व १९०९ सालीं त्यांनीं चालविलेल्या राष्ट्रोद्धारक कल्पनांची व्याप्ति इतकी विस्तार पावूं लागली कीं, त्याचा परिणाम हिंदुस्थानांतही प्रत्यक्ष दिसूं लागला व १९०९ सालांत हिंदुस्थानांत त्यांचे दोघां बंधूंना अटक झाली. थोरले बंधूंस तर काळेपाण्याची शिक्षा होऊन ते अंदमानकडे रवाना झाले व धाकट्या बंधूंस कांहीं महिन्यांची सश्रम शिक्षा झाली. या घरगुती गोष्टींनीं त्यांचें अंतःकरणास चटके बसत होते तरी त्यावेळीं धृतिपूर्ण विवेकानें त्यांनीं आपले थोरले भावजयीस सौ. येसूवहिनीस–त्यांच्या अंतःकरणास व्यथित करणाऱ्या पत्रास उत्तर म्हणून एक पत्रात्मक कविता पाठविली. तिचें नांव "सांत्वन" होय.

विनायकराव १९०९ सालीं बॅरिस्टरीची परीक्षा पास झाले. राजद्रोह न करण्याचे अटीवर त्यांना सनदही मिळणार होती परंतु असली विचित्र अट सहन करण्यापेक्षां त्यांनीं सनदेवर पाणी सोडलें. यावर्षी तर एकाहून एक अशा विलक्षण घटना घडत जाऊन ते लंडन येथें रहात असलेल्या 'भारतभुवन' नांवाच्या संस्थेलाच जिवंत रहाणें कठीण होऊन गेलें. या संस्थेला अगर तिच्या सभासदांना रहाण्याला उभ्या लंडनमध्यें कोठें जागा मिळेना. बंधूंना शिक्षा झालेल्या, सहकारी मित्रांचा अमानुष छळ चाललेला व विलायतेंतील मित्रांना तर निवाऱ्या-

साठीं साधा थारा मिळूं नये अशी व्यवस्था झालेली. त्यांतच त्यांची प्रकृति बिघडली म्हणून विश्रांतीसाठीं ते ब्रायटन या शहरीं गेले होते. तेथें समुद्रकांठीं आपल्या मातृभूमीची आठवण होऊन त्यांनीं 'सागरा, प्राण तळमळला' ही कविता लिहिली. आपल्या मातृभूमीची आठवण होऊन त्यांचा आत्मा किती व्याकुळ झाला याचें भावपूर्ण चित्रण या कवितेंत पहावयास मिळतें.

१९१० सालांत त्यांचे मित्रांनीं त्यांना इंग्लंड सोडून पॅरिसला जाण्याचा सल्ला दिला; त्याप्रमाणें ते गेलेही. परंतु भावविवश अशा त्यांच्या तेजस्वी आत्म्याला आपल्या अनुयायांस सोडून कातडी बचावून राहाणें नामर्दपणाचें वाटलें व मार्चमध्यें ते धडाडीनें इंग्लंडास परतले. त्यांना राजद्रोहाचे आरोपावरून पकडण्यांत आलें. व लंडनमध्येंच एका निर्मक्षिक अशा उंच भिंतींच्या फरसबंद कोठडींत घाबरून सोडण्याकरितां कोंडण्यांत आलें. त्यावेळेस त्यांचे मनांत कोणते विचार येऊन गेले व ते कवचमंत्राप्रमाणें किती कठोर होते याची कल्पना "मूर्ति दुजी ती" ही त्यांनीं पुढें तेच विचार गोंवलेली अंदमानांत लिहिलेली कविता वाचून पहावी म्हणजे नीट ध्यानीं येईल.

नंतर त्यांना ब्रिक्स्टनचे तुरुंगांत ठेवण्यांत आलें परंतु ब्रिटिश कोर्टानें विनायकरावांना हिंदुस्थानांत धाडावें अशी आज्ञा दिली. हिंदुस्थानांतील कोर्टासमोर जाणें म्हणजे फांशी अगर अंदमानला जाणें होय व पुन्हा कोणास पुढें स्वतंत्रपणें भेटणें अगर पत्रही लिहिणें शक्य होणार नाहीं असें वाटून त्यांनीं आपलें दिव्य व्रताचे अंगीकाराचें समर्थन करणारी 'माझें मृत्युपत्र' ही कविता गुप्तपणें आपले सहकाऱ्यांचे हातून धाडली. सौ. येसूवहिनी ही त्यांच्या इतक्या वयाची—त्यांच्या-सारख्या जाज्वल्य भावनांची—त्यांच्यासारखीच रसिक व पाठांतरशक्ति असलेली अशी एकच विश्वासभूमि त्यांना राहिली होती. तिच्याकडेच ही वज्रशील भावना व्यक्तविणारी कविता त्यांनीं पाठवून दिली.

हिंदुस्थानांत घेऊन येत असतां अधिकाऱ्यांचे हातून सुटून जाण्याचा केवढा अचाट धाडसी यत्न त्यांनीं केला हें सर्व मराठी वाचकांस माहीतच आहे. पण पकडल्यानंतर आतां हे अधिकारी आपला अमानुष छळ करणार अशी त्यांस खात्री वाटली. यावेळीं त्यांनीं मनाशीं जुळवलेलें व एकाद्या योग्याला शोभणाऱ्या चित्ताची अचल धारणा प्रकट करणारें त्यांचें 'अनादि मी, अनंत मी, अवध्य मी भला' हें गीत अत्यंत वाचनीय झालें आहे.

फ्रेंच किनाऱ्यावर त्यांस पकडल्यानें आंतरराष्ट्रीय हक्काची पायमल्ली होत आहे असें दाखवून त्यांचे मित्रांनीं हेग कोर्टापुढें दावा चालविला होता. व त्याचा निर्णय होण्यास बराच कालावधि लागणार होता. १९१० च्या ऑक्टोबरमध्यें विनायकरावांस मुंबईस उतरवण्यांत आलें. पुढें २ महिने त्यांच्यावर व त्यांच्या सहकाऱ्यांवर खटला चालून विनायकरावांस आजन्म काळेपाण्याची शिक्षा सांगण्यांत आली.

हत्येस चिथावणी या आरोपावरून दुसराही एक खटला सरकारनें विनायकरावां-वर याचवेळीं भरला होता. त्याचा निकाल ऐकण्यासाठीं त्यांस ज्यावेळीं नेण्यांत आलें त्यावेळीं त्यांस फांशीची शिक्षा होणार असें वाटलें होतें. त्यावेळेस त्यांचे मनांत कोणत्या भावना उचंबळत होत्या हें त्यांच्या "पहिला हप्ता" या हविर्गीतांत पहावयास मिळतें. यावेळेसही आणखी २५ वर्षे काळेपाण्याची शिक्षा त्यांना सांगण्यांत आली.

त्यावेळीं त्यांना डोंगरीचे तुरुंगांत ठेवण्यांत आलें होतें. हेग कोर्टाचाही निर्णय त्यांचेविरुद्ध गेल्यामुळें ५० वर्षे काळेंपाणी भोगावें लागणार हें त्यांचे मनास उमगून चुकलें. हें कळून डगमगून न जातां हा इतका काळ आपण कसा घालवावयाचा याचा एक मनोमय नकाशा त्यांनीं आपले मनापुढें काढला. दीर्घकालपर्यंन्त बन्दि-वासांत असलेल्या रॅले, क्युरोपाटकीन वगैरे अनेक थोर बन्दिवानांचीं चित्रें त्यांचे मनापुढून गेलीं. त्या देशभक्तांना मिळणाऱ्या लेखनसामग्रीसारख्या गोष्टीही आपणास मिळणार नाहींत हें ध्यानांत येतांच परत त्यांचे मनानें उशी घेतली व मनांतल्या मनांत कविता रचून त्या स्मृतिपटलावर कोरून ठेविल्या तर त्यास कुणाचा प्रत्यवाय होणार नाहीं व अशा रीतीनें आपल्या मातृभूमीच्या चरणीं एकादें महाकाव्यपुष्प वाहतां येईल असे विचार त्यांचे मनांत आले. लहानपणीं केलेल्या महाकाव्यलेखनाच्या संकल्पाला यावेळच्या विचारांनीं पुन्हा चालना दिली व रोज कमींत कमी दहा ते वीस नवीन कविता रचण्याचा त्यांनीं मनाशीं बेत केला.

महाकाव्य लिहिण्याचा संकल्प केला खरा परन्तु प्रत्यक्ष सश्रम कारावासाचा भोग पुढें आल्यानें अशा अनन्वित छळांस ज्या महात्म्यांना तोंड द्यावें लागलें त्यांची आठवण त्यांना प्रथम झाली व त्यांचेवरच लिहिण्यास त्यांनीं आरंभ केला. शिखांचे गुरु "गुरु गोविन्दसिंग" यांचेवर त्यांनीं प्रथम २०० भावपरिप्लुत अशा आर्या लिहिल्या. दुर्दैवानें त्या आतां त्यांस आठवत नाहींत, नंतर तेथेंच त्यांनीं सप्तर्षि याही दीर्घ काव्याला आरंभ केला.

डोंगरीचे तुरुंगांतून त्यांना लवकरच भायखळ्याचे तुरुंगांत बदलण्यांत आलें. डोंगरीचे एकलकोंडीपेक्षां भायखळ्याची एकलकोंडी जास्त भयाण होती. तेथील एकांतानें जास्त औदासीन्य त्यांचे मनांत उत्पन्न होई. याच भावनांचा विकास त्यांनीं आपल्या 'सप्तर्षि' काव्यांत केला आहे. गोविंदसिंगावरील आर्या व 'सप्तर्षि' यांतील आर्या ते प्रथम विटकराचे बारीक तुकड्यानें अगर अणकुचीदार खड्यानें भिन्तीवर लिहीत व नंतर पाठ करून टाकीत. हे दोन विषय संपतांच येशू ख्रिस्ताचें चरित्र त्यांनीं मराठींत काव्यबद्ध करून टाकण्याचें ठरविलें होतें.

या सुमारास विनायकरावांनीं आपल्या २५।२५ वर्षांच्या दोन जन्मठेपी एककालिक करण्याबाबत सरकारास लिहिलें होतें. परंतु त्या अनुक्रमानेंच भोगल्या पाहिजेत असें लिहून आलें. १९११ चे जानेवारींत त्यांना ठाण्याचे तुरुंगांत, तेथून मद्रासेस व तेथून अन्दमानांत नेण्यांत आलें.

अंदमानांत पहिले २१४ दिवस त्यांस काम देण्यांत आलें नव्हतें. वाचावयास पुस्तक वा लेखनास साहित्य हें कांहींच दिलें नसल्यामुळें वेळ घालवावा कसा ह्याचें कोडें त्यांना पडलें. एकलकोंडींत दिवस घालविण्याचें उत्तम साधन म्हणून पुन्हा मागें करीत असलेल्या कविता पुढें रचण्याचें त्यांनीं मनाशीं ठरविलें.

मराठींत अनुष्टुप् छन्दाचा प्रचार जवळ जवळ नाहींसा झाला आहे हें कांहीं ठीक नाहीं. रामायण महाभारतासारख्या काव्यांनाही ज्यांत गातां येतें त्या गोड छंदांत काव्य लिहावें असें वाटून एक मंजुळ व ललित अशी काव्यरचना करण्याचें त्यांनीं मनाशीं योजिलें. अनुष्टुप् छंदाची शास्त्रीय रचना न आठवून पुष्कळ दिवस अशुद्ध रचना ते करीत होते. परंतु त्या छंदाचें शास्त्रीय स्वरूप त्यांस लवकरच आठवलें व अशा रीतीनें अंदमानांतील सात क्रमांकाच्या कोठडींत 'कमला' काव्याचें रानकमल फुलूं लागलें. गुपचिप लपविलेल्या अणकुचीदार घायपातीच्या कांट्यानें तें काव्य ते भिंतीवर लिहीत. भिंतीवर मराठींत कोरलेलें हें नितांतमधुर कमला काव्य अधिकाऱ्यांस वाचतां येत नसे. पण भिंतीवर हा बंदी कांहीं तरी लिहितो हें सहन न होऊन पायबेड्यांप्रमाणें हातबेड्याही हातीं पडून त्यांना दिवसच्या दिवस उभ्यानें टांगून पडावें लागे. पण त्या वेळांत लिहिलेलें सर्व काव्य ते पाठ करून टाकीत. खोली बदलली जाई तेव्हां त्या खोलींत येणारा एकादा महाराष्ट्रीय कैदीही तें पाठ करून टाकीत असे.

अंदमानांतील पहिलीं दोनतीन वर्षे सावरकरांस अतिशय जड गेलीं. त्यांच्या चारित्र्याचा, संघटनशक्तीचा व प्रतिकारक्षमतेचा अंदाज तेथील अधिकारी वर्गास येईपावेतों त्यांचा, त्यांच्या सहकारी मित्रांचा व त्यांच्याशीं परिचय ठेवणारांचा फार छळ झाला. परंतु निश्चयानें, चातुर्यानें व योजकशक्तीनें अधिकाऱ्यांच्यावर दरवेळीं त्यांनीं मात केली व सर्वच बंद्यांसाठीं पुष्कळ सवलती मिळविल्या. उदाहरणार्थ, भांडून, समजूत घालून व आपलें म्हणणें पटवून देऊन तेथील बंद्यांसाठीं त्यांनीं एक मध्यवर्ती वाचनालय बनविलें. त्यांत त्यांनीं स्वतःचीं मराठी व इंग्रजी पुस्तकें दिलीं व इतर हिंदप्रांतीय मंडळींचींही हिंदी, बंगाली, तेलगू, तामीळ, वगैरे भाषांतील पुस्तकें देवविलीं, त्यामुळें तें एक नमुनेदार वाचनालय बनत चाललें. त्याचा विनायकरावांनीं स्वतः खूप फायदा घेतला. बंगाली वाङ्मयाचा यथेच्छ आस्वाद तर त्यांना येथेंच घेतां आला.

'कमला' काव्य लिहून संपतांच पानपतापर्यन्तच्या मराठी साम्राज्याच्या काळावर उजेड पाडणाऱ्या महाकाव्याची रचना करावी असें त्यांना वाटूं लागलें. म्हणून पानपतापूर्वी २० वर्षे पोर्तुगीज लोकांशीं टक्कर दिलेल्या पेशवाईच्या काळावर काव्य लिहिण्याचा संकल्प त्यांनीं चालू ठेवला. त्याचाच परिणाम म्हणजे 'गोमांतक' काव्याचा पूर्वार्ध होय.

गोमांतक काव्याचे पूर्वार्धांत अनुष्टुप् छंदच आहे. परंतु उत्तरार्धांत त्यांच्या मनानें एका नवीन वृत्तांत रचना करण्याचें घेतलें. अनुष्टुप् काय किंवा इतर वृत्तांत काय? दुसऱ्या अगर चवथ्या चरणाचे शेवटीं लेखकाला मनांतील अर्थ संपवावाच लागतो व त्यामुळें भावनेच्या आवेगाला साहजिकच लगाम बसतो. त्यांनीं अगदीं लहानपणीं वाचलेल्या होमरच्या प्रदीर्घ कल्पनांची मौज अनुभविली होती. कॉलेजमध्यें मिल्टन वाचीत असतांना त्याच्या 'पॅरॅडाईज् लॉस्ट' या कवनांत दिलेलीं सेटन, बील-झेबब व मोलॉक वगैरे अनुयायांचीं लांबलांब भाषणें सुरू झालीं म्हणजे स्तंभच्या स्तंभ तीं सारखीं अखंडित वाचतांना कसा उच्च आनन्द प्राप्त करून देत, याची त्यांना आठवण होती. निर्यमक रचनेमुळें नुसत्या सताल अशा ओळींत ब्रूटस अँटनींच्या तोंडीं निरनिराळे भाव उचंबळणारे शब्द घालून केवढा सुंदर रसोत्कर्ष शेक्सपिअर साधी, हेंही त्यांना ठाऊक होतें. त्यासारखीच २० मात्राचरणाची निर्यमक परन्तु तालबद्ध अशी रचना लेखनास स्वीकारून त्यास 'वैनायक वृत्त' असें नांव देऊन त्यांत प्रदीर्घ कल्पनांचें लेखन करण्याची टूम त्यांनीं काढली. लहान भावना

अगर कल्पना ज्यांत थोड्या चरणांत संपवितां येते, आणि भव्य भावना व ओघवान् वक्तृत्व वाटेल तितक्या ओळींत मांडावयाला ज्यांत हरकत पडत नाहीं त्या 'वैनायक' वृत्ताच्या झेपींत गोमांतकाचा उत्तरार्ध लिहिला आहे. या वैनायक वृत्तांत उत्तरार्ध लिहिण्यास आरंभ केला परंतु नियमकतेमुळें तो रचणें व लक्षांत ठेवणें त्यांस स्मरणशक्तीला ताण पडूं लागल्यामुळें इतकें दुर्घट झालें कीं, त्यांनीं त्याची रचना अंदमानांत सोडून दिली व ती शेवटीं रत्नागिरीचे तुरुंगांत कागद पेन्सिल मिळाल्यावर पुरी केली।

'कमला' काव्यांत आलेला विषय ध्यानांत घेऊन त्यानंतरचा भाग मनापुढें आणून त्यांत बंदींत पडलेल्या एका वीरयुवकाचे विरहोद्गार त्यांनीं 'विरहोच्छ्वास' नामक काव्यांत गुंफले. पेशव्यांच्या आरमारी मर्दुमकी ध्यानीं घेऊन 'सागरास' हा भाग लिहिला होता. विनायकरावांच्या 'कमला,' 'गोमांतक,' विरहोच्छ्वास' व 'सागरास' या सर्व कविता त्यांच्या दोन उत्कृष्ट भावनांमुळें लिहिल्या गेल्या. मराठी राज्यांत गाजलेली हिंदुधर्मप्रीति व राष्ट्रभक्ति त्यांना अतिशय आनंदित करी. स्वाभाविकच या उज्ज्वल कालाचें स्तोत्र गाण्यांत त्यांना धन्यता वाटे.

दुसरी गोष्ट ही कीं, वरील हिंदुत्वभक्ति व राष्ट्रप्रीति वर्णितांना स्वतः त्यांनीं याच ध्येयापायीं अनुभविलेल्या यातना, मानखंडना व भावना यांचें निदर्शन करण्यास आत्मचरित्रपर होऊन अवसर मिळे. या दोन भावनांच्या सुंदर मिलाफामुळें हीं काव्यें त्यांनीं लिहिलीं.

विनायकरावांना कोकण पहाण्याचा योग आलेला नव्हता. उत्तरेस नाशिक व दक्षिणेस पुणें एवढींच काय तीं त्यांनीं बी. ए. होईपर्यंत पाहिलेलीं. बाकीच्या म्हणजे कर्जत, अलीबाग, येवलें, डहाणू व नगर वगैरे गांवांचा अगदीं अल्प परिचय. मुंबईस चारसहा महिने मुक्काम व मद्रासचें ओझरतें दर्शन एवढीच काय ती सर्व हिंदुस्थानची भौगोलिक साक्षात् माहिती. असें असून गोमांतकासारखा विषय घेऊन त्यावर त्यांनीं ४८१२ ओळींचें काव्य लिहिलें. साहजिकच गोव्यामधील स्थळें, वनस्थली, निसर्गसौंदर्य, रीतिरिवाज, भाषालकबी अगर इतर तत्प्रांतीय विशेष या काव्यांत येणें शक्यच नव्हतें. मराठ्यांच्या इतिहासाचा जो व्यासंग लहानपणापासून होता त्याच्याच आधारावर कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें तेथील वातावरण कल्पून त्यांनीं हें प्रदीर्घ काव्य लिहिलें आहे. हिंदुत्वाच्या अभि-

मानानें मराठेच काय ते हिंदुस्थानांत लढले. त्यांच्याच अतुल देशभक्ति, शौर्य व धाडस या गुणांमुळें हिंदुधर्म व हिंदूंचा हिंदुस्थान राहिला असें त्यांचें ठाम मत असल्यामुळेंच एवढी प्रचंड रचना त्यांनीं लपूनछपून केली. भिंतींवर कोरून काढली. हातकडया पडून उभें राहावें लागे तशांतही स्मृतिपटलावर स्थिर केली. अवसर मिळतांच कारागारांत कागदावर लिहून काढली व प्रयासानें हिंदुस्थान-कडे धाडून दिली. इतक्य: दिव्यांतून ही कविताकन्या कशी अवतरली आहे हें मीं येथें सांगितलें आहे.

जगांत वावरणाऱ्या गूढ शक्तीचें स्वरूप त्यांचे मतें करुणामय व क्रूर अशा दोन्ही प्रकारचें आहे हें त्यांनीं घटाघटा रक्त पिणाऱ्या पण पिलांना पाजणाऱ्या व्याघ्रीवरून आपल्या ' मूर्ति दुजी ती ' या काव्यांत ध्वनित केलें आहे. ' चांदोबा ' व ' सायंघंटा ' या त्यांच्या अंदमानांतील प्रसंगांवर आधारलेल्या कविता आहेत. १९१४ सालीं रवींद्रांना नोबेल प्राइझ मिळालेलें ऐकून त्यांच्या गौरवपर एक कविता लिहून त्यांनीं रवींद्रनाथांकडे पाठवून दिली. यावेळीं ' आकांक्षा ' नांवाची अतिशय उच्च दर्जाची रूपकात्मक कविता त्यांनीं लिहिली. आकांक्षा ही कविता शैलीचे दृष्टीनें हृद्य असून ध्वनिपूर्ण आहे. त्यांच्या ' बेडी, ' ' कोठडी, ' ' जगन्नाथाचा रथोत्सव, ' ' निद्रे ' व ' मरणोन्मुख शय्येवर ' या सर्व कविता आध्यात्मिक बैठकीवरून लिहिल्या आहेत. विनायकरावांच्या या कविता वाचल्यावर ते किती निवृत्तिप्रिय, संन्यस्त व आत्मनिष्ठ आहेत याची कल्पना येईल. किंबहुना हीच त्यांची प्रकृति असून त्यांचा जगाला दिसणारा ज्वलंत कर्मयोगीपणा विकृति तर नाहीं ना असें क्षणभर वाटेल.

अंदमानांतून सुटल्यावर त्यांस प्रथम अलिपूर येथें ठेवण्यांत आलें. नंतर रत्नागिरी तुरुंगांत, व शेवटीं येरवडयाचे तुरुंगांत. हिंदुस्थानांतील तुरुंगांत आल्यावर तुकडयातारकडयांवर पुन्हा त्यांनीं आठवतील तेवढ्या कविता व गोमांतकाचा उत्तरार्ध लिहिला. आधीं आलेल्या त्यांच्या कागदांच्या साहाय्यानें व सुटून आलेल्या पण अंदमानांत त्यांचेबरोबर शिक्षा भोगीत असतांना ज्यांनीं त्या कविता पाठ केल्या होत्या त्यांच्याही मदतीनें ' कमला ' व ' गोमांतक ' हीं काव्यें १९२३–२४ त प्रसिद्ध झालीं. ' रानफुलें ' हा संग्रह तर ते सुटल्यावर १९३४ त प्रसिद्ध झाला.

तुरुंगांतून काढून रत्नागिरीस त्यांना स्थानबद्ध करून ठेवल्यावर त्यांनीं धडाडीनें गद्यलेखनास आरंभ केला व निबंध, प्रबंध व नाटकें या प्रकारचें वाङ्मय त्यांनीं

बरेंच निर्माण केलें. नाटकांतून त्यांची थोडी पद्यरचना आली आहे. वैनायक वृत्तांतील कांहीं रचना या नाटकांतून किती परिणामकारक वाटते तें, तें नाटक पाहिलेले लोक चांगलें सांगूं शकतील.

हिंदुत्वाचा व राष्ट्रीय कल्पनेचा त्यांचा जन्मभरचा ध्यास. निर्बंध दूर होतांच तो कुठला सुटणार! त्याच ध्येयांचे अनुषंगानें स्वदेशीवर, हिंदूंच्या एकतेवर, अस्पृश्यता-निवारणावर, हिंदुध्वजावर, सशस्त्रतेवर वगैरे त्यांनीं सुमारें हजार ओळी भरतील एवढी कविता केली आहे. इतकी अल्प रचना होण्याचें कारण म्हणजे फुरसतीचा अभाव हेंच होय. राष्ट्रोद्धारासाठीं अखंड तळमळत राहून त्याच्या अनेकांगीण प्रयत्नासाठीं झिजणें व झिजायला जागें करणें यांतच त्यांचा जन्म गेला व जात आहे. जो फुरसतीचा वेळ सांपडला त्यांत निग्रहानें व कळकळीनें त्यांनीं जी कविता केली त्यांतील प्रकाशित व उपलब्ध अशी कविता जवळ जवळ अकरा हजार ओळींची झाली आहे. याशिवाय प्रकाशित परंतु जप्त, प्रकाशित परंतु नाटकांतून विखुरलेली, लिहिलेली परंतु विस्मृत, लिहिलेली परंतु अनेक झडत्यांच्या वेळीं कागद हलवतांना हरवलेली, संग्रहीं असलेली परंतु छापली तर जप्त होण्याजोगी व तुकड्यांवर लिहून पडलेली पण न सुधारलेली अशी आणखी दोन तीन हजार ओळी कविता असण्याचा संभव आहे. प्रकाशित व उपलब्ध कविता कशी आहे, त्यांत काव्यगुण किती आहेत, सरसता, कल्पकता, सूचकता वगैरे त्यांत किती आहेत, तिच्यांत अनन्यसाधारणत्व कोणतें आहे व मराठी आधुनिक कवितेंत तिचें कोणतें स्थान आहे हें निरनिराळे व्यासंगी ठरवणार आहेतच. त्यांच्या काव्यनिर्मितीचा संक्षिप्त इतिहास देण्याचें काम मीं पतकरलें होतें तें येथें संपवीत आहें.

---

# स्वातंत्र्यशाहीर सावरकर

## कवि साधुदास

बहुधा सन १९०३ सालची गोष्ट. नित्याप्रमाणें फर्ग्युसन कॉलेजच्या वार्षिक शिक्षणक्रमाचा तो प्रारंभदिन होता आणि मी प्रीव्हियसच्या वर्गांत दाखल झालों होतों. पहिलाच दिवस म्हणून प्रोफेसर भाटे यांचें प्रास्ताविक भाषण होऊन त्या दिवसापुरती सुट्टी झाली. सुट्टीनंतर ज्यूनियर बी. ए. च्या वर्गांत असलेल्या सावरकर नांवाच्या विद्यार्थ्याचें भाषण होणार आहे म्हणून जाहीर झालें होतें आणि मधला दिवाणखाना विद्यार्थ्यांनीं चिकार भरून गेला होता. अध्यक्ष-स्थानीं प्रोफेसर चिंतामण गंगाधर भानु यांची निवड करण्यांत आली होती. व्याख्यानश्रवणासाठीं जमलेल्या विद्यार्थिवर्गांत उपरोक्त सावरकरासंबंधीं एक प्रकारची आदरमिश्र कुतूहलबुद्धि असलेली मला जाणवत होती. अध्यक्षांची निवड होऊन अध्यक्ष स्थानापन्न झाले आणि काळी टोपी व काळा कोट घातलेला, साधारण उंचेल्या बांध्याचा, मध्यम अंगलोटाचा आणि निमगोऱ्या वर्णाचा एक विद्यार्थी बोलावयास उठला. त्याच्या स्वागतासाठीं झालेल्या टाळ्यांच्या गजराला गिळून त्याचा आवाज पुष्कळच उंच लागला आणि त्यांतच त्याचा अस्खलित वाक्प्रवाह सुरू झाला. त्याच्या नमनानेंच श्रोत्यांच्या मनांची पकड घेतली आणि एका क्षणांत चोहोंकडे निस्तब्ध शांतता पसरली! त्याच्या मुद्रेंत, आविर्भावांत, वाक्योच्चारांत, किंबहुना प्रत्येक शब्दांत एक प्रकारचा जिवंत उमाळा आणि दुर्दम्य आवेश जाणवत होता. आपण कोण, आपला देश केवढा संपन्न, त्याची संस्कृति व परंपरा किती उज्ज्वल होती, आज त्याची स्थिति काय झाली आहे, आणि आपण आपलें स्वत्व विसरून पाश्चात्य संस्कृतीच्या कसे आहारीं चाललों आहोंत, इत्यादि विषयांचें तो विवेचन करीत असतांना श्रोतृसमुदायाला अक्षरशः विजेचे झटके बसत होते! स्वदेशाभिमान, स्वराज्यप्रीति, राष्ट्रीयभावना इत्यादि कल्पना त्या काळीं मुग्ध अवस्थेंत होत्या आणि त्या उघडपणें प्रकट करण्याचें धारिष्ट फारच थोडया वक्त्यांना किंवा लेखकांना होत होतें. तथापि या धाडसी विद्यार्थ्याच्या अमोघ वक्तृत्वांत त्या कल्पना इतक्या सहज आणि जोरकस रीतीनें उमटून गेल्या, कीं व्याख्यानास उप-स्थित असलेल्या एकूण एक विद्यार्थ्यांचीं हृदयें उचंबळून आलीं आणि कित्येकांच्या

डोळ्यांतून तर आंसवेंच उभीं राहिलीं! भेदरट काळजांना धीर देणारें आणि धीट काळजांना स्फूर्ति देणारें हें नादब्रह्म अखेर वातावरणांत विलीन झालें, पण श्रोतृ-समूहाची समाधि उतरण्यास बराच वेळ लागला. व्याख्यानांतील ओजस्वी विचारांची आंच विद्यार्थिगणाला मानवली, पण ती अध्यक्षांना सहन झाली नाहीं. "मुलांनो, हा सावरकर शुद्ध राक्षस आहे, त्याचे सैतानी विचार तुम्ही अगदीं मनावर घेऊं नका," इत्यादि शेलक्या पुष्पांजलीची बरसात करून त्यांनीं व्याख्यानाची धग शमविण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा लवमात्र उपयोग झालेला दिसला नाहीं!

या प्रसंगानें सावरकरांची मला प्रथम माहिती झाली आणि त्याच वेळीं ते स्वातंत्र्यशाहीर आहेत हीही गोष्ट मला उमगून आली. "शाहीर" शब्द आरबी भाषेंतला असून पोवाडे, लावण्या यांसारखीं कवनें रचणारांना तो सामान्यतः लावला जातो. पण त्या शब्दाचा याहून व्यापक असा जो दुसरा अर्थ 'राष्ट्रीय किंवा वीरवृत्तिप्रधान कवनें रचणारा' असा आहे त्या अर्थानें मी सावरकरांना स्वातंत्र्य-शाहीर असें म्हणतों. पेशवाईच्या अमदानींत जे शाहीर होऊन गेले, त्यांतील कित्येकांचीं कवनें अत्यंत ओजस्वी आणि स्फूर्तिदायक निपजलीं आहेत, पण त्यांची स्वातंत्र्याची आणि वीरवृत्तीची कल्पना, त्या काळास अनसरून प्रायः मराठेशाही-पुरतीच मर्यादित होती. सारा भरतखंड हें आपलें हिंदूंचें राष्ट्र आणि त्याचें स्वातंत्र्य हें आपलें अभिप्रेत ध्येय, ही कल्पना अगदीं अलीकडे प्रादुर्भूत झाली आणि या कल्पनेवर कवनें रचणाऱ्या अर्वाचीन शाहिरांत अग्रेसरत्वाचा मान निर्विवाद सावरकरांचा आहे. सावरकरांच्या चरित्राचे दोन कालखंड कल्पितां येण्या-सारखे आहेत, एक अंदमानाहून सुटून येईपर्यंतचे सावरकर आणि दुसरा तदनंतरचे सावरकर. पहिल्या कालखंडांत सावरकरांचें राष्ट्रप्रेम व स्वातंत्र्यलालसा भावनेनें उचंबळत होती आणि त्यांचा बराचसा काल शिक्षणांत व बंदिवासांत गेल्यामुळें त्या भावनेला कवनाच्या रूपानें प्रकट होण्यास फुरसत मिळत होती. या काल-खंडांत आलेले अनुभव आणि सोसलेले कष्ट सावरकरांच्या विचारांना परिपक्व वळण देण्यास उपयोगी पडले आणि दुसऱ्या कालखंडांत सावरकर राष्ट्रीय कार्यकर्ते व राजकारणपटु पुढारी म्हणून चमकूं लागले, त्यांच्या कार्याचा व्याप वाढला आणि भावनेची जागा तारतम्यबुद्धीनें घेतली. अर्थात् सावरकरांची अंतःस्फूर्ति कवनाचे रूपानें बाहेर न पडतां कृतीचे रूपानें बाहेर पडूं लागली. अशा रीतीनें 'स्वातंत्र्य-शाहीर' सावरकरांचें रूपांतर 'स्वातंत्र्यवीर' सावरकरांत झालें, तथापि त्यांच्या

अंतरंगांत खळबळणारी राष्ट्राच्या स्वातंत्र्याची लालसा कायमच राहिली. पहिल्या कालखंडांत तिचा ओघ एखाद्या फेसाळ व ओढाळ लोंढ्यासारखा उसळत होता, तोच पुढें दुसऱ्या कालखंडांत एखाद्या गंभीर व प्रशांत जलप्रवाहासारखा मार्गक्रमण करींत चालला आहे, एवढें फार तर म्हणतां येईल.

सावरकरांची राजकीय मतप्रणाली सुप्रसिद्ध आहे. हिंदुस्थान अविभाज्य असून तो हिंदूंचा आहे आणि हिंदूंचाच राहिला पाहिजे हा त्यांचा मूलमंत्र आहे. त्यांची ‘ हिंदुत्वा ’ ची व्याख्या फार व्यापक आहे आणि तिजमध्यें उच्चनीचभाव त्यांना मान्य नाहीं. अल्पसंख्याक जमातींना आंतरराष्ट्रीय नियमानुसार योग्य ते हक्क आणि संरक्षण देण्यास ते तयार आहेत, मात्र त्यांचें अतिक्रमण सहन करण्यास ते कबूल नाहींत. स्वराज्यप्राप्तीकरितां जी चळवळ करावयाची, तिजमध्यें या जमातींचें साह्य मिळालें तर त्यांना पाहिजे आहे, नाहीं मिळालें तर त्याकरितां ते अडून रहाणार नाहींत आणि या जमाती विरोध करूं लागल्या तर त्यांच्या विरोधाशीं झगडा करून आपण आपली चळवळ चालवूं, असा त्यांचा बाणा आहे. त्यांच्या राजकीय तत्त्वज्ञानाला अधिष्ठानभूत असलेला त्यांचा राष्ट्राभिमान अनेक संकटांतून आणि मोहाच्या साधनांतून तावून सुलाखून निघाला आहे. विशेषतः ऐन तारुण्याच्या भरांत विलायतेच्या मोहप्रचुर वातावरणांत सुद्धां पाश्चात्य संस्कृतीची छाप त्यांच्या मनावर लवमात्र पडूं शकली नाहीं. ते हिंदु संस्कृतीचा जो धगधगीत अभिमान घेऊन बॅरिस्टर होण्यासाठीं विलायतेस गेले, तोच किंबहुना अधिकच प्रखर अभिमान घेऊन मायभूमीस परत आले, या गोष्टीचें फार कौतुक वाटतें. या बाबतींत त्यांनीं महात्मा गांधीजींना सुद्धां दिपविलें म्हटलें तरी चालेल. हा हिंदुत्वाचा अभिमान सावरकरांच्या शाहिरी कवनांतून ओतप्रोत भरलेला आढळून येईल. सावरकरांची ही राष्ट्रीय वृत्ति जिवंत आणि निर्भेळ असल्यामुळें त्यांच्या खासगी जीवनक्रमांत आणि सार्वजनिक कार्यक्रमांत केव्हांच विसंगति उत्पन्न झाली नाहीं. गडकरी आणि त्यांच्या नंतरचे आधुनिक कवि यांपैकीं कित्येकांनीं क्वचित् शाहिरी कवनें केलीं आहेत, त्यांतून उत्कृष्ट प्रतिभेचा विलासही आहे, पण तीं तात्कालिक स्फूर्तीचीं द्योतक ‘ काव्यें ’ आहेत, शाश्वत आणि एकजिनसी उमाळ्याचीं द्योतक शाहिरी कवनें खास नाहींत. या अनन्यसाधारण विशेषामुळें व्यक्ति सावरकर, शाहीर सावरकर किंवा वीर सावरकर हे “ अंग मन जैसें कापुराचें ” या ज्ञानेश्वरी न्यायानें केव्हांही एकरूपच असल्याचें दिसून येईल.

सावरकरांचें राष्ट्रीय तत्त्वज्ञान हिंदुस्थानच्या पचनीं पडण्यास थोडा उशीर लागला, प्रथम त्याला अत्यंत प्रतिकूल वातावरणांतून आपला मार्ग काढावा लागला, पण क्रमाक्रमानें तें आपला प्रभाव पाडूं लागलें आणि अखेर त्याचीच छाप बहुजनसमाजावर स्थिर होणार यांत शंका नाहीं. याचें एकच कारण म्हणजे इतर कोणत्याही राष्ट्रीय संस्थेपेक्षां त्यांचें तत्त्वज्ञान सनातन हिंदुधर्माच्या शिकवणीस अधिक अनुसरून आहे हें होय. परधर्म भयावह मानून स्वधर्माची जोपासना करणें, आपल्या रास्त हक्कांकरितां झगडणें, आणि त्याकरितां अवश्य तेव्हां हिंसासुद्धां करणें, अज्ञ समाजाचा बुद्धिभेद न करितां लोकसंग्रहाकरितां त्यांची संघटना करणें, सर्वांना समदर्शित्वानें वागविणें आणि फलाची अपेक्षा न करितां प्राप्त कर्तव्य करीत राहणें, इत्यादि मतप्रणाली हिंदु समाजाच्या हाडींमासीं शतकानुशतकें मुरून राहिली असल्यामुळें सावरकरांच्या द्वारां तिचा पुन्हा उठाव व्हावा यांत नवल नाहीं. सावरकरांचें हें राष्ट्रीय तत्त्वज्ञान बीजरूपानें त्यांच्या शाहिरी कवनांतून उमाप पसरलें आहे. अशा प्रकारच्या उच्च तत्त्वज्ञानाचें अधिष्ठान, ईश्वरदत्त उत्कृष्ट प्रतिभा, तिला इतिहास-पुराणादिकांच्या परिशीलनानें मिळालेली प्रेरणा, आणि आपल्या देश-धर्म-संस्कृतींचा जाज्वल्य अभिमान, इतकीं अनुकूल साधनें मिळाल्यामुळें सावरकरांचें शाहिरी कवन अत्यंत स्फूर्तिदायक, निर्मळ व प्रभावी निपजलें आहे.

सावरकरांच्या काव्यरचनेस प्रारंभ सन १८९३ चे सुमारास म्हणजे त्यांच्या वयाच्या अकराव्या वर्षी झाला आणि प्रसंगाप्रसंगानें तो क्रम त्यांची अंदमानाहून सुटका होईपर्यंत म्हणजे सुमारें वीस वर्षांहून अधिक काळ चालला. एवढ्या अवधींत त्यांनीं रचलेल्या कवनांची संख्या दहा हजार ओळींच्या आसपास भरेल. त्यांच्या काव्याचे बहुतेक विषय हिंदुधर्मावर, हिंदुस्थानावर किंवा हिंदु संस्कृतीवर परकीयांकडून झालेल्या आक्रमणाच्या विषादपूर्ण आठवणी, आपल्या पारतंत्र्या-विषयीं वाटणारी उद्विग्नता, आपल्या प्रतापी पूर्वजांचें गुणगान, इत्यादि एकजात राष्ट्रीय स्वरूपाचे आहेत, म्हणूनच त्यांच्या काव्याला सामान्यतः शाहिरी कवनांचें स्वरूप आलें आहे. तथापि या एकदेशीयत्वांतही उत्कृष्ट काव्याला लागणारी कोणतीही कसोटी त्यांच्या काव्याला चांगल्या प्रकारें लागण्याजोगी आहे. त्यांच्या कवितांत बहारीच्या कल्पनांचा विलास आहे, रसाचा ओजस्वी प्रवाह आहे, गोड प्रसाद आहे, भावनेला गुदगुल्या करणारा गुंजारव आहे, आणि सर्वांहून विशेष म्हणजे वाचकांच्या हृदयाला जाऊन भिडणारा आंतड्याचा पीळ आहे. सावरकरांच्या

कवनांत कविजनांच्या आवडत्या शृंगाराला बहुमानाचें स्थान नाहीं आणि उत्तान शृंगाराला तर मुळीं स्थानच नाहीं. आपल्या राष्ट्राच्या पारतंत्र्याचें शल्य त्यांच्या मनांत सतत सलत असल्यामुळें तो–ती–विषयक प्रणयप्रधान कवनें रचण्यास लागणारी स्थितप्रज्ञता त्यांच्या मनांत उत्पन्न होऊं शकलीच नसावी! सावरकरांच्या कवनांत दोषच काढावयाचा म्हटला तर क्वचित् क्लिष्ट रचनेचा आढळतो, पण तोही फार विरळ आहे.

आतां सावरकरांच्या शाहिरी कवनांचे थोडे मासले वाचकांस सादर करूं. पुढील उताऱ्यामधील कल्पनेची अफाट भरारी वाचकांना गुंग करून सोडील. “ जगन्नाथाचा रथोत्सव ” या कवितेंत सावरकर म्हणतातः—

“ ऐश्वर्यें भारी, या अशा ऐश्वर्यें भारी
महाराज आपुली कथा ना कुठें निघे स्वारी! ध्रु०
  दिक्–क्षितिजांचा दैदीप्य रथ तुझा सुटतां
  ह्या कालपथाच्या अतुट उतरणीवरता
  नक्षत्र–कणांचा उठे धुराळा परता
युगक्रोश दूरी, मागुती, युगक्रोश दूरी
महाराज आपुली कथा ना कुठें निघे स्वारी?

पुसूं नयेचि परी, पुसतसें, पुसूं नयेचि परी
मिरवणूक ही किमर्थ अथवा कुठें निघे स्वारी?
दुज्या कुण्या द्वारीं, जावया, दुज्या कुण्या द्वारीं
किंवा केवळ मिरवत येऊं परत निजागारीं
  ह्या सूर्यशतांच्या किती मशाली जळती
  मधुनीच शतावधि चंद्रजोति या उडती
  सरसरत बाण हे धूमकेतुचे सुटती
कितिदा आणि तरी, हीहि तैं, कितिदा आणि तरी
उठे चमकुनी रात्रि पुरातन तिच्या अंधकारीं ” २

पुढील उताऱ्यांत स्वतंत्रतादेवीला जी कळवळून हांक मारली आहे, ती कोणाही हिंद-पुत्राच्या हृदयांत कालवाकालव करून सोडील!

" जयोस्तुते श्रीमहन्मंगले ! शिवास्पदे शुभदे
स्वतंत्रते भगवति ! त्वामहं यशोयुतां वन्दे ध्रु०
राष्ट्राचें चैतन्य मूर्त तूं नीति–संपदांची
स्वतंत्रते भगवति ! श्रीमती राज्ञी तूं त्यांची
परवशतेच्या नभांत तूंची आकाशीं होसी
स्वतंत्रते भगवती, चांदणी चमचम लखलखसी
गालावरच्या कुसुमीं किंवा कुसुमांच्या गालीं
स्वतंत्रते भगवती, तूंच जी विलसतसे लाली
तूं सूर्याचें तेज, उदधिचें गांभीर्यहि तूंची
स्वतंत्रते भगवती, अन्यथा ग्रहण नष्ट तेंची
मोक्ष मुक्ति हीं तुझींच रूपें, तुलाच वेदांती
स्वतंत्रते भगवती, योगिजन परब्रह्म वदती
जें जें उत्तम, उदात्त, उन्नत, महन्मधुर, तें तें
स्वतंत्रते भगवती, सर्व तव सहचारी होतें

हे अधम-रक्त-रंजिते । सुजन-पूजिते । श्रीस्वतंत्रते
तुजसाठिं मरण तें जनन
तुजवीण जनन तें मरण
तुज सकल चराचर शरण
भरत-भूमिला दृढालिंगना कधिं देशिल वरदे
स्वतंत्रते भगवति ! त्वामहं यशोयुतां वन्दे " १

आपल्या 'प्रियकर हिंदुस्थाना'चा इतर देशांवर बिनदिक्कत शह ठेवून देतांना सावरकरांचा कोटिक्रम पाहण्यासारखा आहे:—

" सकल जगामधिं छान । अमुचें प्रियकर हिंदुस्थान
केवळ पंचप्राण । अमुचें सुंदर हिंदुस्थान ॥ ध्रु० ॥

बहुत पाहिले, बहुत ऐकिले देश परी ते सान
सान मिसर, पाताळ, आंग्लभू, सान चीन, जापान १

बहुत गिरी परि तुझाच गिरिवर हिमालयाचा मान
कवण नदी दे श्रीगंगेसम पूत सुधा–जल–पान २

कस्तूरी–मृग–परिमळ–पूरित जिचें फुलावें रान
प्रभातकालीं कोकिल–किलकिल–कूजित आम्रोद्यान ३

यज्ञधूमसौगंधमनोहर जिचें साम–रव–गान
ऐकुनि येती तिथें कराया देव सोमरसपान ४

जननि ! तुझ्या सन्मानरक्षणीं अर्पुं रणीं हे प्राण
शत्रुकंठ भंगोनि घालुं तुज दारुण रक्तस्नान " ५

या प्रियकर हिंदुस्थानाच्या वियोगानें तळमळणारे सावरकर इंग्लंडांत गुंतून पडले असतां त्यांच्या हृदयाची होणारी तडफड मध्यें आडव्या पडलेल्या समुद्राला उद्देशून पुढील शब्दांनीं व्यक्त झाली आहेः—

" नभिं नक्षत्रें बहुत, एक परि प्यारा । मज भरतभूमिचा तारा
प्रासाद इथें भव्य, परी मज भारी । आइची झोपडी प्यारी
तिजवीण नको राज्य, मज प्रिय साचा । वनवास तिच्या जरि वनिंचा

भुलविणें व्यर्थ हें आतां, रे
बहु जिवलग गमते चित्ता, रे
तुज सरित्पते जी सरिता, रे
तद्विरहाची शपथ घालितों तुजला । सागरा प्राण तळमळला " १

स्वातंत्र्यप्राप्तीकरितां पेटविलेल्या होमकुंडांत, न जाणों स्वतःची प्राणाहुति द्यावी लागेल, अशा भावनेनें सावरकरांनीं जें ' मृत्युपत्र ' करून ठेवलें आहे, त्यांत आपल्या मिळकतीची व्यवस्था पुढीलप्रमाणें केली आहेः—

" हे मातृभूमि ! तुजला मन वाहियेलें
वक्तृत्व वाग्विभवही तुज अर्पियेलें
तूंतेंचि अर्पिलि नवी कविता रसाला
लेखाप्रती विषय तूंचि अनन्य झाला १

त्वत्स्थंडिलीं ढकलिलें प्रिय मित्रसंघा
केलें स्वयें दहन यौवनदेहभोगा
त्वत्कार्य नैतिक सुसंमत सर्व देवां
त्वत्सेवनींच गमली रघुवीरसेवा २

त्वत्स्थंडिलीं ढकलिली गृह वित्त मत्ता
दावानलांत वहिनी नवपुत्र कांता
त्वत्स्थंडिलीं अतुलधैर्य वरिष्ठ बंधु
केला हवी परम कारुण पुण्यसिंधु ३

संतान या भरतभूमिस तीस कोटी
जे मातृभूमिरत सज्जन धन्य होती
हें आपलें कुलहि त्यांमधिं ईश्वरांश
निर्वंश होउनि ठरेल अखंड वंश ४

कीं घेतलें व्रत न हें अम्हि अंधतेनें
लब्धप्रकाश इतिहास-निसर्ग-मानें
जें दिव्य दाहक म्हणूनि असावयाचें
बुद्धयाचि वाण धरिलें करिं हें सतीचें ५

स्वातंत्र्यभक्तांना छळ सोसावा लागतो आणि त्यांच्या मातृभूमीला अश्रु गाळावे लागतात. पण कालांतरानें या अश्रुपुराच्या " पाण्यांतली आग " जी भडकते, तिचा प्रभाव सावरकरांनीं असा वर्णिला आहे:—

" माते ! अद्‌भुत हे पहा भडकले पाण्यांतले जाळ ते
सत्ता घे छिनुनी बळेंचि तव जो त्याच्या बळा जाळते
बंदीमाजि तुवां छळासि सहतां जे गाळिलेसी अहा
अश्रू घेउनि पेट तेचि उठती जाळूं छळा त्या पहा १

कांहीं काळ अशींच गाळ तरि तूं उत्तप्त हीं आंसवें
कांहीं काळ असाच शोक करि तूं, सोशीं न जें सोसवे
जों जों पुष्टविशील आग असली अश्रूंसि ढाळूनिया
तों तों टाकिल ती छळासि छळकासंगेंचि जाळूनिया " २

'गोमांतक' काव्याच्या प्रवेशद्वारांत सावरकरांनीं सृष्टिवर्णनाचा जो गालिचा आंथरला आहे तो आपल्या मार्दवानें, सौष्ठवानें आणि प्रसादसंपन्नतेनें रेव्ह॰ टिळकांची आठवण करून देईल असाच आहे:—

" होती एक नदी नामें दारका तापहारका
प्रतिपच्चंद्रलेखेव तन्वंगी धवलोदका १

शोभवी दारकेसी हा तटग्राम लहानसा
फुलांचा झुबका कोण्या रानमोगरिला जसा २
हिरवीचार चौभोंतीं शेती दूरवरी फुले
सिंधूंत बेट कीं तैसें गांव तींत मधें खुले ३
मोटांतूनि पडे धों धों पाणी पाणथळामधीं
स्निग्धगंभीर नादानें मोर नाचति त्या तधीं ४
देवालय महादेवाचें जें सन्निध जीर्णसें
धर्मकेंद्र समाजाचा एक हा उरला असे ५
येथें प्रदक्षिणा भोंती घेतांना युवती, मुलें
त्यांचीं गुंफित बैसावीं चाफ्याचीं गळतीं फुलें " ६

सावरकरांनींही 'पहिलें चुंबन' वर्णिलें आहे. पण तें 'लावण्य-गुण-कुलवती आणि पतिव्रता' अशा सतीचें आहे. त्यांत छचोर उत्तान शृंगाराचा गंधही नाहीं. 'कमला' काव्यांतला एक प्रसंग आहेः—

"तोंचि सर्सरलें कांहीं कुंजांतूनि पहा पहा !
कोण तो ? कमले येई ! चोर ओळखिचाच हा १
आला संभाळ ! आलाची ! थांबरे क्षणची तरी
असावधावरी घाला रीत ही न तुझी बरी २
धरिलाचि परी पक्षी, वार्धक्यें अजि आंधळी
वदतीच नभोवाणी 'धर्मयुद्ध न हें !' तरी ३
चोरट्या कटिला गुंफी कांपता कर तो झणीं
लाजऱ्या लागती गाला ओठ लाजत त्यांहुनी ४
साचीकृताननना, लज्जाचित्र, हृद्य अशा तई
प्रियेच्या पहिल्याची तो चुंबनासि युवा पिई " ५

सावरकरांना हिंदूंच्या 'चढत्या काळाच्या' कल्पनेनें कसें स्फुरण येतें, याची कल्पना त्यांच्या 'महाराष्ट्र-भाटाचें विजयगीत' या कवनांतील पुढील उताऱ्यावरून सहज येईलः—

"धन्य भाग्य मम ! आज न मजला गाणें जातिघ्नाहि रणा
अहिंदुहस्तें घडल्या किंवा घोर हिंदवी संहरणा ! १
"

देवारींच्या देशारींच्या न्याय्य गाउनी निःपाता
धन्य भाग्य मज आदिकवींच्या भाग्यीं घेऊं ये वांटा २
धन्य भाग्य ह्या गात्यांचें तें धन्य भाग्य या श्रोत्यांचें
जयार्थ मरत्या लढत्यांचें, यांवांचुनि विजया बघत्यांचें ३
जयजयकारें भरा अंबरा, करा घरोघर महोत्सवा
परम मांगलिक हिंदुमात्र हो वार्ता ये आतांचि नवा ४
हिंदू वीरांचा कीं श्रीशें असे यशस्वी हट केला
आज हिंदवी जरिपटका कीं पुन्हा पोचला अटकेला!'' ५

पण स्वातंत्र्यशाहीर सावरकरांच्या वाग्गंगेतील असे चषक वाचकांना कितीही सादर केले तरी ते अपुरेच पडणार आहेत; त्यापेक्षां त्या गंगेच्या पात्राकडेच सरळ बोट दाखविणें इष्ट होईल. एक गोष्ट खरी आहे कीं, सावरकरांच्या कवनांच्या गुणांच्या प्रमाणांत त्यांना मान्यता लाभली नाहीं, पण या अनवस्थेचीं कारणें अगदीं उघड आहेत. एक तर सावरकरांच्या कवितेला सरकारी जप्तीचा अज्ञातवास भोगावा लागला. तुकाराम महाराजांचे अभंग तेरा दिवस लुप्त झाले होते, तर सावरकरांच्या कवनांना तितकीं वर्षेंही अंतर्हित राहण्यास पुरलीं नाहींत! दुसरी गोष्ट अशी कीं, सावरकरांचीं कवनें सरकारी अवकृपेला पात्र झाल्यामुळें सोवळ्या विद्यापीठांच्या मान्यतेला ओघानेंच पारखीं झालीं आणि अलीकडे त्यांतील कित्येकांवरची बंदी उठली असली तरी विद्यापीठांतून त्यांना प्रवेश मिळण्याचा संभव अजून थोडा दूरच आहे! तोच प्रकार लोकाभिरुचीचाही म्हणतां येईल. शृंगारिक कवनें आणि बोलपटांतील गाणीं यांनीं गेल्या कांहीं वर्षांत जो धुमाकूळ घातला, त्यांत सावरकरांच्या ओजस्वी रसवंतीला संचारस्वातंत्र्य मिळणेंच शक्य नव्हतें. तथापि आतां सर्वच दृष्टींनीं काळ पालटला आहे. 'स्वातंत्र्यवीर' सावरकरांची कामगिरी आपला प्रभाव जसजसा पाडीत आहे, तसातसा देशाचा शृंगारिक कैफ उतरून त्याची वीरवृत्ति जागृत होत आहे, अर्थात् 'स्वातंत्र्यशाहीर' सावरकरांचीं कवनेंही आज ना उद्यां सर्वमान्यता पावतील यांत शंका नाहीं. तो काल जवळ आला आहे या निश्चित खात्रीनें वाटणारें समाधान भोगणें आणि त्याला अधिकाधिक जवळ आणणाऱ्या शाहीर-वीर सावरकरांना 'एकसष्टी'च्या निमित्तानें उदंड आयुरारोग्य चिंतणें हें हिंदुमात्राचें प्रिय कर्तव्य आहे.

---

# ‘ महाराष्ट्र-भाट ’ सावरकर

## श्री. यशवंत नरसिंह केळकर

### स्वीकृत पदवीचें यथार्थत्व

‘ गोमांतक ’ काव्याच्या प्रसिद्धीच्या वेळीं सावरकरांनीं स्वतःस महाराष्ट्र-भाट हें टोपणनांव स्वीकारलें होतें. त्या वेळीं सावरकर बंदिवासांत असल्यामुळें त्यांना तें टोपणनांव स्वीकारणें भाग पडलें. तथापि स्वीकारलें तें सार्थच होतें यांत शंका नाहीं. कारण खरोखरच महाराष्ट्राचीं प्रतापगीतें इतक्या ओजस्वी रीतीनें गाणारा कवि आधुनिक मराठी कविपरंपरेंत त्यांच्यासारखा दुसरा कोणीच झालेला दिसत नाहीं. सावरकरचरित्र वाचतांना, त्यांच्या अगदीं बालवयापासूनच त्यांना मराठ्यांच्या इतिहासानें वेडें करून सोडलें होतें, असें आढळून येतें. तें त्यांचें इतिहासप्रेम वाढत्या वयाबरोबर किंवा वाढत्या ज्ञानाबरोबर कमी तर झालें नाहींच, उलट वाढतच गेलें. झालें असेल तर इतकेंच कीं, त्यांत अधिकाधिक चिकित्सकपणा किंवा डोळसपणा आला. पण म्हणूनच तें त्यांचें प्रेम अधिक विशुद्ध आणि म्हणूनच दृढतर झालें. वयाच्या बाराव्या वर्षी त्यांनीं रचलेला सवाई माधवरावाचा पोवाडा आणि वयाच्या बेचाळिसाव्या वर्षी त्यांनीं लिहिलेला हिंदुपदपादशाही हा ग्रंथ हीं दोन्ही टोकें लक्षांत घेतलीं असतां तें स्वच्छच दिसून येतें. त्यांच्या भाषणांत हटकून येणारे आणि अभिमानानें ऊर भरून सोडणारे शिवाजीचे, शनिवारवाड्याचे किंवा भाऊसाहेब पेशव्यांचे उल्लेख हे त्या निस्सीम प्रेमाचे द्योतक होत. त्यांचे बाजी–तानाजीचे पोवाडे किंवा ‘ आर्यांच्या देशावर म्लेंच्छांचा घाला ’ अशा आरत्या किंवा ‘ हिंदु–नृसिंह ’ अशासारख्या त्यांच्या कविता, या सोडाच. परंतु ‘ कमला ’ ‘ गोमांतक ’ यांसारखीं मोठीं काव्येंही भाग्यशाली मराठ्यांच्या इतिहासाच्या पार्श्वभूमीवरच त्यांनीं लिहिलेलीं आहेत. आणि म्हणूनच महाराष्ट्रभाट हें टोपणनांव म्हणून प्रसंगवशात् त्यांनीं स्वतःकरितां स्वीकारलें असलें, तरी आतां उलट महाराष्ट्रानेंच त्यांना तें पदवी म्हणूनच खरोखर अर्पण करावयास हवें.

### भाट कीं शाहीर ?

मराठेशाहीच्या इतिहासांत जुन्या किंवा प्रचलित इतिहासावर वीररसात्मक काव्य-

रचना करणाऱ्या कवींना शाहीर अशी सर्वसामान्य संज्ञा होती. भाट अशी नव्हती. कारण भाट कोणी असले, तरी शाहिरांच्या मानानें त्यांची संख्या शंभरांत एक इतकी अत्यल्प असे. शहाजीमहाराज, शिवाजीमहाराज किंवा शाहूमहाराज वगैरेंच्या पदरीं असलेल्या भाटांचीं पांचसहाच नांवें सापडतात. आणि त्यांनींही पदरीं भाट बाळगले ते आपल्या मूळ रजपूत कुलाचारास अनुसरून. पदरीं भाट बाळगण्याची प्रथा राजपुतान्यांतील–हिंदुस्थानांतीलच आहे.

भाटही शाहिराप्रमाणेंच वीरकाव्यें रचीत व गात असें असलें तरी शाहिरांत व भाटांत आणखी एक फरक आहे, तो लक्षांत घेतला पाहिजे. शाहीर हा कांही कांहीं वीररसात्मक प्रसंग किंवा घटना निवडून त्यांवर स्फुरणदायी कवित्व रचीत; व ते ते प्रसंग मूर्तिमंत डोळ्यापुढें उभे करून श्रोत्यांना चैतन्य आणीत. भाट तसलें काम करी; शिवाय त्याला आणखीही दुसरें कर्तव्य असे. तो नुसताच प्रभावशाली कवि नसे, तर तितकाच विश्वसनीय इतिहासकारही असे. ज्या घराण्याच्या पदरीं जो भाट असेल, त्याच्याजवळ त्या त्या राजघराण्याच्या पिढ्यांचा इतिहास छंदोबद्ध रीतीनें संग्रहित केलेला असे. भाट कवित्वरचनेंत जसा वाकबगार असेल, त्याप्रमाणें आपल्या संग्रहित इतिहासांतील स्फूर्तिदायक प्रसंग निवडून ते गाऊन प्रसंग-विशेषीं आपल्या धन्याला कार्यप्रवण करण्याचें कर्तव्य तो यथाशक्ति पार पाडी. शाहीर आणि भाट यांच्यांत आणखीही एक फरक सांगतां येईल तो हा कीं, भाट हे एखाद्या राजघराण्याच्या पदरीं वंशपरंपरा राहात. शाहिरांची मात्र तशी स्थिति नाहीं. यद्यपि कांहीं शाहिरांना लागोपाठ एकदोन पिढ्या 'दरबारी शाहिरा' चा मान क्वचित् केव्हां मिळालेला आढळत असला तरी शाहीर हे सामान्यतः स्वतंत्र धंदा चालवूनच राहात असत.

वरील विवेचनावरून सावरकरांना शाहीर म्हणण्यापेक्षां भाट म्हणूनच संबोधणें अधिक समर्पक कां तें दिसून येईल. फक्त भाटांच्या वंशपरंपरा वृत्तीचा तेवढा आक्षेप येण्याचा संभव. परंतु महाराष्ट्रेतिहास हें जर एखादें राजघराणें कल्पिलं, तर त्याच्या पराक्रमी पिढ्यांची कोणतीच महत्त्वाची शौर्यशाली घटना त्यांनीं वर्णावयाची शिल्लक ठेविली नाहीं, हें त्यांचें कवित्व वाचणारांच्या लक्षांत येईलच.

## भाटांतला चांदभाट

असो. अशा रीतीनें सावरकरांना एकदां भाट म्हटल्यानंतर मग फिरून त्यांना नुसतें 'भाट' नव्हे, 'चांदभाटच' म्हटलें पाहिजे. चांदभाट म्हणण्याचें कारण

हें आहे कीं, चांदभाटाप्रमाणेंच सावरकर हे केवळ काव्यशूरच नव्हे तर प्रत्यक्ष कृतिशूरही आहेत. शाहीर काय किंवा भाट काय, हे एका अर्थानें इसापनीतींतील लष्करी बिगुलवाल्याप्रमाणें अंगचोर आणि आगलावेच असतात. म्हणजे ते स्वतः लढत नाहींत. मात्र आपल्या बिगुलानें आपल्या सैनिकांना चेव आणून त्यांना धारातीर्थी पाठवितात. सावरकरांची गोष्ट अगदीं निराळी आहे. म्हणजे ज्या देशभक्तीचा त्यांनीं उपदेश केला व ज्या क्रांतिकारक मार्गाचा त्यांनीं आपल्या कवित्वांतून किंवा पोवाडयांतून पुरस्कार केला तें सर्व त्यांनीं स्वतः आघाडीवर राहून आचरून दाखविलें व सर्व घाव छातीवर झेलले. चांदभाट असाच होता. सामान्यतः भाटाकडून शिपाईगिरीची अपेक्षा कोणीच करीत नाहीं. किंबहुना एकदां चांद-भाटालाच पृथ्वीराजानें भीमदेवाकडे लढाईआधीं सलोखा करतो का म्हणून पाहण्यास पाठविलें होतें त्या वेळीं भीमदेवानें उन्मत्तपणानें चांदभाटाची निर्भर्त्सना केली व 'भाटाचा मुलगा शब्दानें लढतो' असा टोमणा त्याला दिला! या आख्यायिकेंत तोच समज व्यक्त झालेला आहे. तथापि चांदभाट जितका शब्दशूर तितकाच खड्गशूर होता. त्यानेंच ताबडतोब भीमदेवावर हल्ला करून त्याचा पराभव केला. पृथ्वीराजाच्या प्रत्येक युद्धांत तो जातीनें लढला होता. एवढेंच नव्हे, तर अखेर पृथ्वीराजाकडून घोरीला मारविल्यावर चांदानें व पृथ्वीराजानें परस्परावर शस्त्र टाकून देहविसर्जन केलें व विटंबना करण्याचें श्रेय शत्रूंस मिळूं दिलें नाहीं. सावरकरांनीं चांदभाटाचा उल्लेख 'भारतवीणा बरदाई' असा अत्यंत गौरवपूर्ण केला आहे. सावरकरांनाही तीच भारत-वीणा ही पदवी तशीच शोभेल. चांदभाटानें विपुल कवित्व केलें; त्याचा 'पृथ्वीराजरासो' हा ग्रंथ महाभारताएवढा मोठा आहे म्हणतात. सावरकरांचीही ग्रंथरचना तशीच विपुल आहे. चांदभाटाचें वर्णन ग्रंथांतरीं पुढील शब्दांनीं केलें आहे—" तो मोठा धैर्यवान, उत्साही, चतुर, दीर्घदृष्टि, देवीभक्त, उत्कृष्ट वक्ता व नीतिशास्त्रज्ञ होता आणि त्याची कविता अत्यंत वीररसपूर्ण होती." हें वर्णन प्रत्येक बाबतींत सावरकरांशींही तंतोतंत जुळतें. फक्त 'देवीभक्त' या विशेषणाबद्दल थोडेंसें कुतूहल वाटण्यासारखें आहे; तथापि त्याचेंही समाधान करंदीकरांच्या सावरकरचरित्रवाचनानंतर सहज होतें. चरित्रकार लिहितात—

## देवीभक्तीचा खुलासा

" सावरकर घराणेंच देवीभक्त होतें. अगदीं लहानपणींच देवी-भागवतांतील यो मां जयति संग्रामे यो मे दर्पं व्यपोहति । यो मे प्रतिबलो लोके स मे भर्ता

भविष्यति ॥ " अशा श्लोकांतून व्यक्त झालेल्या स्वाभिमानाचें व दर्पाचें त्या श्लोकाच्या शब्दयोजनेंत पडलेलें प्रतिबिंब इत्यादि गुणविशेषांचा परिणाम त्यांच्या बालमनावर सहजगत्या होत गेला. ऐकून ऐकून सप्तशतीचा बहुतेक पाठ त्यांना मुखोद्गत झाला. त्या पाठामुळें व त्या पाठाचे मनावर जे संस्कार उमटले त्यामुळें हें मूल देवीभक्त बनलें. दहाबारा वर्षांचे असतांच ते देवी-पूजनांत गढून जाऊं लागले. लिहिण्यावाचण्यांत थोडी प्रगति झाल्यावर त्यांनीं स्वतःसाठीं देवी भागवताची मराठी पोथी मिळविली. ती पोथी वाचल्यानंतर तर बाल सावरकरांना असें वाटूं लागलें कीं, आपण ' दुर्गादासविजय ' नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ रचावा. राणा प्रताप, शिवाजीमहाराज इत्यादि देवीभक्तांचीं उदात्त चरित्रें त्यांच्या वाचनांत येऊं लागल्यामुळें त्यांना असें वाटलें कीं, जुन्या देवी-भक्तांचीं चरित्रें गाइल्यावर या आधुनिक देवीभक्तांचीं अगर दुर्गादासांचीं चरित्रेंही त्यांत गोवून टाकावीं. "

पण सावरकरांची ती देवीभक्ति बालपणानंतर नष्ट झाली नाहीं. तिची स्मृति त्यांना पुढेंही चिरकाल राहिली व १९१० मध्यें त्यांना पकडण्यांत आलें, त्या वेळीं आपणावर ओढवणाऱ्या भयंकर संकटांची व हालांची त्यांना तेव्हांच बरोबर कल्पना आली व ते हाल व तीं संकटें समाधानानें सहन करण्याचें सामर्थ्य देण्यासाठीं फिरून त्यांनीं रौद्रवेषधारी चंडिकेलाच आपल्या साहाय्यार्थ येण्यासाठीं विनवणी केली. " फांशीच्या छायेंत आपण उभे आहोंत हें त्यांस कळून चुकलेलें, त्या छायेंत प्रत्यक्षपणें असें त्यांचें हें पहिलेंच पाऊल पडतांना त्या उग्रभीषण कर्तव्यास तोंड देण्याचा जो असा प्रसंग त्यांच्यावर आला तो निभावून नेण्यास धैर्यस्फूर्तिही तितकीच उग्र-भीषण हवी होती. " व ती त्यांना चंडिकेच्या रूपांत मिळाली. ते लिहितात—

" विकराल क्रोधभरे अति भयंकरा
एक्या निज हस्तेंची छाटुनी स्वयें
खड्गानें आपुलेंच मुंड फल तसें
अन्या निज हस्तीं घे आणि अहो जी
रक्ताची धार उडे वरि उफाळुनी
लाल लाल चिकट विकट त्या गळ्यांतुनी
धार तीच घट घट त्या क्रुद्ध मुखें पी
पेल्यांतुनि लाल मद्य पी जसें कुणी !

पिउनि रक्त आपुलेंचि आपली तृषा
शांतवीत त्या प्रचंड रौद्र भीषणा
दंडधरा छिन्नमुंड मूर्तिसी नमो "
नमोनमः सहस्रधा ! प्रमत्तनर्तने !
तूंची कर्तव्यमूर्ति तूं जरी अशी !

## एक खुलासा

असो. अशा रीतीनें सावरकरांना शाहिरापेक्षां भाट आणि भाटांतही चांदभाटच म्हणणें कसें योग्य आहे व एकंदरींत महाराष्ट्र-भाट ही त्यांनीं घेतलेली संज्ञा कशी सार्थ आहे तें आपण पाहिलें. तथापि आणखीही एका गोष्टीचा खुलासा करणें प्राप्त आहे. तो असा कीं, सावरकर हे जन्मानें महाराष्ट्रीय म्हणून आणि शौर्यशाली महाराष्ट्रेतिहासाचे निस्सीम अभिमानी म्हणून ते महाराष्ट्रापुरते शंभर टक्के महाराष्ट्र–भाट असले तरी ते महाराष्ट्राइतकेच खरोखर भारताचेही भाट आहेत ! भारत म्हणजे हिंदुस्थान–सर्व प्रांतांनीं मिळून झालेला ' महाराष्ट्र '–अशा हिंदुस्थानांतील पराक्रमी वीरांचीं वीरकाव्यें त्यांनीं महाराष्ट्रीय वीरांइतक्याच तन्मयतेनें गाइलेलीं आहेत. सावरकरांना स्वातंत्र्य मिळवावयाचें होतें व आहे, तें कांहीं एकट्या महाराष्ट्रापुरतें खचित नव्हे. त्यांनीं १९०८–१० सालीं जी क्रांतीची चळवळ केली तींत त्यांचे संवगडी मद्रासी, बंगाली, पंजाबी असे अनेक भिन्नप्रांतीय होते व आजही सर्व भारताच्या प्रांतांना खाकोटीस मारून ते जें प्रचंड आंदोलन करीत आहेत तेंही हिंदूंच्या सर्व भारतासाठींच. सावरकरांचीं हिंदुध्वजादिक गीतें पाहिलीं तर किंवा गोमांतक काव्यांतील त्यांचें ' विजयगीत ' पाहिलें तर त्यांत विक्रम, शालिवाहन, चंद्रगुप्त, यशोधर्म, पुष्यमित्र किंवा सिंधांतील हिंदु राजा दाहीर किंवा पंजाबांतील जयपाळ किंवा राजपुतान्यांतील राणा प्रताप यांच्याबद्दल महाराष्ट्रीय वीरांइतकेंच अभिमानाचे व आपुलकीचे उद्गार आढळतील. शिखांबद्दल तर सावरकरांचा आदर निरतिशयच आहे. तो तसा नसता तर त्यांनीं श्रीबंदावीराचा पोवाडा स्वतंत्रपणें गाइलाच नसता किंवा आपल्या काव्यासाठीं गुरुगोविंदसिंहाचें चरित्र निवडलें नसतें. असें असतांही त्यांच्या उल्लेखांत मराठ्यांचा उल्लेख अधिक येतो. याचें कारण ते जन्मानें महाराष्ट्रीय आहेत हें तर स्वाभाविकपणेंच असेल, परंतु खरें मर्माचें कारण हें आहे कीं, गेल्या तीनशें वर्षांच्या इतिहासांत हिंदुत्वाचा झेंडा आसेतुहिमाचल नाचविण्याचा मान कोणीं मिळविला असेल तर तो

महाराष्ट्रांतील मराठ्यांनींच! भारताच्या इतिहास-कालाकाशांत विक्रम-चंद्रगुप्तां-सारखे देदीप्यमान तारे लकलकत असले तरी त्यांनीं फक्त मार्गदर्शन होऊं शकेल; परंतु प्रत्यक्ष उष्णता देणारा जाळ जवळच्या अग्नींतूनच मिळूं शकतो आणि तसा अग्नि गेल्या तीनशें वर्षांत महाराष्ट्रांतच तेवढा पेटलेला होता यामुळें मराठ्यांच्या वीरांचे उल्लेख त्यांना सहजगत्या अधिक स्फुरले तर तें पूर्णपणें समर्थनीयच होय.

## पहिले पोवाडेकार

आधुनिक मराठी वाङ्मयांत 'निबंधलेखना' चें दालन उघडण्याचा मान विष्णुशास्त्री चिपळूणकरांना दिला जातो किंवा विनोदी लेखनाचें आचार्यपद श्री. कृ. कोल्हटकरांना दिलें जातें. त्याप्रमाणें आधुनिक मराठी काव्यांतील पोवाड्यांच्या लेखनकार्याचा श्रीगणेशा करण्याचा मान निःसंशय सावरकरांकडेच जाईल. कारण त्यांच्या पूर्वी पोवाडे असे कोणींही लिहिलेले नाहींत, निदान उपलब्ध तरी नाहींत. राघो भंगऱ्याचा किंवा वासुदेव बळवंत फडक्याचा किंवा बुधवारवाडा जाळल्याचा पोवाडा अशिक्षित अडाणी शाहिरांनीं रचलेला केव्हां ऐकावयास मिळतो. टिळकांचाही असाच एक पोवाडा जाधव नांवाच्या मराठा इसमानें केलेला प्रस्तुत लेखकानें संशोधून त्रिकाळपत्रांत छापलाही होता. अशिक्षित बहुजनसमाजांत जुन्या मोळ्याला अनुसरून अशा तऱ्हेनें प्रचलित इतिहासावर पोवाडे, फटके किंवा लावण्या रचल्या गेल्याच असतील यांत शंका नाहीं, परंतु दुर्दैवानें तें सर्व कवित्व कधींही छापून प्रसिद्ध होऊं शकत नाहीं यामुळें तें असून नसून सारखेंच. इंग्रजी अमलांत पाश्चात्य शिक्षण-संस्कार झाल्यानंतर जें नवीन तऱ्हेच्या वाङ्मयाचें पुनरुज्जीवन झालें आणि तेथपासून जें आधुनिक मराठी सारस्वत निर्माण होत आलें त्यांत मात्र कोठेंही कोणा सुशिक्षितानें पोवाडा असा नवीन रचलेला नव्हता. चिपळूणकरांच्या स्फूर्तीनें शालिग्राम शितूतांनीं जुन्या पोवाड्यांचें संशोधन व प्रसिद्धीकरण केलें, परंतु नवीन पोवाडे कोणींही रचले नाहींत. तें काम खरोखरच सावरकरांनींच प्रथम केलें. सावरकरांनीं सिंहगडचा पोवाडा १९०४ सालीं लिहिला व बाजी देशपांड्याचा पोवाडा १९०६ सालीं लिहिला. त्याआधीं चाफेकर व रानडे यांवरही त्यांनीं १८९९ सालींच एक फटका लिहिला. तो मोठा, बारा चौकी, १९२ चरणांचा पोवाडेवजाच असला, तरी त्याला पोवाडा म्हटलेलें नाहीं; परंतु तानाजीच्या किंवा बाजी देशपांड्याच्या पोवाड्यांत 'प्रेमें आजी सिंहगडाचा पोवाडा गाजी' किंवा 'अम्ही गातसों श्रीबाजीचा

'पोवाडा आजी' असा स्पष्टच निर्देश केलेला आहे. सावरकरांचे पोवाडे प्रसिद्ध झाल्यानंतर ते जप्त झाले आणि त्यानंतर पुनः दहा–पंधरा वर्षांनीं १९२० सालानंतर पोवाडयाच्या काव्यप्रकाराला आधुनिक कवींत मान्यता मिळाली व त्यानंतर अलीकडे तर खाडिलकर, नानिवडेकर, जवखेडकर वगैरे पांचपंचवीस तरी कवि केवळ पोवाडे करूनच प्रसिद्धि पावले आहेत.

## पोवाडे कीं वीरकाव्यें !

प्रस्तुत लेखकासारख्या कांहीं इतिहास-संशोधकांना मराठेशाहीनंतर म्हणजे स्वराज्यनाशानंतर जुन्यासारखा पोवाडा आतां निर्माण होणें शक्यच नाहीं असें वाटतें व पोवाडयांचा तो काव्यप्रकार पेशवाईबरोबरच समाप्त झाला असें म्हणावेंसें वाटतें. आधुनिक काळीं 'पोवाडा' म्हणून कोणास करावयाचाच झाला, तर त्यानें विषय जरी नवा-जुना कसाही घेतला तरी त्यानें पोवाडारचनेंत जुना ढंग, जुनी भाषा वगैरे सर्व जुना जमाना ठेवून जुन्याचा आभास तरी निर्माण केला पाहिजे असें त्यांना वाटतें. कारण त्यायोगें जुन्याची गुंगी तरी टिकते व ह्या जुन्या पवित्र गोष्टीचें विडंबन तरी टळतें. पण हें म्हणणें भावनालिप्त आहे असा आक्षेप त्यावर सहज घेतां येईल. कारण पोवाडयाचा हेतु इतिहास-काळांतील किंवा प्रचलित घडामोडींतील वीररसात्मक प्रसंग निवडून लोकांना स्फुरण देणें हाच जर खरोखर आहे, तर चांगला कवि असेल तर तो नवीन काळांतील भाषेनें तसें काम साधण्याचा प्रयत्न करणारच. सावरकरांनीं पोवाडे रचले तेव्हां त्यांच्या डोळ्यापुढें त्यांनीं योजलेल्या कार्यासाठीं लोकांत चैतन्य आणून त्यांना कार्यप्रवण करणें हाच हेतु होता. व तो अत्युत्कृष्ट साधलाही आहे.

तथापि तें मान्य करूनही सावरकरांच्या 'पोवाडयांना' पोवाडे म्हणण्यापेक्षां 'वीरकाव्यें' म्हणावें असाही एक युक्तिवाद करतां येईल, कारण जुन्या पोवाडयांत व सावरकरांच्या पोवाडयांत एक महदंतर आहे व तें म्हणजे कविकल्पनांचें व अलंकारांचें प्राचुर्य. जुन्या पोवाडयांच्या रचना बघितल्या असतां भाषा धावती असावी, प्रसाद परिपूर्ण असावा असें सामान्य स्वरूप सांगतां येतें. जुना पोवाडा एकादी जोराची वावटळ आपल्या मार्गांतील वस्तूंना जोरानें झपाटून पुढें जाते त्याप्रमाणें कथन करीत जातो, तो मुद्दाम थांबून एखाद्या प्रसंगाचें चव घेत वर्णन करीत नाहीं किंवा उपमालंकारादिकांच्या मोहांत गुरफटत नाहीं. सावरकरांच्या पोवाडयांत वीररस परिपूर्ण आहे, प्रसादही आहे, परंतु विदग्ध कवीला शोभण्यासारखे अलंकार

मात्र जास्त आहेत. उदाहरणार्थ, तानाजीचाच पोवाडा पहा—तानाजी सोलाला धरून वर चढूं लागला त्या वेळीं सावरकर 'तानाजि चढूं लागले, सद्भाग्य चढूं लागलें, स्वातंत्र्य चढूं लागलें' अशीं रूपकें करतात. तशीं जुन्या पोवाडयांत कोठेंच सांपडणार नाहींत. असलीं रूपकें संस्कृत पंडित कविच करूं शकेल. तुळशीदास शाहिराच्या जुन्या पोवाडयांतील याच प्रसंगाचें वर्णन ताडून पाहिलें, म्हणजे लक्षांत येईल. तें वर्णन असें—'सुभेदार बोलतो सेनेला। पहिली सोल शिवाजी महाराजाची। दुसरी सोल अंबाबाईची। तिसरी सोल तानाजी सुभेदाराची। पट्टे घेतले तोंडामधिं। सोल धरली हातामधिं। आपल्या बेताचे माणूस पन्नास मोजीले। सुभेदार गडावर चढले।' वगैरे वगैरे.

तानाजीच्या मृत्यूच्या वार्तेनंतर मराठे घाबरून पळूं लागले व कांहींजण पुन्हा वर चढून आलेल्या दोराच्या साहाय्यानेंच परत खालीं उतरून जाण्याची खटपट करूं लागले, त्या वेळीं सावरकरांचा सूर्याजी म्हणतो—'जाउं इच्छितां काय धरोनी आल्या दोराला। अहो षंढ! तो दोर मघांची लढोनिया मेला.' या सूर्याजीच्या भाषणांतील मीं दोर मघांशींच कापून टाकले आहेत, पळून कोठें जाल? तीं निर्जीव चऱ्हाटेंही तरवारीनें तुटून लढाईंत मेलीं आणि तुमच्यासारखे लढाईला आलेले लोक मरणाला भितां? हा रूपकालंकार अत्यंत सुंदर आहे; परंतु तो जुन्या पोवाडे रचणाऱ्या शाहिरांत आढळणार नाहीं. जुन्या मराठी शाहिरांतही राम जोश्यांसारखे संस्कृतपंडित शाहीर झाले. पण त्यांच्याही पोवाडयांतून कोठें असला प्रकार आढळणार नाहीं.

तानाजी मेल्यावर तेथें सिंहगडावर त्याची समाधि झाली. त्यावर पुढील मनोहर कल्पना केली आहे—'मग त्या गडची भूमी ठेवी तानाजिस उदरीं। तेव्हांपासुनि रत्नाकर बहु तीचा द्वेष करी' या कल्पनेसंबंधीं तेंच म्हणतां येईल. बाजी देशपांड्याच्या पोवाड्यांत शिवाजी पन्हाळगडावर वेढला गेला, त्यासंबंधीं 'लक्ष्मीचें मृदु कमल शारदासुंदरिचा वीणा। स्वतंत्रतेचा कलिजा अडके गडांत शिवराणा' असें सुंदर वर्णन केलें आहे. यांतील कमलाचें आणि वीण्याचें रूपक ललितकाव्यांतील तज्ज्ञ कवीखेरीज दुसऱ्या कोणास सुचणार? शिवाजी मध्यरात्रीं गुप्तपणें गडावरून निघाला, तेव्हां 'कृष्ण पक्षिच्या काळ्या काळ्या त्या रात्रीं दडल्या। गर्द झाडिला भिउनि चांदण्या बाहेर न पडल्या' किंवा 'चौक्यासि तुम्हां दावील। काजवा चोर कंदील' अशा कल्पना जुन्या शाहिरांत सांपडणें कठिण. 'दीन दीन रणशब्दा

हरहर महादेव भिडला। भिडला ओष्ठीं दंत मस्तकीं खड्ग वक्षि भाला.' ही यथासंख्य अलंकारपद्धति थेट संस्कृत काव्याच्या धाटणीचीच आहे. पावनखिंड हेंच कोणी विमान, त्यांत बसून तेथें रणांत मेलेले वीर देवाबरोबर स्वर्गास गेले, असल्या कल्पना विदग्ध विद्वान् कवीसच सुचतील. अशीं कित्येक उदाहरणें देतां येतील. आणि त्या दृष्टीनें सावरकरांच्या या पोवाड्यांना उत्कृष्ट वीररसपरिप्लुत काव्यें असेंच म्हणावें लागेल.

तथापि काळ बदलला, विषय बदलले, कल्पना बदलल्या; त्याला अनुसरून 'सुशिक्षितांसाठीं नवे पोवाडे' असें नांव त्या काव्यांना दिलें तरी त्यांत काय चूक? वर उल्लेखिलेल्या कल्पना कदाचित् जुन्या काळच्या श्रोत्यांना समजल्या नसत्या. परंतु ज्या काळांत सावरकरांनीं हे पोवाडे रचले, ज्यांच्यासाठीं ते रचले, ते लोक सुशिक्षित असल्यामुळें व एकंदरींतच शिक्षणसंस्कार वाढलेला असल्यामुळें त्यांना त्या सहज समजतात. शिवाजीच्या काळीं राजभक्ति आणि धर्मभक्ति लोकांना समजे परंतु 'स्वातंत्र्य' वा 'स्वतंत्रता' ही परिभाषा त्यांना उमगलीच नसती. पाश्चत्य ज्ञानानंतरच ती आलेली आहे. यामुळें 'देवदूतहो, स्वातंत्र्याच्या पवित्र कामाला। जातो आहे अमुचा तान्हा रक्षण व्हा त्याला' किंवा 'त्यांना घुटके वीररसाचे स्वतंत्रता पाजी' हें त्यांना कांहींच कळलें नसतें, पण आजच्या लोकांना तेव्हांच कळतें. हा सर्व विचार केला असतां आणि वीरपराक्रमाचें वर्णन करून चैतन्य आणणें हा पोवाडयांचा मुख्य आदि हेतु लक्षांत घेतला असतां सावरकरांचीं हीं वीरकाव्येंही पोवाडेच ठरतात.

## कांहीं तपशील

सावरकरांचा जन्म १८८३ सालीं झाला. त्यांनीं सवाई माधवरावांच्या रंगाचा पोवाडा किंवा फटका १८९४ सालीं लिहिला; म्हणजे त्या वेळीं ते अवघे १२ वर्षांचे होते. तो पोवाडा त्यांनीं वाचनांत आलेली पेशव्यांची बखर वाचून लिहिला, असें चरित्रकार म्हणतात. पेशव्यांच्या त्या सोहनीकृत बखरींत विशेष विस्तारानें त्या प्रसंगाचें वर्णन केलेलें आहे हें खरें. परंतु एवढा लहान मुलगा केवळ बखरींतील गद्यभाग वाचून त्यावरून इतकी सुंदर काव्यरचना करूं शकेलसें वाटत नाहीं. आमची कल्पना अशी आहे कीं, सवाई माधवरावांच्या रंगाचा जो प्रभाकराचा उत्कृष्ट पोवाडा सावरकरांना पाठ येत असावा त्यावरूनच त्यांनीं आपला पोवाडा किंवा फटका तयार केला असावा. कारण त्यांत व या पोवाडयांत खूपच साम्य स्थळें आढळतात.

उदाहरणार्थ, "कल पाहुनि मर्जिचा बरोबर रुकार पडला साऱ्यांचा" हा प्रभाकराचा चरण व "रायाचा कल पाहुनि सर्वेहि देती सत्वर रूकारा" हा सावरकरांचा चरण ताडून पाहावा. "मधें मुख्य अंबारि झळाळित मागें थाट अंबाऱ्यांचा। चंद्रबिंब श्रीमंत सभोता प्रकाश पडला ताऱ्यांचा" या प्रभाकराच्या ओळींवरूनच सावरकरांनीं पुढील ओळी लिहिल्या आहेत. "पुढें विलसते मुख्य स्वारी सवें थाट अंबाऱ्यांचा। चंद्रबिंब श्रीमंत अवांतर प्रकाश पडला ताऱ्यांचा" "झुकत झुकत समुदायसहित निट स्वारि आलि रविवारांत" ही प्रभाकराची ओळ व "झुकत झुकत समुदाय चालती स्वारी, ये मग वानवडी" हा चरण जोडून पहावा. तथापि असें पूर्ण अनुकरण दिसलें, तरीही सावरकरांनीं आपले स्वतंत्र चरण पुष्कळच नवीन रचून घातले आहेत. उदाहरणार्थ, 'नंतर ऐसा रंग खेळुनी उठले स्नानाला, जाया। अगणित त्या क्षणिं तापुं लागल्या सुगंधि पाण्याच्या कढया' वगैरे तो सर्व भाग सावरकरांनीं बखरींतील गद्यभाग वाचून त्यावरून स्वतः रचलेला आहे. एकंदरींत १२ वर्षांच्या मुलाची ही कृति त्याच्या भावी विशाल कवित्वगुणाची द्योतकच ठरते. स्वदेशीचा फटका १८९८ सालीं म्हणजे १५-१६ व्या वर्षी लिहिला. त्यांत मात्र त्यांची स्वतंत्र रचनाशक्ति पांचच वर्षांत किती प्रगत झाली तें चांगलेंच दिसून येतें. चाफेकर व रानडे यांच्यावरील पोवाडा १८९९ सालीं म्हणजे त्याच वेळेला लिहिलेला आहे. त्यांतील 'महच्चरितसत्सुधांबुधीमधिं करूं सुमन हें पानबुडे। अखंड सद्गुणमंडित मौक्तिकनिधान सद्यश मग उघडे' या सुरवातीच्याच चरणांवरून सावरकरांचें रचनाकौशल्य किती उत्कृष्ट तयार झालें होतें तें कळेल. सिंहगड व बाजी देशपांडे यांचे पोवाडे १९०४ व १९०६ सालीं म्हणजे २१-२२ व्या वर्षी लिहिलेले आहेत व ते काव्यगुणांनीं चिरंजीवच झालेले आहेत. ते अनेकांना मुखोद्गत असल्यामुळें त्यांतील उतारे देण्याचें कारणच नाहीं.

---

# कमला आणि विरहोच्छ्वास

## प्रो. शंकर केशव कानेटकर, एम्. ए.

कवीच्या अत्युच्च स्वप्नतरंगांतून निर्माण होणाऱ्या कल्पनामय कथानकापेक्षांही अधिक अद्भुत व अधिक रोमांचकारी असें त्याच्या काव्यनिर्मितीचें कथानक असूं शकतें, याचें साक्षात् प्रत्यंतर, म्हणजेच सावरकरांचीं कमलादि काव्यें होत. एकाद्या कथानकांतील भीषण घटनांपेक्षांही काव्यनिर्मितीच्या इतिहासांतील घटना भीषणतर असतील, असें आपल्या कधीं ध्यानीं मनीं देखील येत नाहीं; पण सावरकरांच्या बाबतींत हें अनन्यत्व आपण पहातों व त्यांतील प्रत्येक प्रसंग ऐकून आपलें मन विस्मयानें क्षणाक्षणाला थरारतें ! ती जन्मठेपेची अघोर शिक्षा ! तो अंधारकोठडींतील भयाण एकांत ! तें विजनवासित्व ! आणि यावर ताण करणारी ती अंतःकरणाची तीव्र व्याकुळता व तींतून दुर्दम्य आशावादीपणानें ध्येयाचा मार्ग शोधीत धडपडत रहाणारें तें खंबीर मन ! आणि त्यांतून लेखनरूपानें प्रगट होऊन, पाठांतररूपानें गुप्त राहणारी त्यांची प्रभावी सरस्वती ! सर्वच कांहीं अद्भुत वाटतें ! मोरोपंतांनीं आपल्या घराच्या खोलींत येरझारा करीत असतांना, सुचलेलीं यमकें, प्रास, आर्या भिंतीवर लिहून ठेवल्याची आख्यायिका ऐकूनही आपण स्तिमित होतों, मग अंदमानांतील बंदीशाळेंतल्या भिंतीवर कांट्यानें कविता लिहून, त्या पाठांतरानें तगविणाऱ्या सत्यकथेबद्दल आपण किती स्तिमित व्हावें ! कमलादि काव्यांच्या निर्मितीचा इतिहास असा आहे; मग त्याच्या मागचें मन किती प्रचंड, किती ध्येयवादी व किती सोशिक असेल, त्याची कल्पनाच केलेली बरी. हा चमत्कार पाहिला म्हणजे ध्येयजीवनाशीं एकरूप झालेल्या कार्यप्रवण विशाल मनाची साक्ष पटते व काव्यदेवतेच्या अलौकिकतेची किमया कशी असते, तें समजतें.

" कमला, विरहोच्छ्वासा "दि काव्यें म्हणजे कल्पनेनें निर्माण करूं घातलेल्या एका महाकाव्यरूपी द्रोणागिरीचीं लहान लहान शकलें होत. पण तींही पाहिल्यावर मूळाचें विशालत्व व बलशालित्व कसें असेल, तें तर्कितां येतें. देशाला लागलेल्या शक्तींतून, त्याला वांचविण्यास हीं शकलें, त्यांतील रस व त्यांच्या निर्मितीचा

इतिहास हीं उपयोगी पडण्यासारखीं आहेत, हें सांगितलें असतां त्यांचें महत्त्व ध्यानीं येईल.

या शकलांनाही इतकें महत्त्व येण्याचें कारण, त्यांच्या मागें सर्गशक्तिगर्भ असलेलें सावरकरांचें विशाल मन व त्यांचें गाढें अध्ययन. अध्ययनाच्या बाबतींत वाल्मीकि, व्यास, कालिदास, होमर, शेक्स्पीयर, मिल्टन, मोरोपंत हे थोर थोर अभिजात कवींचे आदर्श पुढें असल्यानें, सावरकरांच्या मनाची घडण नि बैठक ध्येयजीवी नि उदात्त झालेली आहे. उंचावर निर्माण झालेल्या गंगेचा ओघ वेगवान् व ओजस्वी असतो व तो सपाट प्रदेशावरून वहातांना, आपल्या विशालत्वानें आजूबाजूच्यांना जीवन देऊन देशाला सुपीकता, समृद्धता व संपन्नता आणतो. सावरकरांच्या कवितेचें थोडेंफार असेंच झालें आहे.

पानिपतच्या महान् प्रसंगावर कल्पिलेलें महाकाव्याचें कथानक कसें आहे, हें कळण्यास मार्ग नाहीं. तथापि कमला काव्याच्या कथानकावरून त्याची थोडीशी कल्पना येते. कमला काव्याचें कथानक असें आहे:—

पेशवाईतील पानपतच्या युद्धापूर्वीं कांहीं वर्षें मुकुंद व कमला यांचा बालविवाह झाला होता. मुकुंदाच्या विधवा आईनें आपल्या सुनेला म्हणजे कमलेला अत्यंत मायेनें वागविल्यामुळें तिला सासरीं देखील माहेरचें सुख मिळे. आतां दोघेंही यौवनांत पदार्पण करीत होतीं. मुकुंद व त्याचा मित्र मुकुल हे सैनिक पेशाचे तरुण आहेत. आज पाडवा असल्यानें मुकुंद घरीं आला होता. यावेळीं कमला शेजारच्या बागेंत फुलें तोडीत असलेली त्याला दिसली. ती एकटी आहे असें पाहून, तो मुकाट्यानें बागेंत गेला व त्यानें तिचें चोरून पहिलें चुंबन घेतलें. कमलेचें मन थरारून गेलें व कसल्या तरी नवीन उन्मादक अनुभूतीनें तें प्रसन्न होऊं लागलें. तिच्या हृदयाचीं दलें उमलावयास लागलीं. दुसऱ्या दिवशीं ती ऋतुस्नात झाली व मंगल शांतिसमारंभाच्या निमित्तानें इष्टमित्रांकडून तिचा गौरव होऊं लागला. धार्मिक संस्कारसमारंभाची तयारी सुरू झाली. चार दिवस होऊन गेल्यावर होमहवनादि विधि सुरू झाले. कमलेची आई आली, तिच्या मैत्रिणी आल्या. मुकुंदाचा मित्र मुकुल हाही आला. सून कमला, व पुत्र मुकुंद यांचें आज मीलन होऊन त्यानें आपल्या घराण्याचा, व वंशवृद्धीनें देशाचा उद्धार होणार, म्हणून आईसही विलक्षण आनंद झाला. मुकुंद व मुकुल यांची, ' देह दोन पण मन

एक ', अशी दृढ मैत्री होती. हे वीर तरुण त्या दिवशीं खूप खूप बोलत राहिले. इतक्यांत, ' आज आपण संसारसुख घेणार, पण आजवर मुकुल समसुखी झाल्या-खेरीज आपण कोणत्याही सुखाचा आस्वाद घेतला नाहीं ' हें मुकुंदाच्या ध्यानीं आलें व ' तो संसारी होईपर्यंत, आपण व्रतस्थ रहावयाचें ' असें त्यानें ठरविलें. इतक्यांत तेथें हंसत नाचत अनेक तरुणी आल्या. त्यांत मुकुंदाच्या आईनें जवळ ठेवून घेऊन प्रेमानें वाढविलेली प्रेमलाही आली. मुकुंद, मुकुल व प्रेमला यांच्या गप्पागोष्टी व विनोदचेष्टा सुरू झाल्या. मुकुल व प्रेमला यांचें परस्पराकर्षण होतेंच. त्यांत या चेष्टांनीं भरच पडली. चेष्टा करतां करतां प्रेमलेनें मुकुलाचा हात ओढला व त्याच्या बोटांत आपलीं बोटें गुंफून त्यांतलीं कोणाचीं बोटें कोणतीं, तें मुकुंदास ओळखण्यास सांगितलें. मुकुंदानें " प्रश्नची हा नुरे वेडे, या पाणिग्रहणें पहा " असें तिला सूचक उत्तर दिलें. याला पक्षिगण व फुलबाग यांनीं साथ दिली. वेलींनीं फुलांच्या अक्षता फेकल्या, तरूनीं माना डोलविल्या व बुलबुलांनीं " अर्धांगिनी ! अर्धांगिनी ! " असा जयघोष केला. तोंच केळीच्या मखरांतून कमला पुढें आली व तिनेंही आपली शुभेच्छा प्रगट केली. दिवसाचे धार्मिक संस्कार आटोपल्यावर, रात्रीं फराळ वगैरे कार्यक्रम झाले; मुकुल निघून गेला; व कमला आपल्या पतीच्या फुलसेजेकडे गेली. मुकुंद-कमलांची प्रेमभेट होऊन लवकरच कमला गाढ झोपीं गेली. इतक्यांत, मध्यरात्रीं मुकुंदाला घोड्याच्या टापा ऐकूं आल्या. त्याच्या दारावर थाप पडली ! मुकुंद दार उघडून पहातो, तों दाराशीं सैनिक वेषांत असलेला मुकुल ! " हें काय ? " म्हणून विचारतां, " आजूबाजूस बंड करणाऱ्यांवर छापा घालून त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं आपणांस भाऊंनीं कामगिरी सांगितल्याचें " मुकुलानें मुकुंदास सांगितलें, व आपण स्वारीवर निघाल्याचेंही तो म्हणाला. नंतर दोघांनीं " कमला-प्रेमला यांचें रक्षण कर " अशी प्रार्थना केली व दोघेही तत्क्षणीं स्वारीवर निघाले. त्यांनीं शत्रूच्या तळावर जाऊन अचानक छापा घातला. त्यांचीं शस्त्रास्त्रें आग ओकूं लागलीं. इकडे याच वेळीं कमलेला एक भयंकर स्वप्न पडत होतें. त्यानें भिऊन ती दचकते न दचकते तोंच या ऐन बहरांत, ' कमला ' काव्य म्हणजे मूळ महाकाव्याचा एक सर्ग संपतो !

ही साधीच पण अल्पघटनात्मक कथा अनेक बारीकबारीक घरगुती प्रसंग घालून सावरकरांनीं मोठ्या कुशलतेनें रंगविली आहे. सावरकरांचें खरें सामर्थ्य

कथेच्या स्वाभाविकतेंत नसून, तें महाकाव्याचा विशाल आराखडा आंखण्यांत व सर्गातील लहान लहान प्रसंग सूक्ष्म सुंदरतेनें रंगविण्यांत दिसून येतें. त्यांच्या कल्पनेला महान् कथानकाची रूपरेषा व कांहीं प्रसंगांचें सूक्ष्म चित्रण स्पष्ट दिसतें. त्यामुळें कमला काव्यांत कांहीं ठिकाणीं घटनेची अस्वाभाविकता दिसली, तरी मनोवेधक जुळणी व रसमय चित्रण यांनीं आपल्या मनाची पकड घेतली जाते. याचें समर्थन आणखी एका दृष्टीनें करतां येण्यासारखें आहे. सावरकरांची ही रचना ज्या काळांत व ज्या परिस्थितींत झाली आहे, त्यांचाही यांच्याशीं निकटचा संबंध आहे. कारण ऐन तारुण्याच्या पुष्पजीवी बहरांत त्यांचें मन भरारत असतांनाच ते मायदेशाला व संसारी जीवनाला पारखे झाले. काव्याच्या ध्येय-जीवी अद्भुतरम्य सृष्टींत वावरत असतांनाच त्यांच्यावर ही बंदिवासाची आपत्ति ओढवली! मराठी काव्यवाङ्मयांतील तो काळही कल्पनारम्य सृष्टींत वावरण्याचाच होता; त्यानंतर इकडे पुष्कळ परिवर्तनें झालीं; पण सावरकरांचें ध्येयजीवी व सौंदर्यवादी मन एकदां कांहीं कल्पना बरोबर घेऊन जें तिकडे गेलें तें त्यांतच रमत राहिलें. त्यामुळें त्यांची कविता पुढील काळांत इकडे प्रगत झालेल्या संस्कारास आंचवली. तथापि रम्यत्व व रसवत्त्व यांत ती पूर्ण रंगलेली आहे.

'महाकाव्याचा एक सर्ग,' ही दृष्टि सोडली, तरी देखील आहे या परिस्थितींत कमला स्वयंपूर्ण व रसोत्कट असल्याचें आढळतें. कल्पनारम्य घटना व सांकेतिक वर्णनें, हे दोष दृष्टिआड केल्यास, या काव्यांत ठिकठिकाणीं रसपरिपोषाचा शिडकावा झालेला दिसून येईल. पहिलेंच फुलबागेचें वर्णन पहा. त्यांत सावरकरांच्या तरल, भावपूर्ण नि अभिनव कल्पनाशक्तीची पदोपदीं प्रतीति येते. बागेंतील फुलें म्हणजे 'जितें मोतीं' असलेलीं आढळतात; माणसांची स्थिति, "रुप्याचेंही करायासी जड स्वर्ण न साधतें" अशी असतांना, सोनचाफ्याचीं झाडें मात्र ओल्या मातींत सूर्याचीं किरणें पिळून, तिथें मृदुचेतन सोन्याचीं स्वर्णचंपक सुगंधी फुलें' तयार करतांना दिसतात; रात्रीच्या प्रहरीं दिसलेली ज्योत्स्नेची 'रसिता नदी' म्हणजे प्रभातींच्या हिमाचें घनीभवन होऊन त्यानें घेतलेली नवीन कांतीच होय; किंवा फुलें म्हणजे चांदण्याचे रवे रवेच होते; भृंग हा मदनाचा दलाल होता; निशिगंधाचीं फुलें हीं कामसेनेचीं पुरोगामी रौप्यशृंगेंच होतीं; कारंजाच्या तुषारधारा म्हणजे इंद्रधनुष्याच्या पिलांचा थवा होता; जलाधमग्नाला नलिनी म्हणजे यमुनेंत स्नान करणाऱ्या गोपी होत्या किंवा ती बाग म्हणजे—

" नौकेंत कौमुदीच्या ही नटली कितिदा तरी
बाग योजनगंधा त्या वनदेवपराशरीं "

अशी कुणी तरी मत्स्यगंधाच होती; यासारखे उल्लेख सावरकरांच्या चमकदार कल्पनेचें सुंदर प्रत्यंतर आणून देतात.

सावरकरांच्या कल्पनेंतील अभिजातता वाखाणण्यासारखी आहे. या कल्पना प्रसंगोपात्त त्यांच्या प्रतिभाशाली मनांतून, भावपूर्ण अंतःकरणांतून व व्युत्पन्न बुद्धींतून एकरूपतेनें निर्माण झालेल्या आहेत. फुलबागेंत फुलें तोडावयास गेलेली कमला—

" तदा दिसे समावोनी त्या फुलांत मनोरमा,
हिमालयीं व्रतीं जैशी असावी दिसली उमा "

अशी दिसली. किंवा ऋतुमती झाल्यावर,

" सुरम्य मखरामाजी रमणी मग जैं बसे,
श्लोकांत कालिदासाच्या उपमाच तशी दिसे "

यांतील कल्पनेची बैठक किती सुंदर नि अभिजात आहे! कल्पनेची भव्यता व कोमलता हा सावरकरांच्या कल्पनावैभवाचा आणखी एक विशेष आहे. जमलेल्या स्त्रियांनीं जेव्हां मुकुंदकमलांना स्नानासाठीं चौकांतील चौरंगावर बसविलें व जेव्हां स्त्रीपुरुषांचे आवाज व सनयांचे आवाज एक झाले, त्यावेळीं

" त्या ऋचा मंत्रची ते कीं, नवीन अभिषेचिती
प्रेमसिंहासनीं सम्राट् काम तो आणि ती रती! "

असेंच वाटलें; आणि जीवनांतलें असलें ' मऊ मऊ सुख ' अनुभवीत असतांना प्रत्येकाला प्रियमूर्तीची चंद्रकला अशी दुरून न पितां, जवळून प्यावी असें वाटलें. याहीपेक्षां कल्पनेची विशेष भव्यता व पावित्र्य पहावयाचें असल्यास–' ओपी हिरण्यगर्भा त्या स्वयंभू भगवान् स्वयें ' ( लोक ३६९ ) येथपासून ते–' बुद्ध, जीजस वा जीवन्मुक्त देहुंतला तया ' ( श्लोक ३८९ ) येथपर्यंतचा उतारा वाचावा, म्हणजे वरील गोष्टींची साक्ष पटेल. या उताऱ्यांत चुंबनालिंगनादि शृंगारचेष्टितांचें व वंशवृद्धीसाठीं अनंगाकडून करण्यांत येणाऱ्या पेरणीचें उदात्तीकरण करण्यांत आलें आहे. या 'अनंगाच्या पेरणींतून' कोणीतरी वाल्मीकि, श्रीकृष्ण, भीष्म, भास्कराचार्य, अजिंठ्याचा निर्माता, नट, नर्तक, नाटयकार, चंद्रगुप्त, विक्रमादित्य, शिवछत्रपति, गुरुगोविंद, बुद्ध, जीजस वा तुकाराम जन्माला येईल व तो मनुष्यजातीला स्वतंत्र,

जीवन्मुक्त करील, अशी आशा व्यक्त करून सावरकरांनीं शृंगाराची बैठक उंचावून, तीमधील राष्ट्रीय पावित्र्य प्रतीत केलें आहे. या ठिकाणीं सावरकरांनीं तारेवरची कसरत केली आहे. शृंगाराची भूमिका वर्णून तींत त्यांनीं अतीव पावित्र्य राखलें आहे व धार्मिक दृष्टया त्याचा अर्थ काय हें प्रतीत केलें आहे. रोमरोमीं धार्मिक कल्पनांचे राष्ट्रीय अर्थ खेळत असल्याशिवाय हें सांगणें शक्य होत नाहीं, व म्हणूनच यांत सावरकरांचें श्रेय व प्रेय सामावलेलें आढळतें. असल्या सुंदर, अभिजात, प्रभावी, समर्पक व भव्यकोमल कल्पनांचा आढळ आपणांस त्यांच्या काव्यांत सर्वत्र आढळतो.

सावरकरांची भाषा खडबडीत व क्लिष्ट आहे. वाचकाला तींतून सावकाश व सावधगिरीनें जावें लागतें; क्वचित् ठिकाणीं अर्थ लावण्याकरितां किंवा ग्रांथिक संदर्भ समजून घेण्याकरितां थांबावें लागतें; विचित्र शब्दसंयोगाचे त्याला धक्केही बसतात; पण त्यांतून अनुस्यूतपणें वाहणारी रसवाहिनी मात्र अमृताचा लाभ करून दिल्याखेरीज रहात नाहीं. एकाद्या निबिड अरण्यांत राहणाऱ्या अनेक हत्तींचे ‘ ची ’त्कार होत असतील नसतील, इतके त्यांच्या काव्यांत एकट्या सावरकरांचे ‘ ची ’त्कार झालेले आढळतील; पण त्याबरोबरच अत्यंत भावपूर्ण असे कांहीं सुंदर शब्दसांप्रदायही त्यांनीं बनविलेले आढळतील. “ ज्योत्स्नेची रसिता नदी चांदण्याचे रवे, मदनाचा दलाल, स्नेहशून्य सहारे, मंजुल लागलें, चंदनी चौरंग रुंद सुंदर मांडुनी, रजाचा गज, प्रश्नांचा ताल, फुलसेज, ओवुनी हृदयें हृदीं, सरी निर्झरती, अधीरविलें, बंदुका आगी ओकती ” या सारखे सुबक संगमरवरी शब्दांचे वबुतरे त्यांच्या काव्यवनांत ठिकठिकाणीं उभविलेले दिसतात.

सावरकर हे कितीही बुद्धिवादी वा युक्तिवादी असले, तरी जात्या ते कोमलभाव-प्रकृतीचे आहेत म्हणजे ते अंतःकरणानें कवि आहेत. आपलीं शब्दचित्रें रंगवितांना ते मानवी भावनांच्या बुडाशीं जाऊन, तेथें लीलेनें विहार करतांना दिसतात व त्या व्यक्त करतांना आपल्याबरोबर वाचकालाही त्यांत निमज्जन करवितात. मुकुंदाला झालेली पितृदेवाची स्मृति ( श्लो. २२२–२२३ ), जीवनरहस्यें सांगण्यास सुहृदा-सारखें स्थान नाहीं हें सांगतांना लिहिलेले श्लोक ( २४१–२४२ ), मैत्रीची कृतज्ञता (२५६), शेवटचे धर्मार्थाचे ओजस्वी भाग ( श्लो. ३७८–३८९ ) हे सर्वच निर-निराळ्या भावनांचे निदर्शक आहेत. शृंगार तर सर्व काव्यांतच पसरला आहे व त्याला वीराचें मिळालेलें उच्च सिंहासन फारच खुलून दिसतें.

कथानकाच्या गुंफणींत मधून मधून थोडा सैलपणा राहिला आहे. उदाहरणार्थ, कमलेचा बालविवाह होणें पण तिचीच बहीण जी प्रेमला ती मात्र प्रौढा होईपर्यंत जुन्या काळांत तशीच रहाणें, जुन्या काळांत तरुणतरुणींचें 'पाणिग्रहण' होण्या-इतकें मोकळें व खेळाडू वातावरण असणें किंवा मित्र समसुखी नाहीं म्हणून आपण व्रतस्थ राहण्याची प्रतिज्ञा करणें, या कल्पना कथानकाशीं व कथानककालाशीं विसंगत वाटतात. पण यांसारखे दोष, शृंगार व वीर यांची कौशल्यानें गुंफण करण्यांत झांकून गेलेले आहेत. शृंगाराची उगाच लांबण लागल्यासारखी वाटते. तोंच वीराचा उठाव होतो; व त्यांतच म्हणजे—

धडड धडड आगी बंदुका ओकती तों
तळपति तलवारी ! एकची गर्जे होतो

या वर्णनांत झालेला शेवट पाहिला, म्हणजे खऱ्या वीराची विलासांतील आसक्ति प्रसंगीं कशी त्यागी असते, तें कळतें. सावरकरांना पेशवेकालीन याच विलासी पण पराक्रमी मनाचें चित्र रेखाटावयाचें होतें, असें कमला काव्यावरून वाटतें. त्याचप्रमाणें रामदासी महाराष्ट्रधर्माची शिकवण घेतलेल्या मुकुंद-मुकुलांची संसारी व राष्ट्रीय वृत्ति ही तत्कालीन मराठ्यांच्या प्रातिनिधिक स्वरूपाची छायाच आहे असें वाटतें.

सावरकरांचा वृत्ताचा अभ्यास फार सखोल आहे. त्यामुळें रसानुकूल वृत्त-योजनेच्या बाबतींत ते कुशल आहेत. कमला काव्य त्यांनीं आद्य व अभिजात कवींनीं हाताळलेल्या अनुष्टुप् वृत्तांत लिहिलें आहे. आर्यसंस्कृतीच्या जन्मकालापासून तों कालपर्यंत या वृत्तावर अनेकांचे संस्कार झालेले आहेत. त्यामुळें या वृत्ताचे शब्दध्वनि कानावर पडले, कीं आपल्या डोळ्यापुढें अनेक इतिहास, महाकाव्यें उभीं राहतात. मात्र सावरकरांचे पादपूरणार्थ शब्द व मधूनमधून झालेले यतिभंग कर्णकटु वाटतात; पण त्यांनीं आपल्या उत्कट रसपरिपोषानें व उज्ज्वल कल्पना-वैभवानें ते सर्व झांकून टाकलेले आहेत.

कमला काव्याला जर खंडकाव्य म्हटलें, तर 'विरहोच्छ्वास' काव्याला एक प्रदीर्घ भावगीत म्हणावें लागेल. त्यांत खंडकाव्याचा भाग इतकाच, कीं पानपतच्या युद्धांत वावरणारींच पात्रें त्यांत पुन्हा आलीं आहेत किंवा कमला काव्याचा थोडा पुढला हा भाग आहे, असें मानलें तरी चालेल. मुकुल व प्रेमला यांचा विवाह

झाला. पुढें तो वीर युवक आपली शूर दयिता प्रेमला हीसह हिंदुपदपादशाहीसा लढत असतांना तिच्या व त्याच्या तुकड्यांची ताटातूट होते व तो मुसलमानां हातीं एकटाच ससैन्य सांपडतो. मृत्युदंडाची अपेक्षा करीत तो काळकोठडीं एकटाच पडतो व त्याचे शत्रु त्याला प्रेमलेची भेट करवून देण्याच्या आमिषानें क्वचित् कठोर दटावणीनेंही स्वधर्मद्रोही करण्याचा प्रयत्न करतात. अशा स्थितीं तो आपल्या प्रियेसंबंधींच्या पूर्वस्मृति काढून काळ कंठीत आहे. या त्याच्या पूर्वस्मृति म्हणजेच त्याचे ' विरहोच्छ्वास ' होत.

' विरहांत झालेल्या पूर्वस्मृति ' हा काव्याचा एकच विषय असल्यानें व यांती प्रत्येक उच्छ्वास हें स्वतंत्र भावगीत असल्यानें, चाळीस भावगीतांच्या या गुंफणील मोहनमाळेचें स्वरूप आलें आहे. यासंबंधीं सावरकर ' विरहाच्या सुस्काऱ्याच्या गीतांत म्हणतात—

" मी शब्द लिहीं : अर्थ त्यांतला आणी,
ने पुसुनि नयनिंचें पाणी.
तरि विरहा ! त्वद्दंश पाजवी ज्याला,
तव मिष्ट विषाचा प्याला.
या पाण्याच्या तोचि पिवो अनुपाना,
ही शपथ असे इतरांना. " ( गीत ६ पहा. )

हा ' विषाचा प्याला ' मिष्ट कसा, हें विरहतरंगित जीवांना सांगण्याची जरूर नाहीं व इतरांना तर काय, तें घेण्याची ' शपथ 'च आहे.

या स्मरणींत विरहवेदनेची व्याकुळता भरलेली आहे. त्यांत आपले मनोव्यापार प्रतिक्षणीं प्रसंगाप्रसंगानें होणाऱ्या गोड आठवणी, मधुर चुंबन, नियतीनें केलेलं निष्ठुर ताटातूट, चंडीच्या देवळांतल्या सहतपीची स्मृति, दुपारच्या कडक उन्हांतलं तहान, भेटीबाबत होणारी निराशा, प्रियसंगमासाठीं अनेक जन्मांची तयारी रणयज्ञाची पूर्वी केलेली सिद्धता, यौवनारंभींच भेटलेली तरवारीची उग्र धार जीवनाच्या उषःकालची रम्यता, विजयाची आशा, देशार्थ विप्रधर्म, मूर्तिभंजकांचं अघोर कृति, आसक्ति, व विरहाग्नीनें पुष्ट केलेले अश्रु व पुष्ट अश्रूंनीं चेतविलेल विरहाग्नि, असे अनेक जिव्हाळ्याचे विषय आले आहेत. सगळ्यांचें सार एकच- विरहामुळें झालेली अंतःकरणाची तळमळ ! हा विरहाच्या अंतर्वेदनेचा धागा सव मण्यांतून शेवटपर्यंत गेलेला आहे. प्रत्येक भावगीतांत एक एक संपूर्ण कल्पन

गोवली आहे व ती पूर्णत्वानें मांडतां यावी, म्हणून ' अकुर ' जातीच्या पुनरुक्तीनें व कडव्याच्या छोट्या चालीनें त्याचा १२ ते १७ ओळींचा एक गट ( stanza ) बनविण्यांत आलेला आहे. वृत्तदृष्टया हा एक गट, म्हणजे एक सुटें गीत होय. मात्र यांत कल्पनेचें उदात्तत्व व भावनेची तीव्रता असली, तरी कल्पनेचा चमकदारपणा नाहीं. क्वचित् स्थलीं पुनरुक्तिही वाटते. त्यांत ' मेघदूताची ' रंजकता वा ' विरहतरंगाची ' काव्यात्मताही नाहीं. तरीपण महाकाव्याचे सर्गच्या सर्ग वाचीत जाणाऱ्याला मधेंच आलेली ही भावगीताची सरणी, त्या ओघांत बरी वाटेल व थोडा रुचिपालट होईल. या भावगीतांपैकीं गीतें ६, ८, १४, १८, २३, २८, व ३२ हीं विशेष चांगलीं उतरलीं आहेत.

रामायण महाभारतादि काव्यें पुढें आदर्श म्हणून ठेवणाऱ्या सावरकरांना मराठींत महाकाव्यें रचण्याची स्फूर्ति झाली, हें साहजिक आहे; पण त्याहीपेक्षां हिंदूंचें गत-कालीन वैभव व पराक्रम, हिंदूंची थोर संस्कृति, हिंदु राष्ट्राची महान् परंपरा, यांचीं रसभरित वर्णनें व स्वभावचित्रें तरुण पिढीपुढें ठेवून, त्यांना पराक्रमशाली, कार्यप्रवण व नामवंत करण्याचें सावरकरांचें ध्येय खात्रीनें आदर्शभूत होतें। आज संपूर्ण महाकाव्यानें नसलें, तरी त्याच्या अंशभागानें देखील यांतील थोडीफार कार्य-सिद्धि होईल, हें सावरकरवाङ्मयाच्या अभ्यासकांना खात्रीनें म्हणतां येईल.

---

# गोमंतक काव्याची ऐतिहासिक पार्श्वभूमि


## श्रीयुत अ. का. प्रियोळकर, बी. ए.


गोमंतक हें काव्य बॅ. विनायकरावजी सावरकर यांचें *opus magnum* म्हणावयास फारशी हरकत नाहीं. निदान आज तरी सावरकरांच्या एकंदर कवितांमध्यें डोळ्यांत भरण्यासारखें ठळक काव्य गोमंतक हेंच होय. प्रसिद्ध इंग्लिश कवि मिल्टन यानें ज्याप्रमाणें,

( to ) "assert Eternal Providence,
and justify the ways of God to men, "

एक महाकाव्य लिहिण्याचा संकल्प अगदीं लहानपणापासूनच केला होता, त्याप्रमाणें विनायकरावजींचीही अगदीं "लहानपणापासून पानपतच्या युद्धावर एक महाकाव्य लिहावें, अशी लालसा होती," असें म्हणतात.[1] गोमंतक काव्य हा त्या महाकाव्याचा एक सर्ग होय. मिल्टनचा संकल्प इंग्रजी वाचकांच्या भाग्यानें सिद्धीला जाऊन Paradise Lost या महाकाव्याच्या रूपानें त्यांच्यापुढें तो मूर्त स्वरूपांत सिद्ध आहे. परंतु मराठी वाचकांच्या दुर्दैवानें विनायकरावजींचा संकल्प सिद्धीला गेला नाहीं. गोमंतक, कमला, विरहोच्छ्वास, महासागर अशा कांहीं त्रुटित शितांनीं संपूर्ण महाकाव्याच्या भाताची भूक भागविणें मराठी वाचकांना सध्यां प्राप्त झालें आहे. "येत्या महिन्यांत बॅ. सावरकर यांची एकषष्टि साजरी होणार आहे. त्याप्रसंगीं त्यांच्या समग्र काव्याचें समीक्षण करणारा एक ग्रंथ त्यांना अर्पण करण्यांत यावयाचा आहे. त्याकरितां **गोमंतक हें काव्य गोमंतकांतील सृष्टिसौंदर्य व इतिहास या दोहोंना कितपत धरून आहे,** या अर्थाचे निबंधात्मक विचार आपणाकडून आम्हांस हवे आहेत," अशा प्रकारची इच्छा या संकल्पित ग्रंथाचे कल्पक संपादक प्रो. मायदेव यांनीं प्रथम पत्रद्वारें व्यक्त केली आणि पुढें तर लेखाकरितां समक्ष आग्रहच धरला म्हणून हे चार शब्द घाइघाईंतच लिहीत आहें.

---

१ रानफुलें, १९३४, प्रस्तावना पृ. ३.

एकषष्ठीसारख्या प्रसंगीं विनायकरावजींच्या या काव्यावर दोन शब्द बोलण्याची आज्ञा जर आमच्या संपादक मित्रांनीं केली असती, तर थोडा वेळ बड्या लोकांचें अनुकरण करून मीं सावरकरांच्या काव्यावर चार दोन औपचारिक स्तुतिसुमनें उधळलीं असतीं व कशीतरी वेळ मारून नेली असती. परंतु ज्याअर्थी त्यांना माझे विचार लेखी हवे आहेत त्याअर्थीं माझ्यावरची जबाबदारी मला टाळतां येत नाहीं.

काव्याचें अधिष्ठान कल्पना व इतिहासाचें अधिष्ठान सत्य हें आहे. अशा स्थितींत काव्याकडे ऐतिहासिक दृष्टीनें पाहावेंच कीं काय, असाही एक प्रश्न पुढें येतो. यासंबंधीं हरिभाऊ आपटे यांनीं आपल्या " विदग्धवाङ्मय " या भाषणांत फारच मार्मिक विवेचन केलेलें आहे. त्यांतील कांहीं भाग येथें उद्धृत करणें अनाठायीं होणार नाहीं. हरिभाऊ म्हणतात, " काव्याचें सर्व रहस्य सत्यांत नाहीं, तर सत्याभासांत आहे. इतिहासाचें रहस्य सत्यांत आहे...इतिहासकार न्यायनिष्ठुर, त्यास आपले मनोग्रह निग्रहानें मागें ठेवून सत्यान्वेषणास अवश्य ती सामग्री शोधीत बसावें लागतें. कवीस आपल्या मनोग्रहांस वाटेल तितकें सैरावैरा धावण्यास सोडून अप्रत्यक्षरीत्या सत्य पुढें आणावयाचें असतें. सत्याची चाड दोघांसही सारखीच राखावी लागते. "[२] वगैरे. म्हणजे काव्याचें अधिष्ठान कल्पना ही असली तरी त्या कल्पनेची बैठक सत्यावरच उभारलेली असली पाहिजे, हें उघड दिसून येणारें आहे. स्वतः कवि आपल्या प्रस्तावनेच्या आरंभींच म्हणतात, " पोर्तुगीजांच्या वेळेपासून तों पेशवाईतील पूर्ण भरभराटीच्या दिवसांपर्यंत कोकणच्या राजकारणी घडामोडींतील मर्म विशद करण्याचा या काव्यांत प्रयत्न केला आहे. यांतील महत्त्वाच्या ऐतिहासिक घटना व उल्लेख आपल्या व पुर्तुगीजांच्या इतिहासांतील आधारांस धरूनच केलेले आहेत. यद्यपि हें काव्यच आहे, तथापि म्हणून तें इतिहास नाहीं असें नाहीं. इतिहासाच्या पृष्ठभूमीवर कल्पनेची कुंचली घेऊन कवितेने चित्रिलेलें तें एक चित्र आहे. "

कवींचीच अशी जरी कबुली असली तरीही त्यांनीं ज्या स्थितींत हें काव्य लिहिलें आहे, ती परिस्थिति लक्षांत घेतां त्यांच्याकडून विशेष ऐतिह्याची अपेक्षा करण्यांत अर्थ दिसत नाहीं. अंदमानच्या तुरुंगाच्या भिंतीवर कांट्यानें कोरून लिहिलेल्या या[३] काव्यांत ऐतिहासिक कांटेतोलपणा कसा साधावा?

---

२ विदग्धवाङ्मय, १९३५, पृ. ३१.

३ या काव्याचा शेवटचा कांहीं भाग रत्नागिरीच्या तुरुंगांत लिहिला होता, असें हा निबंध लिहून झाल्यावर कळलें.

लिहिण्यास लागणारा कागद, शाई व लेखणी यांचीच जेथें मारामार तेथें अशा काव्याला अवश्य असलेले ऐतिहासिक संदर्भ-ग्रंथ किंवा प्रत्यक्ष ऐतिहासिक स्थलांचें अवलोकन अशा गोष्टींची गोष्टच बोलावयाला नको! गोमंतक काव्याची एकंदर भाषा व रचना पाहिली म्हणजे मिल्टनचें पॅराडाइज लॉस्ट हें काव्य सावरकरांच्या दृष्टीपुढें आदर्श म्हणून होतें, असें स्पष्टच दिसतें. परंतु गोमंतक काव्याचा विषय जसा महाराष्ट्रभाटाला अपरिचित तसा पॅराडाइज लॉस्टचा विषय मिल्टनला अपरिचित नव्हता. किंबहुना अगदीं लहानपणापासूनच या काव्याचा पाया मिल्टनच्या मेंदूमध्यें भरला जात होता, असें म्हणावयास हरकत नाहीं. ज्या शाळेंत मिल्टनचें आरंभींचें शिक्षण झालें त्या सेंट पॉल स्कूलचा संस्थापक कॉलेट यांनीं झाडून जुन्या ख्रिस्ती धर्मविषयक ग्रंथांचा आपल्या अभ्यास-क्रमांत अन्तर्भाव केला होता.[४] घरांत शिकविण्याकरितां थोमास यंग या नांवाचा एक धर्मोपदेशक असे. त्यामुळें आपल्या काव्यविषयाचें त्याला बाळकडूच मिळालें होतें, असें म्हणतां येईल. केंब्रिज येथें असलेल्या मिल्टनच्या उपलब्ध हस्तलिखित टांचणावरून या काव्याची कल्पना किंवा सुरवात १६४०–४२ च्या सुमारास झाली होती असें दिसतें.[५] मि. क्रॉम्प्टन रिकेट हा तर १६३८ पासून या काव्य-लेखनाला सुरवात झाली असें लिहितो.[६] हें काव्य पुढें १६६३ त लिहून पुरें झालें. १६६४ ते ६५ हा काल त्याच्यावर हात फिरविण्यांत गेला व १६६७ सालीं तें शेवटीं प्रसिद्ध झालें. काव्याच्या प्रसवाला अभ्यासाची किती आवश्यकता आहे व तें किती दीर्घावधीचें व परिश्रमाचें काम आहे याची साक्ष गटे, डांटे वगैरे अनेक प्रसिद्ध कवींनीं दिलेली आहे.[७] एकादें ऐतिहासिक काव्य लिहावयाला जुन्या ऐतिहासिक साधनांच्या वाचनाची जशी आवश्यकता आहे, त्याप्रमाणेंच ऐतिहा-सिक स्थलांच्या अवलोकनाचीही आहे. ऐतिहासिक कादंबऱ्या किंवा काव्यें यांचा लेखक या नात्यानें सर वाल्टर स्कॉट हा प्रसिद्ध आहे. परंतु एकादा प्रसंग जर आपल्या कादंबरीमध्यें किंवा काव्यामध्यें रेखावयाचा झाला तर आधीं त्यासंबंधीं पुष्कळसें ग्रंथवाचन व स्थलनिरीक्षण केल्याखेरीज तो राहात नसे. त्यामुळें एखादा

---

४ Milton as School boy and School master by Mr. A.F. Leach. (ब्रिटिश ॲकडमीपुढें ता. १० डिसें. १९०८ मध्यें वाचलेला निबंध.)

५ Milton by Stopford Brooke, 1911, p. 34.

६ History of English Literature, 1935, p. 178.

७ दमयंती स्वयंवर, शके १८५७, प्रस्तुत लेखकाची प्रस्तावना पहा, पृ. ४१-४२.

किल्ला, नदी किंवा झुडूप देखील जर त्यानें पाहिलें तर तावडतोब या सर्व गोष्टी भूतकालीन स्वरूपांत त्यांच्या सहवासियांसह ( associations ) त्याच्या दृष्टीसमोर उभ्या राहात. मार्मियन, रोकबी, लेडी ऑफ थि लेक वगैरे काव्यांत ही त्याची दिव्यदृष्टि आपणांस उत्कटत्वानें दिसून येते. परंतु भूतकाल दृष्टीसमोर आणण्यास (visualise the past ) त्याचा वर्तमान तरी आपल्या समोर पाहिजे ? सावरकरांना महाराष्ट्राच्या भूगोलाची कितपत प्रत्यक्ष माहिती होती याची साक्ष याच ग्रंथांत दुसरीकडे संपादकांनीं दिलीच आहे.[८] सावरकरांनीं आपल्या विद्यार्थीदशेंत ग्रॅन्टडफचा मराठ्यांचा इतिहास, सोहोनीकृत पेशव्यांची बखर, साष्टीची बखर, ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांचें पारसनीसांनीं लिहिलेलें चरित्र, असे तत्कालीं उपलब्ध असलेले कांहीं इंग्रजी किंवा मराठी ग्रंथ वाचले असतील, व बाल्य किंवा तारुण्य अशा वयांत सुलभ असलेली स्फूर्तिही त्यांनीं त्यांच्यापासून घेतली असेल. परंतु आतां त्या कालानंतर इतकीं नवीं ऐतिहासिक साधनें पुढें आलीं आहेत व इतिहासाकडे पाहाण्याची दृष्टि इतकी बदललेली आहे कीं, जुन्या साधनांचीं मूल्यें आज जशींच्या तशी राहिलेलीं नाहींत. पोर्तुगीजांच्या इतिहासासंबंधीं डॅनव्हर्स[९], व्हाइटवे[१०] वगैरे लेखकांचे कांहीं ग्रंथ त्यांच्या अवलोकनांत आले असतील किंवा इंग्लंडांत असतांना इंडिया ऑफीसच्या ग्रंथसंग्रहालयामध्यें त्यांनीं या विषयावरील कागदपत्र पाहिलेही असतील; परंतु या विषयावरील मौलिक साधनें पोर्तुगीज भाषेंत आहेत. इंग्रजी भाषेंत जे ग्रंथ झाले ते विशिष्ट दृष्टीनें लिहिलेले. त्यांचा कितीसा उपयोग होणार ? शिवाय जे ग्रंथ होते तेही सर्व सावरकरांना मिळाले असें कुठें आहे ? उदाहरणार्थ, डॉ. देलों या फ्रेंच प्रवाशाच्या गोव्याच्या इंक्विझिशनवरील हकिगतीचा या काव्याकरितां फारच चांगला उपयोग झाला असता. हा ग्रंथ जरी फ्रेंच भाषेंत[११] सतराव्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें प्रथम प्रसिद्ध झाला तरी त्याचें इंग्रजी भाषांतर १८१२ सालीं झालेलें उपलब्ध आहे.[१२] स्पॅनिश इंक्विझिशनवर आतांपर्यंत झालेले अनेक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. परंतु त्यांपैकीं H. C. Lea याचा चार खंडांत प्रसिद्ध असलेला ग्रंथ ( 1906–7 ) माझ्या माहितीप्रमाणें सर्वोत्कृष्ट आहे. पोर्तुगीज इंक्विझिशनचा इतिहास आलेशांद्र येरकुलान

८. पृ. १६ पहा.

९. Portuguese in India, 1894

१०. Rise of Portuguese Power in India, 1899 (R. S. Whiteway)

११. Relation de L' Inquisition de Goa, Paris, 1688.

१२. Account of the Inquisition at Goa, Hull, 1812.

यानें बऱ्याच कालामागें लिहिला आहे.[१३] त्याचें भाषांतर इंग्रजीमध्यें अलीकडे १९२६ सालीं झालें आहे. पोर्तुगालचा राजदप्तरी बायांव यानें इंक्विझिशनवर अलीकडे कांहीं पुस्तकें पोर्तुगीजमध्यें प्रसिद्ध केलीं आहेत.[१४] त्यांचा उपयोग सावरकरांना होणें अर्थातच शक्य नव्हतें. शिवाय सावरकरांचे इंग्लंडांत स्वतःच्या अभ्यासाशिवाय इतर अनेक विविध उद्योग चालू होते. त्यामुळें या प्रश्नांचा सूक्ष्म अभ्यास करण्यास त्यांना सवड होती असें वाटत नाहीं. शिवाय कांहीं जें वाचलें तेंही प्रत्यक्ष त्या विषयावर लिहितांना किती शिल्लक राहिलें असेल हाही प्रश्न उरतोच. वास्तविक या विषयावर लिहिण्यास Archivo Portuguez Oriental या नांवाखालीं हिंदुस्थानांतील पोर्तुगीजांच्या दप्तरांतील कागदपत्र जे प्रसिद्ध झाले आहेत ते फार उपयोगी आहेत. विशेषतः चवथा, पांचवा, सहावा व त्याच्या दोन पुरवण्या हे खंड अत्यंत उपयोगी आहेत. हे ग्रंथ गेल्या शतकाच्या मध्यांत प्रसिद्ध झाले तरी ते पोर्तुगीज भाषेंत असल्यामुळें त्यांचा फायदा सावरकरांना मिळणें शक्य नव्हतें. बरें एकादा गोव्याचा सुबुद्ध कैदी अंदमानमध्यें असता व त्याला जर गोमंतकाच्या इतिहासाची माहिती असती तर त्याच्याकडून मिळालेल्या तोंडी माहितीचा उपयोग सावरकरांना झाला असता. परंतु गोवें भिन्न राजवटीमध्यें पडलें असल्यामुळें तिकडून कैदी अंदमानला जाणें संभवनीय नव्हतें, हें उघड आहे.

हरिभाऊंच्या म्हणण्याप्रमाणें कवीला सत्याचा आभास निर्माण करावयाचा झाला तरी सत्य काय आहे, हें त्याला खुद्द इतिहासकाराइतकेंच माहीत असावयाला पाहिजे. सर्कशीमध्यें विदूषक एकाद्या खेळाडूचें विडंबन करतो. परंतु ती विशिष्ट करामत त्या खेळाडूइतकीच त्या विदूषकालाही अवगत असलेली आपण पाहातों. त्याप्रमाणें इतिहासकाराइतकेंच कवीला किंवा कादंबरीकाराला खऱ्या इतिहासाचें ज्ञान असावेंच लागतें. मिल्टनप्रमाणें जरी सावरकरांचें काव्यविषयाचें ज्ञान पूर्ण नव्हतें, तरीपण कांहीं-तरी आपण मोठें वाङ्मयकार्य करावें अशी मिल्टनप्रमाणें त्यांची हांव होती. त्यामुळें

१३ Historia da Origem e estabelecimento da Inquisicao em Portugal ( A. Herculano ). 1852

१४ (i) A Inquisicão em Portugal e no Brazil, 1921.
(ii) Episodios dramaticos da Inquisicão Portugueza, 3 vols. 1919-1937.
(iii) A Inquisicão de Goa, 2 Vols. 1930.

त्यांच्या हातून प्रस्तुत काव्य निर्माण झालें. सावरकरांची प्रकाशित व अप्रकाशित, जप्त व लुप्त अशी एकंदर कविता ज्यावेळीं पुढें येईल, त्यावेळीं राजकीय पक्ष व वादविवाद यांच्यामध्यें व्यर्थ काल दवडण्यापेक्षां जर सर्वस्वी काव्यरचनेलाच त्यांनीं स्वतःला वाहून घेतलें असतें तर बरें झालें असतें असें मिल्टनविषयीं म्हणणारे जसे लोक होते,[१५] तसे सावरकरांसंबंधीं देखील म्हणणारे त्यांच्या वाङ्मयाचे भक्त कदाचित् पुढें येतीलही ! गोमंतकामध्यें इतक्या विलक्षण राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक घडामोडी झाल्या आहेत कीं, कितीतरी रोमहर्षणीय काव्यें व कादंबऱ्या त्यांच्या आधारावर लिहितां येतील. परंतु दुःखाची गोष्ट ही कीं, एवढें निसर्गसौंदर्याचें व इतिहासाचें भांडार खुलें असतां तिकडे ऐतिहासिक काव्य किंवा कादंबरी लिहिणारा एकादा स्कॉट अद्याप निर्माण झाला नाहीं. ज्यांना वाङ्मयामध्यें कांहींतरी विशेष कार्य करण्याची मोठी हांवच नाहीं त्या माणसांच्या हातून लघुकथांशिवाय दुसऱ्या कशाची पैदास होणार ! गोमंतकाच्या इतिहासावर कांहीं मोठें वाङ्मयकार्य करण्याचा ध्यास धरणारे माझ्या माहितीप्रमाणें दोघेच. पहिले '**गोदावरी**'[१६] ही ऐतिहासिक (अपूर्ण) कादंबरी लिहिणारे विविधज्ञानविस्ताराचे संपादक कै. रा. भि. गुंजीकर व दुसरे प्रस्तुत '**गोमंतक**' काव्याचे लेखक बॅ. विनायकरावजी सावरकर ! दोघेही गोमंतकाच्या बाहेरचे ! गुंजीकरांची कादंबरी तेरा प्रकरणांवरच अपूर्ण राहिली किंवा सावरकरांचें काव्य जरी ऐतिहासिक सत्याच्या दृष्टीनें सदोष असलें तरीपण त्यांच्या उच्च ध्येयाबद्दल त्यांचें कौतुकच केलें पाहिजे.

---

१५ " Morus, goes far to prove the contention of Mr. Pattison that it was an evil day when the poet left his study at Horton to do battle for the Commonwealth amid the vulgar brawls of the market-place :

" Not here, O Apollo,
were haunts meet for thee. "

..........................................................

There are writers who argue that Milton made a mistake. A poet, they say, should keep clear of political strife. etc. ( Paradise Lost, Edited by A. W. Verity, 1910, p. XX.)

१६ विविधज्ञानविस्तार, वर्ष ३ ते ६ पहा.

गोमंतक या काव्याच्या कथानकाचा पूर्वार्ध इ. स. १७३८ पासून व उत्तरार्ध १७५८ पासून सुरू होतो असें पुस्तकांतच नमूद आहे. कवीला गोमंतकाची प्रत्यक्ष अशी स्थलविषयक माहिती नसल्यामुळें कथानकाच्या मुख्य क्षेत्राकरितां **दारका** नामक नदीवरील **भार्गव** नामक गांव दाखविलें आहे. अर्थात् या नांवाची नदी किंवा गांव गोमंतकांत कुठेंही नसून ही कवीची स्वकपोलकल्पित निर्मिति आहे, हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं. या नदीचें किंवा गांवाचें त्यांनीं जें सुंदर वर्णन केलें आहे तें समग्र मला स्थलाभावामुळें येथें उद्धृत करणें शक्य नाहीं. दारका नदी-संबंधीं कवि लिहितात,

**........ जीं गांवें तान्हेलीं बहु त्यांजला**
**नदी चिमुकलीशी ही जाई पाजित सज्जला**

त्या काळचा गोमंतक म्हणजे पोर्तुगीज अमलाखालील प्रदेश म्हणजे गोवाबेट, बारदेस व सासष्ट इतकाच प्रांत होता. फोंडा, भतग्राम, पेडणे वगैरे भाग पोर्तुगीज गोव्याला मागाहून जोडण्यांत आले. या जुन्या काबीजादी म्हणून प्रसिद्ध असलेल्या गोमंतकामध्यें बहुतेक खाडयाच म्हणजे खाऱ्या पाण्याच्या नद्या असल्यामुळें दारका नदीचें वर्णन यथार्थ वाटत नाहीं. असनोडेंसारख्या बारदेसच्या सीमेवर असलेल्या एकाद्या गांवास गोड्या पाण्याची नदी स्पर्श करते हें खरें. परंतु माझ्या माहिती-प्रमाणें सावरकरांच्या वर्णनाप्रमाणें आपलें अस्तित्व तंतोतंत पटविणारी नदी त्या काळच्या गोमंतकांत नव्हती. पण,

**शोभवी दारकेसी हा तटग्राम लहानसा**
**फुलांचा झुबका कोण्या रानमोगरिला जसा,**

हें भार्गवग्रामचें सुंदर वर्णन वाचून मात्र खाड्यांच्या तटावर असलेलीं व पांढऱ्या चुनेगच्ची घरांनीं भरलेलीं अनेक गांवें गोमंतक पाहिलेल्यांच्या दृष्टीसमोर आल्या-खेरीज राहणार नाहींत. परंतु,

**शेतींचें गीत ' ये बैला ! ' अशा उंच दृढस्वरीं**
**पहाटेस उठे फुलां गंधांच्या सह अंबरीं**
**मोटांतूनि पडे धो धो पाणी पाणथळामधीं**
**स्निग्धगंभीर नादानें मोर नाचति त्या तधीं**

या वर्णनांतील बैलांच्या मोटा किंवा मोरांचें नाचणें गोमंतकाच्या परिचयाचीं नाहींत. तरीपण ग्रामसंस्था ( पूर्वार्ध ४७ ) कदंब ( पृ. ७८ ) श्रीमंगेश आणि शांता भवानी ( पृ. ८४ ) अंत्रूज ( पृ. ८८ ) वगैरे नामोल्लेखांवरून कवींनीं गोमंतकाची माहिती करून घेण्याचा प्रयत्न केला होता, असें स्पष्ट दिसून येतें.

इतर निसर्गादि वर्णनें कोकणाच्या इतर भागांप्रमाणें गोमंतकालाही सामान्य असल्यामुळें त्यांच्यासंबंधीं विशेष लिहिण्याची आवश्यकता नाहीं. जर कवींनीं गोमंतक स्वतः डोळ्यांनीं एकदां तरी पाहिला असता तर मात्र गोमंतकाच्या खाणाखुणा पावलोपावलीं पटविणारीं निसर्गवर्णनें त्यांनीं खचित केल्याशिवाय सोडिलीं नसतीं, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां ऐतिहासिक दृष्टीनें या भार्गव गांवाकडे पाहूं. काव्यांतील कथानक १७३८ पासून सुरू होतें असें पूर्वार्धावर नमूद आहे. परंतु या कालाबद्दल अन्तर्गत पुरावा काव्यांतच शोधूं गेल्यास हें कथानक बरेंच मागें न्यावें लागतें. कवि म्हणतात,

**पुर्तुगीज अहा आजी नांव हें शतवत्सरें**
**आलें करीत ह्या गांवीं भयग्रस्त जनांतरें ७२**

या उल्लेखावरून साधारणतः शंभर वर्षे मागें म्हणजे १६३८ पासून या गांवामध्यें पोर्तुगीजांचा धर्मच्छळ सुरू झाला असें म्हणावें लागतें. परंतु इतिहास निराळा आहे. कारण सोळाव्या शतकाच्या मध्यांतच पोर्तुगीजांनीं हिंदुधर्मावर उघडपणें आक्रमण सुरू केलें होतें. १५१० सालीं आल्बुकेर्क यानें हिंदु लोकांच्या साहाय्यानें गोवें काबीज केलें. आपल्या साहाय्यकांना बिलकूल धक्का न देतां मुसलमान लोकांची त्यानें तीन दिवसपर्यंत कत्तल चालविली व पुढें यांतून राहिलेल्या त्यांच्या बायकांबरोबर आपल्या सैनिकांचे विवाह लावून दिले.[१७] हिंदु लोकांचा धर्म किंवा चालीरिती यांच्यामध्यें त्यानें ढवळाढवळ केली नाहीं. सतीचीं चाल त्यानें बंद केली होती; परंतु ती भूतदयेच्या पायावर, व लोकांना हें त्याचें कृत्य पसंत पडलें होतें असें दिसतें.[१८] आपल्या सैनिकांबरोबर ज्या एतद्देशीय स्त्रियांचीं लग्नें लावून दिलीं, त्यांपैकीं कांहीं हिंदु स्त्रिया होत्या असें म्हणतात.[१९] परंतु त्या केवळ गुलामांपैकीं

---

१७ Quadros Historicos ( Barreto Miranda ) II, p. 45 ( 1864 )
१८ Commentaries of Albuquerque, 1875, Vol. II, p. 94.
१९ ,, ,, Vol. III pp. 41-42.

असल्यामुळें या कृत्यामुळें विशेष लोकक्षोभ झाला नसावा, असें वाटतें. आल्बुकर्क हा धार्मिक बाबतींत सहिष्णु होता, असें इतिहासकार म्हणत आले आहेत.[२०] परंतु आंद्रे कोर्साली नांवाच्या एका पाद्रीचें जें एक पत्र अलिकडे उपलब्ध झालेलें आहे त्यावरून त्याच्या अमदानींतच गोव्यांत हिंदुधर्मावर आघात होऊं लागला होता, असें दिसतें. आल्बुकर्क १५१५ च्या डिसेंबरांत वारला; परंतु त्याच वर्षाच्या आरंभीं म्हणजे ता. ६ जानेवारीला कोचीनहून रोमला ड्यूक ज्यूलियांव द मेडिसीस याला पाठविलेल्या उपरिनिर्दिष्ट पत्रांत गोव्यालगत असलेल्या दिवाडी नांवाच्या बेटांतील शिल्पकलेचा उत्कृष्ट नमुना असें एक हिंदु देवालय व त्यांतील मूर्ति पोर्तुगीजांच्या हातोड्याला बळी पडल्याचें नमूद केलेलें आहे[२१]! लूसेन हा झेवियर-चा सुप्रसिद्ध चरित्रलेखक १५३५ मध्यें हिंदु लोकांच्या धार्मिक छळाला सुरवात झाली असें म्हणतो; परंतु पोर्तुगीज सरकारच्या दप्तरांतील माहितीप्रमाणें १५४१ सालीं गोवें बेटांतील एकूण एक हिंदु देवालय मोडून जमीनदोस्त केल्याचा पुरावा सांपडतो.[२२] यानंतर सासष्ट व बारदेस हे प्रांत गोव्याला जोडण्यांत आले, व तेथील देवालयांवरही धाड आली! १५६७ सालीं रायतूर किल्ल्याचा कॅप्टन दियोग रुद्रिग ऊर्फ फेर्नांदीस यानें सरकारच्या हुकुमानें सासष्टींत जो धुमाकूळ घातला तो इतका भयंकर होता कीं, " सासष्टीच्या आनंदोत्फुल्ल अशा प्रदेशामध्यें बहुतेक एकही देऊळ उभें राहिलें नाहीं व निदान दोनशेंऐशीं तरी देवळें या कॅप्टनच्या घणाखालीं त्या वर्षी उध्वस्त झालीं " असा अंदाज आहे.[२३] १५६९ सालीं बारदेस प्रांतांतील देवळांची अशीच विल्हेवाट करण्यांत आली. रायतूरपासून दूर अगदीं सासष्टीच्या दुसऱ्या टोंकाला सरहद्दीवर कुंकळ्ळी, असोळणें, वेळ्ळी अशीं चारपांच गांवें आहेत. तीं जेजुइट लोकांच्या व उपरिनिर्दिष्ट कॅप्टनच्या दृष्टींतून चुकून सुटलीं असावीं. किंवा तेथील चार्डे ( चारभट ) नांवाच्या क्षत्रिय लोकांच्या विरोधाला भिऊन त्या भागांत आक्रमण करणें पोर्तुगीजांना कठीण झालें असावें. पण येथेंही एका सरकारी पोस्टाच्या शिपायाला लोकांनीं वाईट रीतीनें वागविल्याचें निमित्त होऊन भांडण

---

२० Albuquerque, by H. Morse Stephens, 1892 (P. 193)

२१ O Oriente Portuguez, 1932 No. 2, 3, p. 45.

२२ Bosquejo Historico das Communidades, (F. Nery Xavier) Vol. I, 1903, p. 106.

२३ O Indus e a Republica, p. 25.

सुरू झालें व सरकारनें त्यांना शासन करण्याकरितां फौज पाठविली. त्याच्याबरोबर आलेल्या दोघां जेजुईट पाद्रींनीं असोळणें व कुकळ्ळी येथील देवळांना आगी लावल्या व फौजेनें तीं गांवें उध्वस्त करून टाकिलीं. पुढें स्थिरस्थावर होऊन लोकांनीं आपलीं घरेंदारें व देवळें पुनः उभारलीं. पण जेजुईट लोकांना स्वस्थ बसवेना. त्यांच्या चिथावणीवरून फौजेनें पुनः येऊन त्यांचीं देवळें पाडलीं व गाय मारून हिंदूंचीं पवित्र स्थानें भ्रष्ट केलीं. इतकेंच नव्हे तर नारळी वगैरे झाडें कापून तीं गांवें उजाड केलीं. पुढें आतां लोक दबले आहेत असें वाटून कुकळ्ळी या प्रमुख गांवांत एक ख्रिस्तालय उघडण्याकरितां जागा निश्चित करण्याकरितां रुडोल्फ आक्काव्हिव्हा नांवाचा जेजुईट कांहीं सोबत्यांसह तेथें आला. हाच पाद्री अकबराच्या भेटीला गेला होता. आपल्या पवित्र स्थानांचा व घरादारांचा केलेला नाश पाहून त्याचा सूड म्हणून या गांवच्या लोकांनीं या पाद्रीवर हल्ला करून त्यांना ठार केलें.[२४] विळेकोयतेवाल्या या लोकांचा पोर्तुगीजांसारख्या संगिनी, बंदुकी व तोफा यांनीं सुसज्ज असलेल्या लोकांपुढें निभाव लागणें अर्थात् शक्यच नव्हतें. तरीपण त्या लोकांनीं प्रतिकार केला होता, ही गोष्ट विसरतां येत नाहीं. सुप्रसिद्ध ख्रिश्चनपुराण या मराठी ग्रंथाचा कर्ता फादर स्टिफन्स यानें ता. २४ आक्टोबर १५८३ रोजीं आपल्या फ्रान्समध्यें असलेल्या रिचर्ड स्टिफन्स नांवाच्या बंधूस पाठविलेलें विस्तृत पत्र ब्रुसेल्सच्या नॅशनल लायब्ररीमध्यें उपलब्ध आहे. त्यांत तो लिहितो,

There is one part of this peninsula the one, I mean, that is nearest the continent, in which there are but a handful of Christians; the pagans, of whom there are a great many, are all of a warlike character and are the sworn foes of the Portuguese name. They are dead against the Christian faith, and have for many years been doing great harm to the Christian republic, partly by their open attacks and partly by their conspiracies. For, as in many other places subject to the Portuguese,

---

२४ Oriente Conquistado a Jesus Christo (P. Francisco de Souza) 1886, Vol. II, C- I, D. II, No. 73–80.

the pagan temples have been destroyed, and ... ... ...
( Here many things are missing. )[२५]

या पत्रांत पाद्री लोकांना बंडखोर हिंदूंनीं कसें निर्दयपणें मारलें याची माहिती आहे, परंतु हिंदु देवालयांच्या भ्रष्टतेचा भाग नेमका नष्ट व्हावा ह्याचें कोडें वाटतें! आक्काव्हिव्हा वगैरे या पांच हुतात्म्या पाद्रींना पोप तेरावा लिओ यानें १८९३ सालीं साधुत्वाचें पद दिलें (beatified). त्यांच्या संबंधीं अनेक लोकांनीं ग्रंथ लिहिले आहेत.[२६] परंतु आपल्या धर्माकरितां ज्या हिंदु वीरांनीं आत्मदान केलें त्या हिंदु हुतात्म्यांवर एकादा पोवाडाही लिहिला जाऊं नये, ही खेदाची गोष्ट आहे. गोमंतक काव्यांतील भार्गव ग्रामाचें वर्णन वाचून मला या कुकळ्ळी व असोळणें गांवांची आठवण झाल्या-खेरीज राहिली नाहीं. आक्काव्हिव्हादि पाद्रींचा खून ता. १५ जुलै १५८३ रोजीं झाला व भार्गव ग्रामांतील सावरकर वर्णितात तो प्रसंग १७३८ सालचा. म्हणजे सुमारें दीडशें वर्षांचें या दोन प्रसंगांमध्यें अंतर आहे! या दीडशें वर्षांनंतर पोर्तुगीजांच्या वरवंट्याखालीं गोमंतकांत वर्णन केल्याप्रमाणें कोणत्याही ग्रामाचें स्वरूप राहील, असें वाटत नाहीं. पहाः--

परचक्रार्त हें तैसें गांव भार्गव कीं धरी
म्लानता वर्तमानाची गतगर्व मुखावरी १३
**देवालय महादेवाचें जें सान्निध जीर्णसें**
**धर्मकेंद्र समाजाचा एक हा उरला असे** १५
येथें प्रदक्षिणा भांतीं घेतांना युवतीं, मुलें
त्यांचीं गुंफित बैसावीं चांफ्यांचीं गळतीं फुलें १६
वृक्ष जो पारिजाताचा शेजारीच **मठांत** या
**फुलांहीं तों अणी वांके गांव, गर्व भरे तया** १७

---

२५ Biographical note, p. XXXI. (Christian Puran, Edited by J. L. Saldanha, 1907.)

२६ (i) The first Christian Mission to the Great Moghul by Fr. Francise Goldie.
(ii) Greater than the great Moghul by Fr. Richard Welfie.
(iii) The Jesuits and the great Mogul by Maclagan etc. etc.

**ये तिथें फिरतां साधू धुणी लावुनिया बसे**
**प्रार्थितां बहुतीं सांगे लव देश कुठें कसे ५९**

तिथेंचि पुर्तुगीजांची शाळा एक नवी भरे
राग कां न तिचा यावा भाऊ पंतुजिना बरें ! ६९
' क्रिस्त ', ' क्रूस ', ' कुलंबीया ', ' अल्बुकर्क ' हरे ! हरे !
श्रीगणेशाविनाची ते शिकताति धुळाक्षरें !

ता. ३० जून १५४१ रोजीं गोव्यांत सैतानाच्या भजनीं लागलेल्या लोकांची त्याच्यापासून मुक्तता करण्याकरितां हिंदु देवालयें उध्वस्त व नष्ट करण्यांत यावीं, असा ठराव झाला व त्याची अंमलबजावणीही लगेच करण्यांत आली, याचा उल्लेख वर आलाच आहे. यावेळीं सासष्ट व बारदेस हे प्रांत पोर्तुगीज सत्तेखालीं आले नव्हते. ते आल्यावर पुढें ता. २५ मार्च १५५९ रोजीं एक कायदा पुकारला तो असा : यापुढें गोवा बेटामध्यें किंवा त्याला जोडलेल्या भागामध्यें देवळें किंवा मूर्ति, घरांत किंवा बाहेर राहूं नयेत, जीं असतील तीं जाळून नष्ट करण्यांत यावीं. तसेंच लांकूड, पाषाण किंवा धातूची मूर्ति बनवूं नये व हिंदु उत्सव सार्वजनिक किंवा खासगी रीतीनें साजरे करूं नयेत. जर एकाद्याच्या घरांत देवगृह किंवा मूर्ति असल्याची शंका आली तर त्यानें ती Ouvidor geral नामक अधिकाऱ्याच्या नजरेस आणावी. म्हणजे अपराध्याची चौकशी होऊन त्याची इस्टेट जप्त करून ही गोष्ट सरकारच्या नजरेस आणणाऱ्यास अर्धी व अर्धी राहिलेली चर्चच्या खर्चास दिली जाईल. इतकेंच नव्हे तर त्या अपराधी माणसाला जहाजांवर कैदी म्हणून राबावें लागेल, अशीही सक्त ताकीद होती.[२७] हे किंवा अशा प्रकारें वेळोवेळीं हिंदुधर्माविरुद्ध जे कायदे गोव्यांत पास झाले त्यावरून गोमंतकांत महादेवाचें जीर्ण कां होईना, एकादें देऊळ, निनामी महाराजांचा मठ, किंवा साधुसंतांची उघड येजा या गोष्टी तेथें संभवनीय मानणें म्हणजे एक तर पोर्तुगीज लोक सहिष्णु होते असें मानावें लागेल किंवा ते कामचुकार होते असें तरी म्हणावें लागेल. झेवियर कॉलेजांतील विद्वान् प्रोफेसर रे. हेरास यांनीं, हिंदुस्थानांतील पोर्तुगीज सत्तेच्या ऱ्हासाला पोर्तुगीजांचें धार्मिक धोरण कारणीभूत झालें असें म्हणणाऱ्यांचें मत खोडण्याकरितां १९२८ सालीं एक निबंध लिहिला होता.[२८]

---

२७ Os Indus e a Republica. pp. 9, 15.
२८ The Decay of Portuguese Power in India, 1928.

त्यांत पोर्तुगीजांवर केलेले धार्मिक जुलमाचे आरोप म्हणजे त्यांच्यावर अवस्त्वारोप व गहजब आहे, असें त्यांनीं प्रतिपादिलें होतें. याच पुस्तकांतील प्रतिपादन त्यांनीं पुनः The Conversion Policy of Jesuits in India या नांवाच्या पुस्तकांत (प्रकाशनकाल १९३३) केलें आहे. त्याची एक प्रत त्यांनीं अलिकडेच मला दिली. यांतही त्यांनीं हिंदु लोकांना सहिष्णु रीतीनें गोव्यांत वागविण्यांत येत असे व त्यांना धर्मस्वातंत्र्य भरपूर होतें हें दाखविण्याकरितां आधार म्हणून कांहीं प्रवाशांच्या साक्षी पुढें केल्या आहेत. त्यांत सती जाण्याला देखील गोव्यांत त्याकाळीं प्रतिबंध नव्हता असें त्यांनीं प्रतिपादिलें आहे! आणि त्याकरितां पुरावा म्हणून सुप्रसिद्ध फ्रेंच प्रवासी ताव्हर्नियर यानें समक्ष पाहिलेल्या एका सतीची हकिकत दिलेली आहे. वास्तविक ही सती पोर्तुगीज अमलाखालील गोव्याची नसून कधींही पोर्तुगीज सत्तेखालीं न आलेल्या वेंगुर्ल्यांतील आहे हें त्यांनीं उद्धृत केलेल्या उताऱ्याच्या आधींच्या कांहीं ओळींत स्पष्टच नमूद आहे![२९] फादर हेरासच्या विधानांचा विचार येथें करण्यास मला सवड नाहीं. परंतु त्यांचें एकंदरींत म्हणणें काय आहे त्याची कल्पना पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होईल. जेजुइटांनीं ख्रिस्तीकरणाच्या ज्या हकिकती दिल्या आहेत त्यांतील उतारे देऊन पुढें ते म्हणतात, " After reading these extracts one remains with the impression that at least in most cases, if not in all, the work of the Jesuits was only a *posteriori*, viz. work of instruction and of baptism, *after the Hindus themselves had decided to join the Church.* The *a priori* work,- say the work of invitation, of persuation, of moral compulsion — seems to be left almost entirely to God's grace and call. "[३०]

प्रस्तुत गोमंतक काव्याच्या कथानकाला सुरवात होते ती अशी:—माधव नांवाचा एक जहागिरदार होता, व त्याची रमा नांवाची पत्नी होती. आपल्या शंकर नांवाच्या मुलाच्या पांचव्या वाढदिवसानिमित्त त्यांनीं वनभोजनाचा समारंभ

---

२९ **Travels in India ( J. B. Tavernier ) I, p. 195 ( 1889 )**

३० **The conversion policy of the Jesuits in India, p. 55.**

केला. वनभोजन आटोपून परत घरीं येतांच त्यांना ससैन्य पाद्री मंडळींनीं घेरलें व त्यांचा मुख्य अंतूनी त्यांच्यासमोर उभा राहिला. पुढें काय झालें तें पाहा--

दयाशील तया येशू ख्रिस्ताच्या प्रतिमेप्रती
चुंबुनी तो पुढें बोले भक्तिगद्गद वाक्तती :
" तो मी अंतुनिया त्याची दिक्षित प्रभुचा उभा
कार्यीं वाहुनि सर्वस्वा स्वामीचे चरणीं शुभा
शुभ प्रसरवूं लोकीं वर्तमान पवित्र तें
खंडुनी दंडुनी सारीं पाखंडीय महामतें :
या करीं धर्मराजाची पोपाज्ञा बघ मी धरीं
राजाची पुर्तुगीजांच्या राजाज्ञा आणि या करीं !
तरी सांग तुवां आजी आज्ञा भंगुनिया अशी
केलीं पाखंडकर्में हीं सुप्रसिद्धपणें कशीं ? ( पूर्वार्ध १९२-६ )
बोला रे पतितांनों कीं ऐकिलें न कधीं जरी
हिंदूंच्या धर्मकृत्या जो सुप्रसिद्धपणें करी.
सह सहायची अग्नीमाजी जात जळूनिया
सद्धर्मशत्रु तो अस्मद्राज्यशत्रु ठरूनिया ?
पाप्यांच्या दहनाग्नीचे डोंब या गगनामध्यें
प्रत्यहीं उठतांनाही देखिलेचि तुम्हीं न ते ? " (पूर्वार्ध १९९-२०१)

वाढदिवस हें धर्मकृत्य नसून सामाजिक आहे असें सांगितलें तरी त्यानें माधवाला रक्ताच्या चिळकांड्या उडेपर्यंत चाबकांनीं झोडपण्याचा सपाटा चालविला. सशस्त्र पोर्तुगीज तीस तर सभोंवती गांवकरी तीनशांवर होते ! त्यांपैकीं दुसऱ्या प्रमुख लोकांस पकडण्याकरितां म्हणून एका सैनिकास निश्चेष्टित माधवाजवळ पारावर ठेवून बाकीचे इतस्ततः गांवांत घुसले. ही संधी साधून दोनतीन माणसें पारावर आलीं व त्यांनीं त्या सैनिकावर झडप घालून माधव, रमा व त्यांचा पुत्र शंकर यांना घेऊन शेजारच्या निनामीबुवांच्या मठांत गेले व त्यांना सुरक्षितपणाकरितां बाजीच्या राज्यांत घेऊन जातों असें सांगितलें. हा निनामीबुवा सत्य व अहिंसा यांचा भक्त होता. हें काव्य जर अलीकडे लिहिलें असतें तर निनामीबुवांच्या रूपानें महात्मा गांधींचें स्वभावचित्र सावरकरांनीं त्यांचें विडंबन करण्याकरितां रेखाटलें आहे, असा त्यांच्यावर आरोप खास झाला असता ! इतर प्रमुख गांवकऱ्यांना पकडून अंतूनी पारावर येऊन पाहातो तों माधव आपला मुलगा व पत्नी यांसह अदृश्य झालेला ! निनामी-

बुवांच्या मठांत गेल्यावर त्यांना बुवानें सत्य सांगितलें व अशाप्रकारें रमामाधवांना पकडून आणून त्या गांवच्या पारावरच त्यांचा इन्साफ चालू झाला. माधवाला जाळण्याचा व रमा व शंकर यांना गुलाम म्हणून विकण्याचा अंतूनीनें निकाल दिला. पहा --

" बंड ! पाखंड ! जा धावा, धरा गर्जेति जे दुरी
सशस्त्र घुसुनी मोडा दारीं, सैनिक ! सत्वरी ! "
आज्ञेची तुटतां दोरी शिकारी कुतरे भुके
तुटोनी पडती शस्त्रीं वीस सैनिक सारखे
संगिनी भोंसकोनिया बालवृद्ध वधू जसे
जे पथीं ये तया सेना फाडफाडितची घुसे
रोधूं किती पुरे लोकां धीर जाउनिही पळूं
होता उभा तसा जो तो लागे आहेत कोसळूं.
तोंचि अंतुनिही पारावरी जे उरले दहा
आज्ञापी सैनिकां " संपे न्याय ! दंडित पाप हा
द्विज बांधुनि या वृक्षा जाळाची जित. हा चला:
कार्यनिर्वाह शिक्षेचा झटकाफटकी करा !
स्त्री ही, हें मूल हे सारे बंदिवान तसेंच, यां
टाकण्यासि गुलामांच्या बाजारांत विकूनिया. . . . .

--पूर्वार्ध ७५०-५६

धर्मशासनसंस्थेच्या न्यायाधिशाच्या न्यायदानपद्धतीचें जें वर चित्र रेखाटलें आहे, तें वस्तुस्थितीला धरून असलेलें दिसत नाहीं. इंक्विझिशनच्या अधिकाऱ्यांनीं अतिरेक केले असतील. त्यांची कार्यपद्धति क्रूर व राक्षसी होती, याबद्दलही वाद नाहीं; परंतु तिच्यामध्यें कांहींतरी पद्धतशीरपणा होता, हें विसरतां येत नाहीं. गांवच्या पारावर न्याय करून तिकडच्या तिकडे जाळून टाकण्याच्या शिक्षेची अंमलबजावणी करण्याइतका इंक्विझिशनचा कारभार म्हणजे पोरखेळ खास नव्हता. इंक्विझिशनच्या कैद्यांचे जे हाल होत ते पाहातां तेथें अशा प्रकारचा झटकाफटकी निकाल असता तर कैद्यांनीं उलट ईश्वराचे आभारच मानले असते !

स्पेन, पोर्तुगाल वगैरे भागांतील इंक्विझिशनच्या इतिहासाचे ग्रंथ उपलब्ध आहेत. परंतु गोवा इंक्विझिशनवर स्वतंत्र ग्रंथ लिहिण्यास आजपर्यंत कोणीही

धजलेला नाहीं. डॉक्टर देलों यानें जी गोव्याच्या इंक्विझिशनची हकीकत प्रसिद्ध केली ती धादांत खोटी आहे असें प्रतिपादन करण्यास मात्र पुष्कळ खिस्ती गृहस्थ पुढें आले.[३१] मीं स्वतः देलोंचा वृत्तांत व त्याच्या आक्षेपकांचे निबंधही लक्षपूर्वक वाचले आहेत व देलोंच्या ग्रंथाच्या अस्सलपणाविषयींचा माझा विश्वास बिलकुल ढळलेला नाहीं; उलट दृढच झाला आहे. इंक्विझिशनचा इतिहास लिहिणें म्हणजे खिस्ती धर्माधिकाऱ्यांना नाखुष करणें होय, असें तर लोकांना वाटतेंच; शिवाय इंक्विझिशनचा धाक त्यांच्या मनावरून कालपरवांपर्यंत गेलेला नव्हता. सुप्रसिद्ध इतिहास-संशोधक खिस्तवासी फिलीप नेर शाव्हियेर म्हणतो, " इंक्विझिशनला मीं भयंकर म्हटलें तें त्याच्या जुन्या काळच्या कृत्यांमुळें. त्यांचा धाक लोकांच्या स्मृतीवर इतका दृढमूल झाला होता कीं, इंक्विझिशनचा लोक इंक्विझिशन असा नामनिर्देश न करतां " व्हडलें ( मोठें ) घर " अशा नांवानें करीत. एके दिवशीं नदींतून होडीनें जातांना इंक्विझिशनचा वाडा कुठला हें जाणण्याच्या बुद्धीनें मीं त्या दिशेनें अंगुलीनिर्देश केला. परंतु बरोबरचे लोक मला तसें करूं देईनात ! आणि हें केव्हां तर इंक्विझिशन रद्द होऊन त्याचें केवळ नांवच शिल्लक राहिलें होतें अशाकाळीं ![३२] " यावरून गोवा इंक्विझिशनचा इतिहास अद्यापपर्यंत कां लिहिला जात नाहीं, याची कल्पना होण्यासारखी आहे.

गोवा इंक्विझिशनचा स्वतंत्र मोठा इतिहास केव्हां लिहिला जाईल तेव्हां जावो, सध्यां त्याच्या स्थापनेची गरजेपुरती थोडी माहिती सांगतों : इंक्विझिशनची स्थापना हिंदुस्थानांत व्हावी अशा प्रकारची इच्छा सेंट फ्रान्सिस झेवियर यानें ता. १६ मे १५४६ च्या पोर्तुगालच्या राजाला पाठविलेल्या पत्रांत व्यक्त केली होती.[३३] पण प्रत्यक्ष इंक्विझिशनची स्थापना १५६० सालीं झाली. पण याहीपूर्वी इंक्विझिशनच्या कार्याचें गोव्यांत सूतोवाच झालें होतें. कारण १५४३ सालीं जेरोनिमु दियस नांवाच्या एका

---

३१ (i) The Decay of the Portuguese Power in India, (Fr. Heras)
(ii) Dellon and Inquisition of Goa ( B. Fernandes ) 1936.
(iii) M. Dellon and the Inquisition of Goa ( Dr. J. Gerson da Cunha ) 1888

३२ Instruccoes dadas pelo Marquez de Alorna, 2nd Ed. 1856, Part II, p. 90.

३३ Monumenta Xaveriana, Vol. I, p. 421.

डॉक्टरला ज्यू धर्माचें आचरण केल्याबद्दल गोव्यांत बळी दिलें होतें.[३४] पिञ्जैर शागस हा पोर्तुगीज इतिहासकार त्याला जाळण्यांत आलें होतें असें म्हणतो.[३५] इंक्विझिशनचा अधिकार हिंदु लोकांवर चाले कीं काय, हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. पोर्तुगालच्या इंक्विझिशनच्या कोडाची १६४० ची आवृत्ति मीं समग्र वाचली आहे. Regimento do Santo Officio da Inquisicáo असें या ग्रंथाचें नांव आहे. त्यामध्यें ज्यांच्यावर खटले भरावेत म्हणून सांगितलें आहे त्या लोकांत ख्रिस्ती धर्माबाहेरचे लोक येत नाहींत. जे ख्रिस्ती लोक ज्यू धर्म आचरतात किंवा पाखंड मतानें चालतात, किंवा आपल्या धर्माविरुद्ध असलेले मंत्रतंत्र, द्विपत्नीकत्व, किंवा कॅथलिक धर्माला विरुद्ध असलेला कोणताही प्रकार आचरतात अशांचा मात्र निर्देश आहे.[३६] स्पेन किंवा पोर्तुगाल येथें ज्यू किंवा मूर लोक बळजबरीनें ख्रिस्ती धर्मांत ओढले गेले व ते आपल्या जुन्या धर्माप्रमाणें वागूं लागले, किंवा लूथर वगैरे पाखंडी लोक जे झाले त्यांना दडपून टाकण्याकरितां इंक्विझिशनचा अवतार होता. सुप्रसिद्ध पोर्तुगीज इतिहासकार ओलिव्हैर मार्तीस यानें न्यायमंदिराचे हक्क असलेलें टेहळणीखातें, असें इंक्विझिशनचें वर्णन केलेलें आहे.[३७] झेवियरनें आपल्या उपरिनिर्दिष्ट पत्रांत, इकडेही ख्रिस्ती लोक ज्यू व मूर धर्म आचरतात म्हणून इंक्विझिशनची आवश्यकता प्रतिपादिली होती. परंतु बळजबरीनें बाटविलेल्या हिंदु लोकांकरितांही त्याची आवश्यकता लागेल, हें त्याच्या मनांत असावें. पाखंड हा संस्कृत शब्द Heretics चा प्रतिशब्द म्हणून आपण वापरतों. कॅथलिक धर्माप्रमाणें हिंदुधर्माचरण हें पाखंड ठरत नाहीं. प्रॉटेस्टंट वगैरे इतर ख्रिस्तीपंथीय हे कॅथलिक मताच्या दृष्टीनें पाखंडी. Heresy याचा अर्थ Oxford कोशामध्यें पहा:—Theological opinion or doctrine held in opposition to the "Catholic" or orthodox doctrine of the Christian Church". पुढें Heretics संबंधीं लिहितांना सदर कोशकार

---

३४ Historia dos Christaos Novos Portuguezes ( J. L. D'. Azevedo ) Lisbon, 1922, pp. 98–99.

३५ Historia de Portugal. Vol. *IV*, Chapt *XXVII*, p. 216.

३६ Regimento da Inquisicao, 1640. Folio 12.

३७ Historia de Portugal (J. P. Oliveira Martins) Tomo II, 1886. p. 29.

म्हणतो-- When a Papist uses the word heretics, he generally means the protestants Watts. " यावरून

" केलीं पाखंड कर्मे हीं सुप्रसिद्धपणें कशीं ? "

ह्या किंवा अशा वाक्यांतील पाखंड हा शब्दप्रयोग बरोबर नाहीं, असें म्हणावें लागतें. हिंदु लोकांचा निर्देश ते gentios ( Heathens ) अशा नांवानें करीत. हिंदु लोकांनीं आपले धार्मिक उत्सव जाहीर किंवा गुप्त रीतीनें साजरे करूं नयेत म्हणून ज्या आज्ञा निघाल्या त्यांचा भंग करणाऱ्यांचीं प्रकरणें इंक्विझिशनपुढें न येतां सामान्यतः तीं इतर सरकारी कोर्टापुढें येत, अशी माझी कल्पना होती. पण इंक्विझिशन हा अधिकार स्वतःच्या हातांत घेई अशींही पुष्कळ उदाहरणें आहेत. या आज्ञेचें उल्लंघन करणाऱ्यांना जहाजांवर कैदी म्हणून पाठविण्याची शिक्षा जाहीर केलेली आढळते. Auto de Fe नामक जो शिक्षेचा धार्मिकोत्सव होत असे, त्याला ख्रिस्ती धर्मांत न गेलेल्या लोकांना बळी देतां येत नसे. पण यावरून, " The Inquisition had no jurisdiction over non-Christians " असें जें मत प्रो. हेरास[३८] वगैरे मांडतात तें सर्वांशीं खरें आहे असें नाहीं. पिरार्ड लाव्हाल नांवाचा एक फ्रेंच प्रवासी गोव्याच्या इंक्विझिशनसंबंधीं म्हणतो, " The Indian gentiles and Moors, of whatsoever religion, are not subject to this Inquisition unless they have become Christians. But per adventure an Indian, Moor or gentile inhabitant of Goa had dissuaded or hindered another that was minded to become Christian and that was proved against him, he would be punished by the Inquisition as would be he who has caused another to quit Christianity. Such cases often happen."[३९] तात्पर्य, एखाद्या हिंदूवर तोहमत आणावयाचीच झाली तर त्याच्यावर असा आरोप करणें कठीण नव्हतें. H. Institoris व J. Prenger अशा दोघां लेखकांनीं Malleus Maleficarum नांवाचा इंक्विझिशनच्या कार्यपद्धतीसंबंधीं

---

३८ The conversion Policy of the Jesuits in India, p. 11.

३९ Voyage to the East Indies ( Francois Pyrard ) Part II, 1888, P. 94.

१५९५ मध्यें एक ग्रंथ लिहिला आहे. यांत गुन्ह्याची चौकशी करण्याच्या दोन पद्धति सांगितल्या आहेत[४०]:– १ आरोपी ( accusatorial ). यांत फिर्यादीनें आरोप सिद्ध करावयाचा असतो. २ संपृच्छक ( Inquisitorial ). यांत फिर्यादीनें आरोप करून मोकळें व्हावें. इंक्विझिशनमध्यें या दुसऱ्या पद्धतीचा अवलंब करण्यांत येत असे. एकादा मनुष्य दुसऱ्यावर खराखोटा प्रत्यक्ष अथवा नांवानें किंवा निनांवी पत्रद्वारें आरोप करी. त्याप्रमाणें पहिल्या माणसाला तुला कां पकडलें असें विचारण्यांत येत असे. तें स्वतःच आरोपीनें सांगावें लागे. आरोप खोटाच असल्यास पुष्कळ हाल केले तरी तो कसा सांगणार? पुढें Auto de Fe चा दिवस नजीक आला म्हणजे Le Promoteur नांवाचा अधिकारी येऊन तुझ्यावर अनेक साक्षीदारांनीं अमुक आरोप केला आहे तर त्याची कबुली देऊन मोकळा हो, असें सांगे. हे लोक सांगतील त्याप्रमाणें कबुली देऊन तो मोकळा झाला तर कांहीं दण्ड व व्रतनियम यांच्यावर त्याची सुटका होई. नपेक्षां Auto de Fe मध्यें अग्निनारायणाला बळी पडे! अशा प्रकारची माहिती डॉ. देलोंनें ज्यू धर्माचा आरोप झालेल्या नवख्रिस्त्याचें उदाहरण देऊन सांगितली आहे.[४१] आपल्यावर आरोप करणारे हे साक्षीदार कोण हें मात्र त्या आरोपीला बिलकूल कळविण्यांत येत नसे.

इंक्विझिशन ही संस्था हिंदु लोकांवर आक्रमण करीत असे याला पुष्टि देणारे अनेक पुरावे पुढें करतां येतील. गोवा, वसई वगैरे पोर्तुगीज अमलाखालील हिंदूंनीं पोर्तुगालच्या राजाला केलेला एक अर्ज उपलब्ध आहे. त्याच्याबरोबर व्हाइसरॉयनें पाठविलेल्या पत्राची तारीख २२ जानेवारी १७२७ ही आहे. त्यांतील एक उतारा पहा: –

" आपल्या घरांत गुपचूपपणें ख्रिस्ती माणसांना कळूं न देतां फक्त आपल्या कौटुंबियांसह आमच्या पूर्वजांनीं नेमून दिलेले धर्माचार व चालीरीति आम्ही पाळितों हें नैसर्गिक हक्कांच्या विरुद्ध नसून ख्रिस्ती समाजालाही त्रासदायक नाहीं. तथापि असें असूनही कांहींजण–आणि कित्येकदां हजर असलेले हिंदूही–त्याप्रसंगीं हजर असलेल्यांकडून माहिती काढून सदर आचारासंबंधीं इंक्विझिशनकडे चुगली

---

४० Studies in the History and Methods of Science, Edited by Charles Singer, 1917 ( Withington यांचा निबंध पहा.)

४१ Relation de l' Inquisition de Goa, Paris, 1688, pp.161–3.

करतात आणि हें न्यायालय त्या निरुपद्रवी आचारांना गुन्ह्याचें स्वरूप देऊन ते पाळणाऱ्यांवर खटले उभारतें. इतकेंच नव्हे तर राजरोसपणें फटक्यांची अगर दारूच्या कोठारांत कोंडण्याची सजा देतें. कोंडण्याचा कालावधि कमीअधिक असला तरी ही सजा सर्रासपणें देण्यांत येत असते, हें प्रसिद्ध होणाऱ्या निकालांवरून आढळून येईल. अशा गांजणुकीला सुरवात बहुशः आल्जुबच्या व इंक्विझिशनच्या कोठडींत कोंडण्यापासून होते. या तुरुंगवासांत कितीतरी कैदी आपल्या प्राणास मुकत असतात. कारण त्यांच्या रूढीप्रमाणें स्वजातीय स्वयंपाक्याकडून शिजविलेल्या अन्नाशिवाय त्यांना इतरांच्या हातचें अन्न चालत नसतें. त्यामुळें केवळ कोरड्या वस्तू भक्षून राहाणें त्यांना भाग होऊन त्यांना प्राणघातक दुखणीं जडत असतात. अशा रीतीनें खटल्याच्या निकालापूर्वींच ते मरून जातात. आणि वांचलेच तर शिक्षा भोगतां भोगतां थोड्याच काळांत निधन पावतात. या शिक्षांची जबर दहशत बसली असल्यामुळें व कोणत्या वेळीं चुगली होऊन आपण इंक्विझिशनच्या तावडींत सांपडूं याचा नेम नसल्यामुळें बहुतेक हिंदु लोक परदेशगमन करीत असतात." वगैरे वगैरे.[४२] इंक्विझिशनच्या विरुद्ध हिंदूंचें गाऱ्हाणें यापूर्वींही पोर्तुगालच्या राजेसाहेबांकडे गेलेलें दिसतें. कारण अलिकडे जो इंक्विझिटरचा पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला आहे त्यांत ता. २३ डिसेंबर १६१६ चें एक पत्र असून त्यांत जे हिंदु व मुसलमान आपले धार्मिकोत्सव साजरे करतात त्यांना आपण कां पकडतों याचा राजेसाहेबांनीं विचारल्यावरून खुलासा केला आहे.[४३] गोवें सरकारचे राजदप्तरी आमचे मित्र रा. पिसुर्लेकर यांनीं आपल्या एका लेखांत यासंबंधीं जास्त विलक्षण पुरावा पुढें आणला आहे. त्यावरून इंक्विझिशनच्या अचाट सामर्थ्याची कल्पना होते. मंगेश शंकर शेणवी केंकरे नांवाच्या एका सन्मान्य गृहस्थानें आपले तीन पोरके नातू गोव्याबाहेर पाठविले. म्हणून त्याच्यावर खटला भरण्यांत येऊन १६६२ सालीं त्याला मोझांबिक येथील कामा नांवाच्या नदीवर सहा वर्षांची हद्दपारीची शिक्षा झाली. एखादा हिंदु मुलगा, आई, बाप, आजा किंवा अन्य वडील माणसाशिवाय असला व सज्ञानावस्थेंत जर तो आला नसला तर अशा पोरक्या मुलांना बाप्तिस्मा देऊन ख्रिस्ती धर्माचें शिक्षण देण्याकरितां Pae dos Christãos नांवाच्या एका धर्माधिकाऱ्याच्या स्वाधीन करावा, अशी आज्ञा १५५९ सालीं सुटली होती. या

---

४२ Archivo Port. Oriental. Fasc. IV. Supp. 2 Doc. 105.

४३ A Inquisicao de Goa. Vol. II, 1930 (No. CXIX.) p. 545.

आज्ञेचा विपरीत अर्थ करून हिंदु लोकांचीं मुलें बळजबरीनें हिसकावून नेल्याबद्दल कितीतरी तक्रारीअर्जे गोवा सरकारच्या दप्तरांत सांपडतात. सज्ञानावस्थेंत असलेल्या व ज्यांचे आईबाप हयात आहेत अशा मुलांनाही बळजबरीनें नेण्यांत येऊं लागलें.[४४] सदर केंकरे हा ग्रोंकू नांवाच्या तुरुंगामध्यें आपल्या शिक्षेची वाट पाहात पडला असतां गोवा सरकारचे एक राजकीय वकील रामोजी कोठारी यानें व्हाइसरायसाहेबाकडे त्याच्या सुटकेबद्दल गळ घातली व त्याप्रमाणें इंक्विझिटरकडे मागणी केली असतां व्हाइसरॉयला त्यानें झिडकारून लावलें. हें प्रकरण इंक्विझिटरच्या अधिकाराखालीं येत नाहीं, अशा प्रकारचा प्रश्न कौन्सिलमध्यें व अन्यत्र व्हाइसरायानें उपस्थित केला. परंतु इंक्विझिटरच्या कामांत ढवळाढवळ न करतां त्यांच्या धर्मकार्यांत मदत करीत जावें, अशा प्रकारची तंबी राजेसाहेबांकडून व्हाइसरायला मिळाली, व इंक्विझिशनचा शत्रु असल्याबद्दल त्याच्यावर आरोप करण्यांत आला.[४५] तात्पर्य इंक्विझिशन हिंदु लोकांवर अत्याचार करी हें सावरकरांचें मत पुष्कळ ख्रिस्ती लोक मान्य करीत नसले तरी तें वस्तुस्थितीला सोडून नाहीं. पण, हिंदु लोकांना इंक्विझिशनकडून जाळण्यांत येत असे व हे दहनविधि वाटेल तेव्हां करतां येत असत या म्हणण्याला मात्र इतिहासाचा आधार नाहीं. गोवा इंक्विझिशनचें दप्तर गोव्यांत नाहीं, असें गोवा सरकारच्या संशोधनखात्याचे अध्यक्ष, गोवा हायकोर्टचे मुख्य न्यायाधीश डॉ. ब्रागांस पेरैर यांच्याकडे समक्ष चौकशी करतां मला कळलें. रा. पिसुर्लेंकरही असेंच सांगतात. परंतु बॉंबे हिस्टोरिकल सोसायटीचे सेक्रेटरी, माझे मित्र मि. ब्राझ फेर्नांडिस हे सदर दप्तर गोव्यांतच आहे, इतकेंच नव्हे तर आपण स्वतः तें पाहिल्याचें ठांसून सांगतात. हें दप्तर जर उपलब्ध असतें तर यासंबंधीं निश्चित विशेष माहिती मिळाली असती. मीं जे या Auto de Fe संबंधीं निरनिराळे अनेक उल्लेख वाचले आहेत, त्यांत हिंदु लोकांना जाळल्याचा निर्देश मला सांपडला नाहीं. जुवांव देल्गाद फिगैर नांवाच्या गृहस्थानें १५६१ ते १६२३ पर्यंत गोवा इंक्विझिशनचे जे खटले झाले त्यांचा रिपोर्ट तयार केला असून तें हस्तलिखित लिस्बनच्या बिब्लिवोतक नासियो-

---

४४ **Livro de Mocoes No. 93, Folio 520 ( Arch. Por. Oriental, VI, Doc. No. 98. )**

४५ **Agentes Hindus da Diplomacia Portugueza na India, I Cothari ( P. Pissurlencar ) ) 1933, p. 37 & 4.**

नालमध्यें आहे.[४६] त्यावरून असें दिसतें कीं, या कालांत एकंदर ३८०० लोकांवर खटले भरण्यांत आले. सर्वांत भयंकर दहनोत्सव १५७५ व १५७८ हे होते. पहिल्यामध्यें एकोणीस लोक जाळण्यांत आले. त्यांपैकीं दोन लूथरानुयायी म्हणून व बाकीचे ज्यूधर्माचरण केल्याबद्दल. दुसऱ्या उत्सवांतील सगळेच बळी ज्यू-धर्माचरणाबद्दल होते. १५९० ते १५९७ या कालांत एकाही माणसाला देहान्त-शासनाची शिक्षा झाली नाहीं.[४७]

दुसऱ्या एका युरोपियन संशोधकानें १६०० ते ७ फेब्रु. १७७३ पर्यंत झालेल्या Auto de Fe ची माहिती दिली आहे.[४८] तिच्यावरून पाहतां या अवधींत ४०४६ लोकांवर खटले भरण्यांत आले ( ३०३४ पुरुष व १०१२ बायका ). यांपैकी ५७ लोकांना जिवंत जाळण्यांत आलें ( ४१ पुरुष व १६ बायका ). वास्तविक देहान्तशासनाची शिक्षा १२१ माणसांना सांगण्यांत आली होती. परंतु त्यांपैकीं ६४ तुरुंगांतच मेल्यामुळें अगर बेपत्ता झाल्यामुळें त्यांचीं हाडें व पुतळे करून ते जाळण्यांत आले ! यावरून सावरकरांनीं वर्णन केलेला दहनविधि अथवा

“ पाप्यांच्या दहनाग्नीचे डोंब या गगनामध्यें
**प्रत्यहीं** उठतांनाही देखिलेचि तुम्हीं न ते ? ”

किंवा

राञींत या जरी कांहीं सदुपाय न योजिला.
जिवंत हा उद्यां साधो ! द्विज जाइल जाळला !

किंवा

व्यूह बांधोनि सैन्यानें वीर अंतुनि गर्जेला
जाळा या दंडितां येथें अंगणांतचि या चला.

अशा प्रकारचे उद्गार अतिशयोक्तीचे किंवा ऐतिहासिक सत्याला सोडून आहेत, असें म्हणावें लागतें. कारण चौकशीचा फार्स झाला तरी तो पद्धतशीर

---

४६ Reportorio geral de 3800 processos de Santo officia do Goa etc. por João Delgado Figueira(1623), MS. Biblio. Nacional. cod. 203.

४७ Historia dos Christãos Novos Portuguezes ( J. L. D. Azevedo ) Lisbon 1922, pp. 231-32.

४८ Descripscao Geral e Historica das Moedas de Portugal ( A. L. Teixeira de Aragão ) Lisbon, 1880, p. 48.

केल्याखेरीज व निदान एक वर्ष तरी कैद्याला तुरुंगांत ठेवून कबुल्या घेतांना यातना-यंत्राखालीं ओढल्याखेरीज त्याची सुखासुखी, मरणानें कां होईना, मुक्तता होत असे, असें मला वाटत नाहीं.

ता. ३० डिसेंबर १७३६ सालीं साजऱ्या झालेल्या या धर्मविधीचा ( Auto de Fe ) मात्र अवश्य उल्लेख केला पाहिजे. कारण या दिवशीं वसई येथील एक सगळेंच्या सगळें कुटुंब गोव्यांत जाळण्यांत आलें, व त्याचें घरदार व शेतवाडी भुईसपाट करून त्या जागीं एक पाषाण ठेवण्यांत आला. त्यावर अनेक लोकांसहित या लोकांनीं पूर्वधर्मविधि साजरे केल्याबद्दल त्यांना अमुक शिक्षा झाली वगैरे मजकूर कोरला होता. हा दगड १८४० पर्यंत त्या जागीं होता.[४९] वसई येथील इंक्विझिशनच्या या भयंकर प्रकारामुळें वसईच्या मोहिमेला विशेष चालना मिळाली असली पाहिजे, हें उघड आहे. ता. २६ एप्रिल १७३७ रोजीं पोर्तुगीज हिंदुस्थानचे व्हाइसराय कोंद द सांदोमील यानें सासष्टी ( उत्तर ) बेटाचे मुख्य कॅप्टन जुवांव द सौज फेराज याला लिहिलेलें पत्र उपलब्ध आहे. त्यांत " इंक्विझिशनच्या शिक्षांमुळें आपण म्हणतां तसें सासष्टीच्या हिंदूंनीं राजद्रोह करण्याचें मनांत आणावें, हें अगदीं स्वाभाविक आहे," वगैरे उद्गार काढले आहेत.[५०] तात्पर्य, उपरिनिर्दिष्ट इंक्विझिशनचें क्रौर्य हेंच वसईच्या मोहिमेचें शीघ्र कारण ( immediate cause ) होऊन उत्तर कोकणांतील पोर्तुगीज सत्तेचा कपाळमोक्ष सदर शिलेनें केला, असें वाटूं लागतें.

हिन्दु लोकांना ज्याप्रमाणें इंक्विझिशनला ते ख्रिस्ती धर्मांत गेल्याशिवाय जाळतां येत नसे त्याप्रमाणें इंक्विझिशनच्या कोणत्याही कैद्याला मग तो ख्रिस्ती किंवा हिन्दु असो, गुलाम म्हणून विकतां येत नसे, अशी माझी कल्पना आहे. अर्थात्

**" स्त्री ही, हें मूल, हे सारे बंदिवान तसेंच यां**
**टाकण्यासि गुलामांच्या बाजारांत विकूनियां**
**न्या पायीं ठोकुनी बेड्या, चावडींतचि या क्षणीं**
**ठेवा गोव्यास जों आम्ही जाऊं तोंवरती झणीं "**

---

४९ O gabinette lit. das Fontainhas, tom. III. p. 60.

५० Maratas em Bacaim ( P. Pissurlencar ) 1935, p. 59; Livro de Bacaim no. 6, F. 146 v.

हे अंतुनीचे उद्गार व त्याला धरून असलेला पुढील कथाप्रसंग ऐतिहासिक सत्याला धरून आहे, असें मला वाटत नाहीं. पहा---

मग गोव्यांतील हाट मुख्य जो तिथें
नेती आम्हांसि पृथक् बांधबांधुनी
दाव्यांनीं प्रत्यक्षचि पशु तसे, मुला !
भाजी-हाटांत जशीं लोक पडवळें
तैसे आम्हांसि विकूं तेथ लागले.
मूल नेत विकत कुणी, आइसी दुजाः
भावासी एक पतिसि एक, तिज तिजा
दाव्यांनीं खेचित रे, त्या दयामया
छायेंतचि येशूच्या मंदिराचिया
सत्यधर्म विहितकर्म समजुनीच या ।
नेलें मज एकानें तीस रुपायां
अन्यानें जाऊनी ! हायरे हृदीं--

उत्तरार्ध, १८९०

माधवादि हिंदूंना जाळल्यावर

वीर साश्रु सर्वे काढी तो वृत्तांत लिहोनिया
प्रेषूं अंताजिपंतातें, वारंवार कथूनि ' या ! '
घ्याया ग्रामा स्वराज्याच्या पदरीं वळवूनिया
राष्ट्रवीर प्रधान श्रीबाजी हर्षनिधान या !
स्वाक्षर ग्राममुख्यांनीं पत्रिका करुनी दिली
जींत रक्षा हुतात्म्यांची अंगाऱ्यास्तव घातली.

पूर्वार्ध ९०८-१०

इंक्विझिशनच्या हतभागी कैद्यांचा दहनविधि जागच्या जागीं न होतां गोव्यामध्यें Campo de São Lazaro नांवाच्या मैदानांत होत असे. व तोही इंक्विझिशनच्या अधिकाऱ्याकडून नसून साध्या ( Secular ) अधिकारांच्या हातून.[५१] या दहनविधीसंबंधीं तपशीलवार माहिती मी येथें देत नाहीं. असो.

---

५१ Historical & Archaeological Sketch of the city of Goa ( T. N. da Fonseca ) 1878, p. 219.

अंताजीपंत किंवा बाजीराव यांचा संबंध गोमंतकाशीं दाखविण्यापेक्षां या काव्याला वसई असें नांव देऊन वसईच्या मोहिमेवर हें काव्य लिहिलें असतें तर जास्त इतिहासाला धरून झालें असतें. बाजीरावाच्या हालचालींचा तक्ता[५२] पाहातां नवंबर १७३८ ते मार्च १७३९ या कालांत उत्तर कोकणांत ठाणें, वसई, तारापूर वगैरे भागांत त्याचें गमन झालेलें दिसतें, पण गोमंतकांत तो गेलेला दिसत नाहीं. दक्षिण कोंकणांत बाजीरावाचा मेहुणा व्यंकटराव घोरपडे यानें स्वारी केली होती ही गोष्ट खरी, परंतु त्या स्वारीचा उद्देश स्वधर्मरक्षणाचा नव्हता. रा. पिसुर्लेकर यांनीं आपल्या निरनिराळ्या पुस्तकांत[५३] या स्वारीसंबंधीं लिहिलें आहे व ती माहिती मराठी वाचकांस रा. यशवंत न. केळकर यांनीं आपल्या पुस्तकांत[५४] बरीचशी उपलब्ध करून दिली असल्यामुळें त्यासंबंधीं येथें जास्त लिहिण्याची गरज नाहीं. यावेळीं सावंत, कोल्हापूरकर व पेशवे एक होऊन त्यांनीं पोर्तुगीजांना कात्रींत पकडलें होतें. याप्रसंगीं जर या लोकांनीं जरा जास्त नेट धरला असता तर पोर्तुगीज सत्तेचें गोमंतकांतून उच्चाटण खास झालें असतें. परंतु मराठ्यांचे हे सरदार व गोमंतकांतील वजनदार हिंदु लोक यांचें हिंदुधर्मरक्षणापेक्षां आपल्या स्वार्थाकडे लक्ष असल्यामुळें ही संधि त्यांनीं वायां दवडिली. रा. पिसुर्लेकर हे काय लिहितात पहाः—

" व्यंकटरावाचा कारभारी गोविंदराव ठाकूर हा सावंतवाडीचा असल्यामुळें तो गोव्याचा माहितगार होता. त्यामुळें गोव्यांतील हिंदु लोकांस धार्मिक स्वातंत्र्य नसल्यामुळें किती त्रास पोहोंचत असे ह्याची कल्पना गोविंदपंतास होती. पण दादाजी-रावास किंवा खुद्द पेशव्यांस गोमंतकासारख्या दूरच्या प्रदेशांतील धार्मिक प्रश्नास विशेष लक्ष देण्याची आवश्यकता भासत नव्हती, व ही गोष्ट पोर्तुगीज विजरईस पूर्णपणें ठाऊक होती. यद्विषयीं विजरई कोंदि द सांदोमिल यानें लिहिलें आहे कीं, " गोव्यांतील हिन्दु लोकांस धर्मस्वातंत्र्य असावें ह्या मुद्दयावर मराठे भर देतील असें वाटत नाहीं. गेल्या वर्षी वेंकटरावानें इकडे केलेल्या तहनाम्यांत ह्या विषयासंबंधानें कोणतेंच कलम घातलें नाहीं. सांतू शेणवीयांकडून बाजीरावानें पाठवून दिलेल्या तहाच्या खडर्यांतही ह्या बाबतींत एक शब्ददेखील लिहिलेला

---

५२ पहिले बाजीराव पेशवे ( प्रो. ना. के. बेहरे ) १९३०, पृ. ७५

५३ ( i ) Como se Perdeu Bacaim, 1932, ( ii ) मराठ्यांच्या गोव्यांतील स्वाऱ्या, १९३८.

५४ वसईची मोहीम, १९३९.

नव्हता. भोसल्यांच्या तहाच्या वेळीं बाजीराव व चिमाजी अप्पा यांनीं ह्या मुद्द्याची आठवण जरी काढली तरी त्यांनींच त्याकडे दुर्लक्ष केलें. ह्या सर्व अनुभवसिद्ध गोष्टी लक्ष्यांत आणतां मला वाटत नाहीं कीं, केवळ धर्मस्वातंत्र्याच्या मुद्द्याकरितां मराठ्यांस इतका फायदेशीर असलेल्या ह्या तहास त्यांच्याकडून विरोध होईल." विजरईनें लिहिल्याप्रमाणें खरोखर मराठ्यांकडून गोव्यांतील धर्मस्वातंत्र्याच्या मुद्द्यावर भर देण्यांत आला नाहीं. मग ह्या गोष्टीस विजरईनें निर्दिष्ट केलेलें उपरोक्त कारण झालें असेल किंवा दुसरी एखादी अंतस्थ भानगड उपस्थित झाल्यामुळें पेशव्यास सदर मुद्द्याकडे काणाडोळा करणें अवश्य वाटलें असेल. इतकें मात्र खरें कीं, दादाजीरावानें चिमाजी अप्पास लिहिलेल्या पत्रांत गोमंतकांत "हिंदुधर्म चालवावा" असा ठराव झाल्याचें वृत्त कळविलें होतें. पण ह्याविषयीं सदर तहनाम्यांत एक शब्ददेखील आढळत नाहीं. पुढें इंचबर्डच्या मध्यस्थीनें बाजीराव व पोर्तुगीज यांमध्यें तहाच्या वाटाघाटीस पुनः सुरवात झाली. त्यावेळीं श्रीमंतांनीं " साष्टी बारदेशांत महाराष्ट्रधर्म ज्यांचा ते करितील त्यांस फिरंगी यानें चालवावें. देखील गोवियांत महाराष्ट्रधर्म चालवावा," असें कलम तहाच्या खड्यांत घातलें होतें. पण हेंही कलम पेशव्यानें तहाच्या प्रसंगीं गाळलें ! "[५५]

पोर्तुगीज व पेशवे यांमध्यें झालेला या वेळचा तह पाहतां पेशव्यांचें मुख्य लक्ष स्वधर्मरक्षणाकडे नसून पोर्तुगीजांकडून मिळणाऱ्या सात लक्षांकडे व इतर व्यावहारिक फायद्याकडे होतें, असें स्पष्ट दिसतें. व्यंकटरावाबरोबर गोव्याच्या स्वारीवर गेलेला दादाजीराव भावे व त्याचा मुलगा भास्करराव हे तर फिरंग्यास फितूर होते, ही गोष्ट रा. पिसुर्लेंकर यांनीं साधार सिद्ध केली आहे.[५६] पण खुद्द गोव्यांतील हिंदु लोक काय करीत होते हेंही रा. पिसुर्लेंकरांच्याच शब्दांतच सांगितलेलें बरें. ते लिहितात, " प्रस्तुत लढाईच्या वेळीं व तदनंतर झालेल्या तहविषयक वाटाघाटीसंबंधाच्या प्रसंगीं गोव्यांतील कित्येक हिंदु पुढारी फिरंग्याच्या बाजूनें वावरतांना दिसतात. विठोजी शेणवी धुमे, बहुगुण कामत, वाघ, वेंकट कामत, उपी कामत, बाबुलो शेणवी सुखटणकर, सांतू शेणवी ढांगी, बाबुराव देसाई, म्हाबळू पै घांटये प्रभृति गोवेकर हिंदु लोक फिरंग्याचें हित साधण्याच्या उद्देशानें मराठ्यांकडे राजकारणें लावीत असत. पण फिरंगी लोकांची हिंदूविषयीं वर्तणूक प्रायः विरोधीपणाची होती. ती

---

५५ मराठ्यांच्या गोव्याकडील स्वाऱ्या ( सरदेसाई स्मारक ग्रंथ ) पृ. २९.
५६ सदर पृ. २६, ३४.

इतकी कीं, व्यंकटरावाच्या स्वारीच्या वेळीं हिंदु लोकांस सरसकट गोव्याबाहेर हांकून लावून त्यांची सर्व संपत्ति जप्त करावी, अशा मताचा एक वर्ग फिरंगी अधिकाऱ्यांत होता."[५७] तात्पर्य, मराठे सरदार काय किंवा गोव्यांतील हिंदु लोक काय, या सर्वांचें लक्ष वैयक्तिक स्वार्थाकडे होतें. हिंदुधर्म किंवा एकन्दर हिन्दु समाज यांच्यासंबंधींची आस्था कुणालाही नव्हती !

गोमंतक काव्याच्या उत्तरार्धांत सीन एकदम बदलतो ! जें भार्गव ग्राम १७३८ मध्यें पोर्तुगीजांच्या सत्तेखालीं होतें तें १७५८ सालीं पेशव्यांच्या सत्तेखालीं नांदू लागतें. हिंदु हुतात्म्यांच्या स्मृतीकरतां त्या जागीं भव्य समाधि बांधिली जाते. पहा.–

**या समाधिमंडपार्थ पेशवे प्रभू**
**भूम्यादिक सुप्रबंध करुनिया, स्वयें**
**पाचारिति यात्रा : प्रतिवर्ष जी भरे.**
**ही कायापालट ह्या गांवची अशी**

तसेंच अंतुनीसह लढलेल्या वीराला पेशवे प्रभू त्या गांवची पाटिलकी देतात. असा हा गोमंतकांतील कोणता भाग फिरंग्यांकडून पेशव्यांच्या ताब्यांत आला हें मला माहीत नाहीं. आणखी पहाः—

**पूर्वीं जें परदास्यें लोक पीडिला**
**ते ज्या ज्या म्लेंच्छबलात् वा छलात् खळी**
**भ्रष्टविती हीन दीन हिंदु जनांसी**
**त्या त्या पर–धर्महुता बांधवांप्रती**
**पुनर्हिंदुसंस्करणें शुद्ध करोनी**
**सुस्वागत पितृगृहासि आणणें असे**
**जातिकार्यसाधनार्थ ह्याचि आजला**
**यात्रेसी या अपूर्व लोकसंघ ये**

या यात्रेस छत्रपति शिष्टमंडळ पाठवितात, व आंग्रे, घोरपडे, सावंत, तसेंच कोकणचे देशमुख व इतर अधिकारी हजर राहातात.

हें वर्णन वसईसंबंधीं संभवनीय झालें असतें. पेशव्यांच्या कालांत शुद्धीचा प्रयत्न कितपत जोराचा झालेला होता, हें मला माहीत नाहीं. बाजीरावाला मस्तानी-

---

५७ मराठ्यांच्या गोव्याकडील स्वाऱ्या, पृ. २८

पासून झालेला मुलगा समशेर याची मुंज करण्याचा त्याचा बेत होता, असें म्हणतात. काशीबाईपासून झालेले चार पुत्र जसे ब्राह्मण, तसाच मस्तानीचा पुत्रही ब्राह्मण मानला जावा, असा त्याचा हट्ट होता.[५८] पण यांत हिंदुकरणासंबंधींच्या आस्थेपेक्षां मस्तानीवरील प्रेमाचाच किंवा पितृवात्सल्याचा जास्त संभव दिसतो !

शिवाजी हा धार्मिक बाबतींत सहिष्णु वृत्तीचा होता, अशी साक्ष डॉ. डेलों वगैरे परकीय लोकांनीं दिलेली आहे.[५९] पण त्यानें शुद्धीकरणाचाही प्रयत्न केला होता, असें म्हणतात. पहा—

" Between 1665 and 1670 when he attacked and secured many outlying parts of the Portuguese territory, Shivagy is said to have taken much care that the people should be purified by Brahmins and brought back to Hinduism. After Shivagy's death the work ceased. But about fifty years later ( 1737–1743 ) when Bassein and whole of the Portugueze territory fell into the hands of Marathas many Churches were destroyed and numbers of Christians were according to the local story purified by Brahmins and admitted into Hinduism. "[६०]

बजाजी निंबाळकर हा आपल्या वतनाच्या संरक्षणाकरितां मुसलमान झाला होता. त्याच्या मुलानें परत हिन्दुधर्मांत येण्याची इच्छा दर्शविल्यावरून शिवाजीनें त्याला जातगंगा बोलावून शुद्ध करून घेतलें, इतकेंच नव्हे तर त्याला आपली मुलगी सखूबाई ही देऊन जांवई केलें हें प्रसिद्ध आहे. शिवाजीनंतरही हें शुद्धीचें कार्य चालूच होतें, हें हरसूल येथील गंगाधर रं. कुळकर्णी यास दिलेल्या श. १६०८ तील शुद्धिपत्रावरून दिसून येईल.[६१]

---

५८ पहिले बाजीराव पेशवे ( प्रो. ना. के. बेहरे ) पृ. २८३.

५९ शिवा व गोवा हा माझा ( विविधज्ञानविस्तारांतील, १९३७ ) निबंध पहा.

६० Bombay Gaz. ( Thana ) Vol. VII, Part I, p. 202.

६१ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, ( राजवाडे ) खं. ३, पृ. ३६.

पण वसई जिंकल्यावर वसईच्या किल्ल्यांत मारुतीची स्थापना केली व आंतोन वगैरे पाद्री व इतर काळे कातडीचे किरिस्तांव यांस कोणताही अंदेशा न धरतां बेशक राहावें, असा कौल देण्यापलीकडे शुद्धीकरणासंबंधीं विशेष कांहीं केल्याचें या विषयावरील साक्षेपी लेखक रा. य. न. केळकर सांगत नाहींत.[६२]

वर जो गॅझेटियरचा उतारा दिला त्यानें वसई येथील शुद्धीकरणाबद्दल डॉ. जेर्सन कुन्नचा आधार दिला आहे, तो पाहातां माधवरावानें नेटिव्ह ख्रिस्त्यांच्या शुद्धी करणाऱ्या ब्राह्मणांस मदत करण्याबद्दल एक कर चालू केला होता, असें त्यांत नमूद आहे.[६३] डॉ. कुन्न यानें ही माहिती जॉन व्हॉपेल याच्या वसईवरील टांचणावरून दिलेली दिसते. आपल्या मूळ जातींत घेण्याच्या अगोदर ख्रिस्ती लोकांचें शुद्धीकरण करणाऱ्या ब्राह्मणांस मदत करण्याकरितां कर लादला होता असें सांगून, "I do not believe that very many were re-converted in this manner," असेंही व्होपेलनें नमूद केलें आहे.[६४] वसईकडे चौकशी करतां ' नवीन मराठे ' नांवाची एक ख्रिस्ती लोकांना परत धर्मांत घेतलेल्यांची स्वतंत्र खालच्या लोकांची जात तिकडे असल्याचें कळलें.

बाजीरावाच्या कारकीर्दींत शुद्धीकरणाला बराच विरोध होता, असें दिसतें. गणेश नाईक नांवाच्या उत्तर कोकणांतील एका पळशा गृहस्थाला इंक्विझिशननें गोव्याला नेऊन बाटविलें व त्याला इनासियु द सांत तेरेज असें नवें ख्रिस्ती नांव दिलें. हा आर्यवैद्य होता. त्या काळीं व्हाइसराय, आर्चबिशप यांच्यामध्येंही आर्यवैद्यकाला फार मान असल्यामुळें या बाटग्या गणेश नाईकाला व्हाइसरायानें स्वतःच्या घरींच ठेवून घेतलें; बाप्तिस्म्याचे वेळीं आर्चबिशप हाच त्याचा गॉडफादर झाला म्हणून आपलेंच नांव त्यानें गणेश नायकाला दिलें. त्याला पोर्तुगीज चांगलें लिहितां व वाचतां येत असे. पुढें तो परत उत्तरेकडे गेल्यावर जुन्या धर्माप्रमाणें राहूं लागला व पोर्तुगीजांचा कट्टा वैरी बनला.[६५] याच्या संबंधीं कृष्णाजी राम नांवाचा एक पत्रलेखक मुंबईहून

६२ वसईची मोहीम, पृ. २१०-११

६३ Notes on the History and Antiquities of Chaul and Bassein, 1876, p. 149.

६४ Transactions of the Bomb. Geo. Society ( 1844–46 ) p. 138.

६५ A Campanha Luso-Marata de Bacaim (P. Pissurlencar) 1942, p. 9 and 27.

लिहिलेल्या पत्रांत म्हणतो, " प्रांत फिरंगाण म्हणून फिरंगी पत्रीं लेख आहे त्याचा शोध करतां आपणास कलों आलें कीं तो गणेश नाईक वैद्य आम्हांपासीं होता, येथून गोमांतकांत जाऊन किरिस्तांव जाहाला, बाटला तो फिरून तुमचे प्रांतीं नांव बदलून दुसरें नांव सांगतों. तो वैद्य असेल तर तुम्हीं बहुतांचे पालणार आहां. सहसा त्याचें औषध न घेणें. "[६६]

शुद्धीचा पुरस्कार करण्याकरितां सावरकरांनीं विशेषतः हें काव्य लिहिल्याचें दिसतें. त्यांनीं बाजीरावापेक्षां शिवाजीचा व गोमंतकाचा संबंध दाखवून जर हें काव्य लिहिलें असतें तर त्यांना तें जास्त इतिहासाला धरून लिहितां आलें असतें. कारण शिवाजी गोमंतकांत गेला होता व तें घेण्याचा त्यानें अनेकवार प्रयत्न केला होता. तो कसा फसला वगैरे संबंधीं माहिती मीं '**शिवा व गोवा**' या निबंधांत दिली आहे.[६७] शुद्धीकरणाचा प्रयत्न शिवाजीच्या पूर्वीही गोव्यांत होत नव्हता असें नाहीं. फादर थोमस स्टिफन्स यानें आपल्या बंधूस लिहिलेल्या पत्रांवरून यासंबंधीं थोडी कल्पना करतां येते. एका ब्राह्मण मुलाला पाद्री लोकांनीं फूस लावून नेऊन बाटविला व स्टिफन्स तेथें आल्यावर त्याच्या स्वाधीन केला. त्याचा भाऊही पण ख्रिस्ती झाला होता. पण त्यानें तो धर्म पुढें सोडला. पहिल्या मुलाचेंही ख्रिस्ती धर्म सोडण्याबद्दल मन वळविण्याचे त्याच्या आईनें पुष्कळ प्रयत्न केले परंतु तो ऐकेना. शेवटीं 'घराचा शेवटचा निरोप घेण्याकरितां म्हणून तरी जरा ये,' असें सांगून त्याला त्यांनीं घरीं नेलें व अडकवून ठेविलें. असें सांगून पुढें स्टिफन्स लिहितो, " His mother tempted him in all possible ways, trying to persuade him to give up the Christian faith as his brother had done; ...... When he had thus lain in chains for ten days or more, a certain apostate came to him ...... The apostate called Bernard's ( त्या मुलाचें ख्रिस्ती नांव ) mother and said to her:— " I praise your efforts, but beware of being deceived by too great a hurry. ...... He fell away from us gradually, and gradually must he be recovered. For we, too, were Christians once upon

---

६६ पेशवे दप्तर, खं ३३, No. 123.
६७ शिवा व गोवा ( विविधज्ञानविस्तार ) १९३७.

a time. Gradually were we won over to the Christian religion and gradually did we leave it.[६८]

हें पत्र ता. २४ ऑक्टोबर १५८३ चें आहे. यावेळीं हिंदुधर्मांत परत येण्यास लोकांना द्वार मोकळें होतें, असें स्पष्ट दिसून येईल. पण अशा लोकांना स्वधर्मांत परत जाऊं देऊं नये म्हणून तर इंक्विझिशनचा अवतार होता, ही गोष्ट विसरतां येत नाहीं. लोक चर्चमध्यें जाऊन बाह्यतः ख्रिस्ती असल्याचें सोंग करीत, पण घरांत हिन्दुधर्म आचरीत. गिमाराईस हा उत्तरकोकणांतील पुराणकार म्हणतो,

एके चाकराच्यान नाहीं करवे,
दोघां सायबांची चाकरी,
दोघवांना ठकवील,
आणि कोणाची कृपा नाहीं मिळेल.
हिन्दु सुदे ( शुद्ध ) मुरुख ( मूर्ख )
त्याना हाय ( आहे ) काय विचार
कां त्यांना नाही ? हाय कांहीं सुदेचार.
एकच रीत पाळितान.
मुराद ( पुष्कळ ) क्रिस्तांव मुरुख निर्वाण,
घरीं रीत करतान हिंदुवांची,
आणि देवळांत क्रिस्तावांची;
परमेसोराना ठकीतान तैसे करणीसीं.[६९]

परमेश्वराला अशा रीतीनें ठकविल्याबद्दल वसई येथील सगळें कुटुंबच्या कुटुंब कसें जाळून टाकलें याचा निर्देश वर आलाच आहे. अशाच प्रकारचे उल्लेख गोव्यासंबंधींही पुष्कळ सांपडतात. उदाहरणार्थ, अठरा वर्षे गोव्यामध्यें इंक्विझिशनचा मुख्याधिकारी असलेला इंक्विझिटर १७३१ सालीं पोर्तुगालच्या राजाला लिहितो कीं, गोव्यांतील निरनिराळ्या गांवांचा धर्मदृष्ट्या सत्यानाश झाला असून तेथील पुष्कळ लोक बायकांमुलांसह इंक्विझिशनच्या तुरुंगांत येऊन पडले आहेत. त्यांना देशी भाषा येत असल्यामुळें बाहेरच्या हिंदु लोकांशीं त्यांचा संबंध राहातो, व ते जुने धर्माचार पाळतात. तरी देशी भाषेचें अजिबात उच्चाटन करावें, अशीही त्यानें सूचना

---

६८ Biographical Note to the Christian Puran, p. XXXII.

६९ पा. गिमाराइसचें पुराण, कथा ३०, ओ. ७०-७२

केली आहे.[७०] इंक्विझिशनचा हा त्रास चुकविण्याकरितां गोव्यांतील हे बाटलेले लोक कर्नाटकांत किंवा कोंकणच्या इतर भागांत पळून जात. गोव्याबाहेर कॅथलिक लोकांची जी वस्ती आहे ती बरीचशी याच वेळीं गेलेली. पण त्याचें कारण ख्रिस्ती लोक काय देतात पहा:—

" That the conquest of Goa was followed by a large exodus of the Goan Hindus to Kanara and other places is a historical fact; but it was not confined to the Hindus, the Christians migrated as well. This was especially due to the incursions of the Mahrattas into Goan territory, which rendered life and property insecure and to the decline of Portuguese power, which spread poverty and distress through out the land. "[७१]

बाह्यतः ख्रिस्ती धर्मांत राहून मनांत महाराष्ट्रधर्माचा अभिमान बाळगणारी व पोर्तुगीज सत्ता उखडून टाकूं इच्छिणारी एक बाई होती व तिच्या तालमींत माधवाचा मुलगा शंकर (ज्यास अंतूनीनें बाटवून लुई असें नांव दिलें होतें तो) तयार झाला, व असेच कित्येक बाटगे तरुण मराठ्यांच्या बाजूनें परकीयांबरोबर लढले असें वर्णन गोमांतक काव्यांत आहे. अशा प्रकारच्या वृत्तीचा वर्ग त्यावेळीं ख्रिस्ती लोकांमध्येंही होता असें मानण्यास आधार आहे.

मार्केझ द आलोर्ना ह्या व्हाइसरायानें (१७४४–१७४९) आपल्यामागून येणाऱ्या व्हाइसराय मार्केझ द ताव्होर याकरितां लिहून ठेवलेल्या ज्या सूचना आहेत त्यांत तो म्हणतो,

" शत्रूंच्या राज्यांत असलेल्या लोकांप्रमाणें आमच्या राज्यांत हिंदु व मुसलमान लोक असून त्या सर्वांचा वर्ण, भाषा, पोषाक व रीतिरिवाज सारखेच आहेत;

---

७०. Ensaio Historico da Lingua Concani ( J. H. Cunha Rivara ) 1857, p. 100–1.

७१ The Indian Castes, ( J. A. Saldanha, Second class Subjudge) 1904, Vol. I, p. 35.

पण येथें असेही पुष्कळ ख्रिश्चन आहेत कीं, जे केवळ नांवाचेच ख्रिस्ती. ते आमच्यापेक्षां शत्रूंनाच जास्त इमानी आहेत."[७२]

आणखी एका गोष्टीचा येथें उल्लेख करणें अनाठायीं होणार नाहीं.

मार्गाची कामाग्नित आपुल्या बळी
देउनि ते ' संत ' बळें देह आमचे–

उत्तरार्ध १८८०

असे स्त्रियांवर अत्याचार झाल्याचे जे आरोप गोमंतक काव्यांत आहेत, तेही वाचून कांहीं ख्रिस्ती लोकांचा संताप होईल यांत शंका नाहीं. पण खुद्द गोवा इंक्विझिशनसंबंधीं लिस्बन कॅथड्रलच्या तृतीय शतसांवत्सरिक उत्सवाच्या प्रसंगीं येव्होराच्या ( पोर्तुगाल ) आर्च बिशपासारख्या वरिष्ठ धर्माधिकाऱ्यानेंच १८९७ सालीं जे उद्गार काढले होते ते डॉ. आंतोनियु द नोरोञ या गोवा हायकोर्टच्या माजी मुख्य न्यायाधीशानें आपल्या सरकारतर्फेंच प्रसिद्ध झालेल्या एका ग्रंथांत उद्धृत केले आहेत.[७३] त्याचें इंग्रजी भाषांतर एका ख्रिश्चन विद्वानानें केलेलें पुढें देतों:–

"If everywhere the Inquisition was an infamous court, the infamy, however base, however vile, however corrupt and determined by worldly interests, it was never more so than the Inquisition of Goa, by irony of fate called the Holy Office. The inquisitors even attained the infamy of sending to their prisons women who resisted them, there satisfying their beastly instincts and then burning them as heretics."[७४]

सावरकरांनीं आपल्या काव्यांतील इंक्विझिटरचें नांव अंतूनी असें दिलें आहे. तें नांव भार्गव ग्राम किंवा दारका नदी प्रमाणें कल्पित म्हणून दिलें असेल; पण त्या कालीं असलेल्या इंक्विझिटरचें नांव अंतूनीच ( Antonio do Amaral Coutinho ) असें होतें, असें ता. ८ जानेवारी १७३३ चे देशी भाषांविरुद्ध

७२ Istruccoes dadas pelo Marquez de Alorna, 1836, p. 20.

७३ Os Indus e a Republica, p. 53.

७४ Portuguese India ( The Goa Congress Committee ), 1939, p. 11.

त्यानें पोर्तुगीज सरकारला पाठविलेल्या पत्रावरून दिसून येतें.[७५] ज्यावेळीं व्यंकटरावानें गोव्यावर स्वारी केली त्यावेळीं उत्तरकोकणाचा अजिबात त्याग करून सर्व लक्ष गोव्याच्या रक्षणावर केंद्रित करावें, अशी सूचना याच इंक्विझिटरनें व्हाइसरायला केली होती.[७६]

पोर्तुगीज साधनें मराठी वाचकांना अज्ञात असल्यामुळें मीं गोमंतक काव्याकडें विशेषतः त्या साधनांच्या साहाय्यानें पाहिलें. मराठी साधनें—पेशवे दप्तर वगैरेंचा विस्तारभयास्तव उपयोग केला नाहीं. तरीपण,

देवभक्त, देशभक्त वीरगुरुश्री
ब्रह्मेंद्रस्वामी तो थोर तपस्वी;
हिन्दूची अभिमानी मूर्त देवता.

—उत्तरार्ध ३७०

अशा प्रकारच्या स्तुतीला ब्रह्मेंद्रस्वामी पात्र होता असें मला वाटत नाहीं. राजवाडे यांनीं आपल्या तिसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेंत जी स्वामीची हजेरी घेतली आहे,[७७] ती फटकळपणाची वाटली तरी त्यांत तथ्यांश आहे हें नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. रियासतकार सरदेसायांनीं[७८] किंवा रा. यशवंतराव केळकरांनीं[७९] जें जरा सौम्य शब्दांनीं सांगितलें तेंच त्यांनीं त्यांच्या नेहेमींच्या पद्धतीप्रमाणें कडक भाषेंत लिहिलें एवढेंच. ता. ३० डिसेंबर १७१६ रोजीं झालेल्या धर्मविधीमध्यें वसईचें एक सबंध कुटुंब जाळून त्याचें घरदार व शेतवाडी भुईसपाट केली हें वसईच्या मोहिमेला तात्कालिक निमित्त झालें असावें असें वर सांगितलें. असहाय अशा हिंदु लोकांच्या त्या वेळच्या प्रक्षोभाची कल्पना साष्टीच्या बखरींतही वर्णिलेल्या हकीगतीवरून होते. पण हिंदुधर्म बुडतो त्यापेक्षां वसईची मोहीम अयशस्वी होऊन कदाचित् बाजीरावाला दिलेले कर्जाचे पैसे बुडतील या भीतीनें फिरंग्यांसी सलोखा करा, असें बाजीरावाच्या मागें ब्रह्मेंद्रस्वामीनें टुमणें लाविलें होतें, असें दिसतें. छ २ रमजान (ता. ३ डिसेंबर १७३८) रोजीं ब्रह्मेंद्रस्वामींना पाठविलेल्या उत्तरांत बाजीराव लिहितो,

---

७५ Ensaio Historico do Lingua Concani, p. 102.
७६ Como se perdeu Bacaim ( P. Pissurlencar ), p. 94.
७७ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खं. ३, १९०१.
७८ मराठी रियासत ( शाहू व बाजीराव ) १९४२, पृ. २४४–५०.
७९ वसईची मोहिम ( साधनचिकित्सा पृ. ७ )

"पैक्यासाठीं कांहीं चित्तांत आलें असेल तर सांप्रत वोढीच्या प्रसंगास्तव व वसई-कडील खर्चानिमित्त आणखी स्वामींजवळ ऐवज असेल तो द्यावा लागतो. वसईकडील सलुखाचा मजकूर लिहिला त्यास सल्लख करावयास आम्ही राजीच आहों. परंतु विचार करून करावा लागतो. फिरंगी विचारावरी आल्यावरी सलुखाचा विचार होईल. तरी करावयास अंतर पडणार नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."[८०]

या उत्तरावरून मूळ पत्रांतील मजकूर काय असावा, याची कल्पना होईल. ३ एप्रिल १७२७ रोजच्या एका पत्रांत 'गोठण्याहून स्वार होऊन गोव्याकडे गेलों,' असा ब्रह्मेंद्राविषयीं उल्लेख आढळतो.[८१] पण तो हिंदुधर्माचें तिकडे कसें संरक्षण होईल हें पाहाण्याकरितां गेला होता काय? राजवाडे म्हणतात कीं, तो कान्होजीच्या भीतीनें गेला.[८२]

विस्तारभयास्तव इंक्विझिशन कार्यपद्धति, तुरुंग वगैरे वगैरे संबंधीं मी जास्त लिहीत नाहीं. तसें लिहूं गेल्यास तो स्वतंत्र ग्रंथच होईल.

गोवा इंक्विझिशनच्या तुरुंगाच्या दीडशें अंधारकोठड्या होत्या. परंतु सावरकर निर्दिष्ट करतात त्यासारख्या "भयद भुयारी" (उ० १९०४) तेथें होत्या याबद्दल मला उल्लेख सांपडलेला नाहीं. युरोपांतील इंक्विझिशनच्या या भुयारांचीं अंगावर शहारे आणणारीं भयंकर वर्णनें आढळतात. तशीं भुयारें येथें नसावीत. पोर्तुगीज येण्यापूर्वीं ज्या वाड्यांत मुसलमान बादशहा किंवा त्यांचे सुभेदार राहात किंवा १५५४ पर्यंत ज्या ठिकाणीं पोर्तुगीज व्हाइसराय राहात त्या राजवाड्यामध्यें कांहीं फेरफार करून त्यामध्यें इंक्विझिशनची १५६० सालीं स्थापना झाली होती.[८३] इंक्विझिशनच्या या अंधारकोठड्यांचें वर्णन डॉ. देलों यानें आपल्या हकीकतींत दिलें तेवढेंच उपलब्ध आहे.[८४] १८०८ सालीं एशियाटिक सोसायटीचे रे० क्लाडियस बुकानन ह्यानें इंक्विझिशनच्या या अंधारकोठड्या प्रत्यक्ष पहाण्याचा जोराचा प्रयत्न केला होता, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं.[८५] ज्याच्या नामो-

८० ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर (द. ब. पारसनीस) १९००, ले. ३७, पृ. ५७

८१ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें (राजवाडे) खं. ३ लेखांक १७६

८२ सदर (प्रस्तावना) पृ. १५-१६

८३ Descripcão das Moedas (Teixeira de Aragao) p. 47

८४ Relation de L' Inquisition de Goa, chapt XV.

८५ Christian Researches by Rev. Claudius Buchanan, 1814, p. 155–178.

ल्लेखानेंच अंगाला कांपरें भरे त्या इंक्विझिशनचा वाडा आज जमीनदोस्त झाला असून तो कोठें होता याची खूणही सांपडत नाहीं ! ही जागा निश्चित करण्याकरितां मी त्या निर्जन भागांत भटकत असतां सुमारें पंधरा वर्षांमागें एका नागाच्या फडेवर पाय पडून गोवा इंक्विझिशनवर ग्रंथ लिहिण्याच्या प्रयत्नांत स्वतःच्या आयुष्याचा ग्रंथ आटपण्याची वेळ आली होती !

जातां जातां एका गोष्टीचा येथें उल्लेख करणें अप्रासंगिक होणार नाहीं. भार्गव गांवांतील काल्पनिक दहनविधि व अहिंसावादी निनामीबुवा निर्माण करून कवि म्हणतात,

गोमंतकांत ही भीति, ही गुलामगिरी पहा
तोंडांत बोट घाली ज्या सहसा बघुनी, अहा
अन्यभागीं महाराष्ट्रीं तें तों आचरती क्रिया
तीनशें त्या न जात्याची हार तीस रिपूस या !

वगैरे वगैरे — पूर्वार्ध, ८२७.

स्वधर्माकरितां गोमंतकांतील लोकांनीं जो त्याग केला आहे त्याची सर कुणालाही यावयाची नाहीं. आपले स्वतःचे देह बळी देऊन त्यांनीं आपल्या आराध्यदेवतांच्या मूर्ति संरक्षिल्या. धर्माकरितां आपल्या घरादाराचा व कुबेरासारख्या गडगंज संपत्तीचा त्याग केला. शक्य झालें त्यावेळीं वर सांगितल्याप्रमाणें आक्वाव्हिव्हासारख्या पाद्रीचा बळी घेण्यास कमी केलें नाहीं. परंतु पोर्तुगीजांच्या बंदुका व तोफा यापुढें त्यांचें कांहींच चालणें शक्य नव्हतें. पुरुषांची काय पण स्त्रियांचीही स्वधर्मनिष्ठा पाहून अचंबा वाटतो. आपल्या मुलांना आपल्याकडून हिसकावून घेऊन पाद्री लोक बाटवून ख्रिस्ती करण्यास येतांच तीं बाटून ख्रिस्ती होण्यापेक्षां मेलेलीं पुरवलीं म्हणून आपल्या पोटचे गोळे जमिनीवर आपटून जागच्या जागीं ठार करीत.[८६] शुद्धीकरण गोमंतकाला अज्ञात नव्हतें हेंही वर मीं दाखविलेंच आहे. पोर्तुगीजांचा ह्या अनिवार स्टीमरोलरखालीं इतर महाराष्ट्रांतील किंवा हिंदुस्थानांतील कोणताही भाग आला असता तर त्यास गोमंतकानें केलें त्यापेक्षां निराळें विशेष कांहीं करतां आलें असतें असें मला वाटत नाहीं. पोर्तुगीजांच्या मानानें किती तरी सौम्य असलेल्या मुसलमानांच्या आक्रमणापुढें पंढरीचा विठोबा, तुळजापूरची भवानी वगैरे मूर्तींचे काय धिंडवडे झाले हें

---

८६ Archivo Portuguez Oriental F, IV,

प्रसिद्ध आहे.[८७] आपल्याच बांधवांच्या त्यागावर किंवा तळतळाटावर स्वतःच्या स्वार्थाची व महत्त्वाची पोळी भाजून घेणारे गोमंतकांत त्याकाळीं कांहीं लोक होते ही गोष्ट खरी आहे. पण अशा प्रकारचे लोक महाराष्ट्राच्या इतर भागांत त्याकाळीं होते व आजही नाहींत काय ? मूर्ख व धर्मभोळे मानल्या गेलेल्या असंख्य बहुजनसमाजानें त्याग केला व त्यांच्या तळतळाटावर चारदोन पुढारी व शहाणे म्हणविणाऱ्यांनीं आपला स्वार्थ साधून घेतला !

गोव्यांत किंवा इतर भागांत जें खिस्तीकरण झालें तें केवळ मांसाचे तुकडे विहिरीमध्यें टाकून झालें अशी पुष्कळांची समजूत आहे.[८८] लोकांच्या तोंडांत बिस्किटें किंवा डुकराचें मांस कोंबून बाटविल्याचेंही सांगतात.[८९] त्यांना परत हिन्दुधर्मांत येण्यास मार्ग नव्हता म्हणून ते खिस्ती धर्मांत राहिले अशी जी कल्पना आहे, ती मात्र बरोबर नाहीं. हिन्दुधर्मांत परत येणें म्हणजे इंक्विझिशनच्या धार्मिक यज्ञामध्यें अग्निनारायणाला स्वतःचा बळी देणें होतें. त्या धाकानें पुष्कळ नव खिश्चन गोव्याबाहेर पडल्याचा उल्लेख वर आलाच आहे. अशा लोकांची शुद्धि करून मूळ धर्मांत घेण्याची व्यवस्था गोव्याबाहेरच्या लोकांनीं करावयास पाहिजे होती. या दृष्टीनें विचार करतां सावरकरांनीं केलेलें शुद्धीचें जोरदार समर्थन योग्यच वाटतें. पोर्तुगीज सत्तेखालीं राहून मात्र शुद्धीचा विचार देखील मनांत आणणें इंक्विझिशनच्या धाकामुळें अशक्य होऊन राहिलें होतें, ही गोष्ट आपण विसरतां कामा नये. हिन्दुस्थानांतील खिस्तीकरण पोर्तुगीजांनीं बळजबरीनें न करतां केवळ दैवी प्रेरणेनें झालें असें म्हणणें हास्यास्पद आहे. डॉ. आंतोनियु नोरोंज हे गोव्याचे माजी मुख्य न्यायाधीश खिस्ती धर्मांत लोक त्याकाळीं कसे गेले यासंबंधीं लिहितात, 'कांहीं शारीरिक दंडाच्या भयानें, दुसरे नैतिक दुर्बलतेमुळें; पुष्कळ आपल्या जन्मभूमीचा त्याग करण्याचा प्रसंग आल्यामुळें तिच्या प्रेमाचा मोह न आवरल्यामुळें किंवा आपले हितसंबंध व धनदौलत घालवूं नये म्हणून; अर्थोत्पादक जागा मिळविण्याकरितां खिस्ती झालेल्यांचीही संख्या कमी नव्हती. परंतु खिस्ती धर्मावरील शुद्ध विश्वासानें (Conviction) खिस्ती धर्माला कवटाळणारे असे बहुतेक कोणी नव्हतेच'[९०] डॉक्टरसाहेबांचें हें मत मला मान्य आहे. परंतु सेंट झेवियरच्या

---

८७ शककर्ता शिवाजी ( गो. स. सरदेसाई ) १९३५, पृ. ६६.

८८ Bom. Gaz. Thana, Vol. VIII, Part I, p. 201.

८९ The Oriental Indian Spectator, June 1859, p. 238

९० Os Indus c a Republica, p. 51

भूतदयात्मक कार्यानेंही खालच्या वर्गांतील लोक ख्रिस्ती धर्माकडे आकृष्ट झाले असले पाहिजेत. या विषयावर प्रस्तुत गोमंतकासारखीं काव्यें लिहिण्याच्या पूर्वी इंक्विझिशन किंवा पोर्तुगीजांचें हिंदुस्थानांतील धार्मिक धोरण यांचा सत्य, साधार व सविस्तर असा इतिहास लिहिला जाणें अवश्य आहे. या दृष्टीनें माझा प्रयत्न चालूही होता, परंतु भोंवतालच्या निरुत्साही वातावरणामुळें तो अलीकडे थंडावत चालला आहे. प्रो. मायदेव यांनीं बॅ. सावरकरांच्या प्रस्तुत काव्यावर दोन शब्द लिहिण्याची आज्ञा करून माझ्या जुन्या संकल्पाची मला आठवण करून दिली यांत शंका नाहीं. गोमंतक काव्य लिहिण्यांत बॅ. सावरकरांची भूमिका कवीपेक्षां प्रचारकाचीच जास्त दिसते. माझी भूमिका शुद्ध इतिहाससंशोधकाची आहे. त्या भूमिकेवरून त्यांच्या काव्याकडे पाहिल्यामुळें कांहीं बाबतींत त्यांच्याशीं मला मतभेद व्यक्त करावा लागला आहे. त्यामुळें गोमंतक काव्यांतील निनामीबुवाच माझ्या रूपानें अवतीर्ण झाला आहे, असें सावरकरांना कदाचित् वाटेल ! पण माझा त्याला निरुपाय आहे.

---

# गोमान्तक

## प्रो. रामचंद्र श्रीपाद जोग, एम्. ए.

कांहीं सत्काव्यें वाचलीं जातात व त्यांची स्तुतिही होते. कांहीं वाचलीं जात नाहींत, तथापि त्यांची स्तुति होत राहते. कांहीं वाचलींही जात नाहींत व त्यांची स्तुतिही होत नाहीं. गोमान्तक हें काव्य या तिसऱ्या वर्गामध्यें बसतें असें वाटतें. विषय, कल्पना, रचना, ती ज्या परिस्थितीमध्यें झाली ती परिस्थिति, वृत्तयोजना आणि भाषा या साऱ्या विशेषांच्या बाबतींत कांहीं पृथगात्मता असूनही गोमान्तक समग्र वाचलेले व जें कांहीं थोडें वाचलें असेल त्यावरून त्याविषयीं चांगलें मत झालेले रसिक माझ्या पाहण्यांत तरी नाहींत. अर्वाचीन मराठी काव्यवाङ्मयांत एक महत्त्वाचा प्रयोग म्हणून त्याकडे काव्याच्या अभ्यासकांचें विशेष लक्ष जावयास हवें होतें. परंतु त्याचें बाह्य रूप पाहूनच विमुख होणारे वाचक फार असल्यानें त्याचें व्हावें तसें समीक्षण आजवर झालेलें नाहीं. सावरकरांच्या षष्ट्यब्दपूर्तीच्या निमित्तानें तें होत आहे हा वाङ्मयदृष्ट्या लाभच म्हणावयास अडचण नाहीं.

पाश्चात्य काव्यवाङ्मयाच्या अभ्यासानें अथवा वाचनानें मराठी काव्यास स्फुट आत्मलेखनाचें वळण लागण्याच्या आधींच निराळ्या प्रकारचा परिणाम मराठी काव्यावर होऊं घातला होता. पण तद्विषयक प्रयोगाचें स्वागत भलत्याच प्रकारानें झाल्यानें तो प्रयत्न पूर्ण झाला नाहीं. इंग्रजींत ज्याला एपिक् असें म्हणतात तशा प्रकारचा महाकाव्यलेखनाचा प्रयत्न कै. म. मो. कुंटे यांनीं 'राजा शिवाजी' या काव्याच्या द्वारें प्रथम केला, व तीन तीन खंडांच्या दोन हप्त्यांत सहा खंडांचें एक अपुरें काव्य त्यांनीं लिहिलें. मिल्टन्सारख्या आंग्ल कविराजाचें 'स्वर्ग-च्युती'-सारखें काव्य त्यांच्या डोळ्यांपुढें असावें. मोठा विषय, मोठ्या व्यक्ति, मोठें तत्त्वज्ञान व प्रदीर्घ रचना यांनीं बनलेलें महाकाव्य लिहिण्याचा त्यांचा बेत असावा. पण या प्रकारच्या काव्यास साजेशी भारदस्त भाषा व प्रौढ रचना यांच्या अभावीं हें महाकाव्य लोकप्रिय होऊं शकलें नाहीं व तो प्रयत्न अपुराच राहिला. त्यानंतरचा त्या प्रकारचा दुसरा प्रयत्न म्हणजे हें गोमान्तक काव्य. हाही प्रयत्न वस्तुतः अपुराच राहिला आहे असें म्हणावें लागतें. कारण बाह्यतः त्यास संपूर्ण काव्याचा

वेष दिला गेला असला तरी विषयप्रतिपादनाच्या दृष्टीनें तें अपुरेंच राहिलें आहे. पूर्वार्ध व उत्तरार्ध असे त्याचे जे दोन अर्ध कल्पिले आहेत, त्यांत पहिल्यांत एका दंपत्याचा धार्मिक छळामुळें झालेला हृदयद्रावक अंत, व दुसऱ्यांत त्यांच्या त्यावेळीं लहान असणाऱ्या मुलाचें वीस वर्षांनीं अनेक संकटांतून सुखरूप परत येऊन झालेलें धर्मपरावर्तन एवढाच विषय आला आहे. वस्तुतः कथानकाचा उठाव येथेंच होऊन पुढें आणखी बरेंच कांहीं यावयास पाहिजे अशी अपेक्षा होते. म्हणजे तें खरें महाकाव्य झालें असतें. आजच्या स्थितींत महाकाव्याचा मोहरा असणारें तें एक ऐतिहासिक दीर्घकाव्य आहे.

काव्य अपुरें राहण्याचें कारण ज्या परिस्थितींत तें लिहिलें गेलें ती परिस्थिति बऱ्याच अंशीं असावी. अंदमानांत कारागारांत असतां, लेखनसाहित्य उपलब्ध नसतांना यांतील कांहीं भाग तरी रचला गेला. कांहीं पंक्ति रचाव्या, त्या स्मृतिगत करून ठेवाव्या, केव्हां केव्हां भिंतीवर त्या कोरून ठेवाव्या, दुसरा कोणी महाराष्ट्रीय बंदी तेथें आल्यास त्यानेंही त्या मुखोद्गत कराव्या, लेखनसाहित्य मिळाल्यास त्या कशा तरी टिपून ठेवाव्या, व वक्रमार्गानें बाहेर पाठवाव्या अशा पद्धतींत स्मरण-शक्तीचा केवढा व्यय झाला असेल! बौद्धिक चिकाटी आणि प्रतिभेची स्थिरता यांची ती कसोटीच होती. प्रतिभेच्या सहजोन्मेषापेक्षां सवड सांपडेल तेव्हां तिला राबविण्याचाच प्रकार येथें शक्य होता. अशा स्थितींत झालें इतकेंही लिहून कसें झालें व इतक्या सुव्यवस्थित स्वरूपांत बाहेर आलें हीच गोष्ट आश्चर्य करण्यासारखी आहे. झालें इतकेंच लिहावयास इतके परिश्रम खर्ची पडले कीं, हें महाकाव्य पुढें संपूर्ण न करतां येथेंच त्यास विराम दिला याकरितां कवीस दोष देणें अनुचित होईल.

कथादृष्टया गोमान्तक काव्याचे दोन भाग पडतात. लेखकानें ते स्वतःच दर्शविले आहेत. पैकीं पूर्वार्धामधील कथा इ. स. १७३८ मध्यें घडल्याचें कल्पिलें आहे, व दुसरी इ. स. १७५८ मध्यें म्हणजे पानिपतापूर्वी मराठी राज्याच्या उत्कर्षाच्या कालीं घडली असल्याचें दाखविलें आहे. दोन्ही कथा एकाच स्थळीं म्हणजे गोमान्तका-मधील भार्गव या गांवीं घडल्या, पण पहिली हृदयद्रावक पर्यवसानाची आहे व दुसरी उत्कर्षकालाची, आनंदाची आहे. घटना व प्रसंग पहिल्याच भागांत संख्येनें अधिक व परिणामाच्या दृष्टीनें प्रभावी आहेत. उत्तरार्धांत ज्या दिवशींचें वर्णन आहे त्या दिवशीं भाषणेंच अधिक झालीं व शुद्धिसमारंभ झाला. याशिवाय त्या दिवशींच्या

अशा घटना नाहींत. मात्र एका व्यक्तीच्या जीवनांतील गेल्या वीस वर्षांतील लोमहर्षण ' प्रसंगांचें सविस्तर कथन त्यांत आलें असल्यामुळें कथानकामधील या भागांतील घटनांची उणीव कांहींशी भरून निघाली आहे. पूर्वार्धांत प्रसंगवर्णनास प्राधान्य असलें, तर उत्तरार्धांत राजकीय तत्त्वज्ञानाच्या उपपादनासच प्राधान्य मिळालें आहे. पूर्वार्धांतील कथाप्रसंग हृदयास हालवून सोडणारा आहे. उत्तरार्धांत प्रथम तरी भाषणाचें दारूकाम झालें आहे. तें कथानकदृष्ट्या कंटाळवाणें वाटतें. तत्त्वप्रतिपादन फार झालें आहे. त्यांत निर्यमक गद्यसदृश रचना झाल्यानें काव्य वाचीत असल्याची जाणीव फारच अल्प राहते. राजकीय मतप्रचारपूर्ण लेखन वाचीत आहों असें वाटत असतें.

गोमान्तकामधील भार्गव या गांवीं रमामाधव हें ब्राह्मण दांपत्य आपल्या मुलासह राहत होतें. मुलाच्या पांचव्या वाढदिवशीं शेजाऱ्यापाजाऱ्यांसह वनभोजनास जाऊन दिवस मौजेंत घालवून तीं दोघें परत येतात तों एक पुर्तुगीज अधिकारी आपल्या तीस सैनिकांसह येऊन रस्ते रोखून तळ देऊन बसलेला त्यांना दिसला. वाढदिवस पाळणें हें एक धर्मकृत्य आहे, हिंदूंना आपलीं धर्मकृत्यें जाहीरपणें करावयास अनुज्ञा नसतांना हें कां केलें, याचा जाब विचारण्यासाठीं रमामाधव यांस खेंचून आणलें व माधव कांहीं उत्तर देत आहे तोंच त्यावर त्या खिस्तभक्त अधिकाऱ्यानें चाबकानें प्रहार केले. रमा बिचारी आधींच परस्पर्शामुळें मूर्च्छित झाली होती. चाबकाच्या मारानें माधवही मूर्च्छित झाला. त्यांना तेथेंच एका वटवृक्षाच्या पारावर पहाऱ्यांत ठेवून इतर पुढाऱ्यांस धरण्याकरितां तो पुर्तुगीज अधिकारी गेला. इकडे या दंपत्यास व त्या मुलास पळवून तिघां मंडळींनीं जवळच्या शंकराच्या मठांत नेऊन ठेवलें. तेथें एक निनामीबावा अथवा साधु रहात होता, त्यास ही हकीकत सांगून यांना आपण मराठी राज्यांत नेणार आहों असेंही त्यांनीं सांगितलें. तो साधु सत्य, अहिंसा व हृदयपालट यांचा पुरस्कर्ता होता. त्यास हें मान्य झालें नाहीं (त्याला महात्माजी असेंही एकदां संबोधिलें आहे). अंतुनीचा एक हेर तेथें येऊन तपास करण्यास आला असतां त्यासच अंतुनी असें समजून त्या साधूनें रमामाधव व त्यांचा मुलगा तेथेंच असल्याचें सांगून तसें दाखवूनही दिलें. तो हेर परत जाऊन आणखी सैनिकांस घेऊन येणार हें दिसल्यानें त्यांच्या रक्षकांनीं त्यांना घेऊन जाण्याचें ठरविलें, व त्या साधूस निदान आम्ही कोठें गेलों आहोंत हें तरी सांगूं नका म्हणून प्रार्थना करून प्रयाण केलें. इकडे

अंतुनी सैनिकांसह आला तों ही मंडळी तेथें नव्हती. साधूस विचारतां त्यानें सारा वृत्तांत सांगितला व रमामाधवांचा पाठलाग होऊन त्यांना पकडण्यांत आलें. त्या साधूसही पकडून मठास आग लावून अंतुनी परत पारावर आला. पकडलेल्या मंडळींत रमामाधवांसह त्यांचा एक रक्षणकर्ता, साधु, गांवांतील पंतोजी, एक शेटजी, भट व पाटील ही मंडळी होती. पोपाज्ञेचा व राजाज्ञेचा भंग झाला म्हणून माधवास व त्याच्या मुलास अग्निदहनाची शिक्षा सांगण्यांत आली, परंतु रमेला स्त्री म्हणून जीवदान देण्यांत आलें. पति व पुत्र यांवांचून आपण जगूंही शकणार नाहीं असें तिनें सांगितल्यावरून दोघांपैकीं एक कोण हवा असें विचारून तिला पेंच घालण्यांत आला. पतीचा परोपरीचा आग्रह पडल्यानें संभ्रान्त अशा अवस्थेंत तिनें पुत्र हवा असें म्हणतां म्हणतांच ती मूर्च्छित पडली. तिला जीवदान व पुत्र मिळाला, पण घरीं जाण्याची अनुज्ञा मिळाली नाहीं. तिच्या पुत्रासह तिला ख्रिस्ती धर्म घ्यावयाचा असें ठरविण्यांत येऊन दहनाच्या शिक्षेला प्रारंभ होणार अशा वेळीं पंतोजी, साधु, तो एक रक्षणकर्ता यांचीं भाषणें झालीं, तथापि अंतुनीचा क्रोध अधिकच वाढून शिक्षेची अंमलबजावणी करण्यास त्यानें आज्ञा दिली. इतक्यांत कोठून तरी तीर आले व पारावरील गोरे सैनिक कोसळले. अंतुनीनें साऱ्यांस घेऊन चावडीकडे प्रयाण केलें व तेथें चौकटी, दारें, दारू व तेल ओतून जिवंत माधवाला आग लावण्यांत आली. रमेच्या आर्त शोकास एका ठोशानेंच उत्तर मिळालें.

या साऱ्यांस सोडविण्यास येणारी मंडळी थोडी उशीरां आली. माधव अर्धा दग्ध झाला होता. ही मंडळी अंतुनीस धरून मारणार तों तो साधु आडवा पडून त्यानें त्याला वांचविलें. अंतुनीनें चावडींत व्यूह करून आपल्या लोकांनिशीं ती लढविली व इकडे शेटजी, साधु, पाटील हेही जळले. एक पंतोजी तेवढा आपला शेवटचा संदेश सांगण्याकरितां जिवंत होता, त्याचा संदेश संपत आला असतां मदत आली. त्याच्या हातांत हिंदुध्वज देण्यांत आला. तो ध्वज कायम राहूं दे अशी शेवटची आज्ञा त्यानें दिली व हरहर गर्जनेमध्यें आपला प्राण सोडला. अंतुनी रमा व तिचा मुलगा यांना घेऊन निसटलाच. रमेला पुढें त्यानें भ्रष्ट केली, तिला वेड लागलें व त्यांतच एकदां समुद्रामध्यें उडी घेऊन तिनें प्राणत्याग केला.

उत्तरार्धामध्यें कथेस प्रारंभ होण्यापूर्वीं मध्यें वीस वर्षें गेलीं होतीं. हिंदु हुतात्म्यांची समाधि बांधली गेली होती. प्रतिवर्षी तेथें यात्रा भरूं लागली. गांव

मराठ्यांच्या राज्यांत गेला होता व धर्मच्छळ थांबला होता. निनामिबावांच्या मठांत शुक्र नांवाचा एक त्यांचा शिष्यसाधु येऊन राहिला होता. त्यानें आपल्यास रमा व तिचा मुलगा यांस सोडवून आणण्याचा साधूचा दृष्टांत कसा झाला, आपण गोंव्यास कसे गेलों, तेथें तें मूलच फक्त आपणांस कसें दिसलें, त्याला घेऊन आपण निघालों तों अंतुनीनें सैनिकांसह आपल्यावर कसा हल्ला केला, आपण त्या साधूची प्रार्थना केली व त्या साधूनें विमानांतून येऊन त्या मुलास कसें नेलें तें सांगितलें व आतां रमामाधवांच्या कुलवास्तूची देवता राममूर्ति जी सांपडेल तिची संस्थापना करून राहण्यास साधूची आज्ञा झाल्यानें आपण कसे आलों आहोंत हें सांगितलें. ती मूर्ति मिळाली, त्यानें तिचें देवालय बांधलें. माधवाची सारी जमीन त्या देवालयास मिळाली व तो शुक्रनामक साधुशिष्य तेथें राहूं लागला.

पण आज तेथें मोठा समारंभ होता. नेहमींची यात्रा संपत आली होती. कोंकणांतील हिंदुजनांचे नेते व महाराष्ट्रांतील ठळक ठळक पुरुष तेथें आले होते. बाटलेल्या लोकांचें परावर्तन अथवा शुद्धीकरण व्हावयाचें होतें. राजमुख्याचें भाषण प्रथम या शुद्धीकरणाविषयीं व एकंदर हिंदुत्वगौरवाविषयीं झालें. गांवांतील जुना पाटील व पंतोजी यांच्या शूर व पंडित मुलांचा सत्कार करण्यांत आला. पंतोजीचा पंडित मुलगा पुढें भाषण करूं लागला. त्यानें शुद्धीकरणाची सशास्त्र व सविस्तर चर्चा करून त्याचें मंडन केलें. तिसरे दिवशीं शुद्धीकरण व्हावयाचें ठरलें. त्याच दिवशीं दादांनीं अटकेवर भगवा झेंडा रोवल्याचें वृत्त समजलें. उत्साहांत भरच पडली. एक राजदूतच तेथें आला. त्यानें विजयाचा एक पोवाडा म्हटला. त्यानंतर सिंधुमुख्याचें भाषण झालें. ज्या राजदूतानें विजयाचें वृत्त आणलें होतें त्याचेंही शुद्धीकरण व्हावयाचें होतें हें कळतांच त्याजविषयीं लोकांची उत्सुकता वाढली. शुद्धीकरण झालें. सर्व समारंभ संपला, तरी त्या राजदूताचें चरित्र ऐकण्यास लोक उत्सुक असल्यानें ते तेथून हलेनात. त्यानें आपलें नांव प्रथम बाजूला ठेवून आपल्या मित्राची म्हणून आपलीच हकीकत सांगण्यास प्रारंभ केला.

आपली पहिली आठवण आईच्या पदराला धरून घरीं चल म्हणत असल्याची त्यानें सांगितली, पण लगेच आगीचे डोंब उसळले. त्यानंतर दहा वर्षें गेलीं. एकदां गोव्याच्या समुद्रावर तो बसला असतां त्याला मधून मधून भेटायला येणाऱ्या वृद्ध बाईस आपल्यास ‘ लुई–लुई ’ म्हणतात हें आवडत नसल्याचें तो बोलल्यावर तिनें त्याला शंकर म्हणेन असें म्हटलें. नांव ऐकल्याबरोबर त्याला पूर्वीची स्मृति झाली-

तिनें त्याला त्याची स्वतःची पूर्वीची माहिती सांगितली व नंतर आपलीही हकीकत निवेदन केली. ती व तिची जाऊ यांना समाजानें विनापराध कसें टाकून दिलें, पुर्तुगीजांनीं आपणां दोघांस गुलाम म्हणून कसें विकलें, थोरल्या जावेनें साऱ्या गोष्टींचा कसा प्रतिकार केला व तिचा अत्यंत हृदयद्रावक असा अंत कसा झाला, आपण ज्या धन्याकडे गेलों तो आपलाच दास होऊन आपल्यास त्यानें कसें चांगलें वागविलें, एका दुसऱ्या धर्मभ्रष्ट स्त्रीच्या सांगण्यावरून आपण धर्मभ्रष्ट तरुणांना गुप्तपणें त्यांच्या धर्माची जाणीव कशी करून देत असतों व आतां आपल्या मालकाबरोबर तो परत युरोपला निघाला असतां आपणही कसे निघालों आहोंत हें सांगून त्यानेंही आपल्याबरोबर यावें असें तिनें सुचविलें. तिकडे जाऊन पाश्चात्यांचे सारे डावपेंच शिकून त्यानें परत यावें व आपल्या देशबांधवांना ते शिकवावेत अशी तिची इच्छा होती.

तो राजदूत, अथवा रमामाधवांचा मुलगा, अथवा शंकर त्या प्रौढ स्त्रीबरोबर निघाला. आफ्रिकेला वळसा घालून तें जहाज अटलांटिक समुद्रांत प्रविष्ट झालें. तोंच आंग्ल चांच्यांनीं या जहाजाचा पाडाव करून याला व त्या प्रौढ स्त्रीला गुलाम केलें. त्या स्त्रीला मारून त्या मुलास एका मूर शिपायाच्या हवालीं केलें. त्या बरोबर तो मोरोक्कोंत गेला. इस्लामी गुलामगिरी पुर्तुगीजांच्या गुलामगिरीपेक्षांही अधिक भयंकर. त्याचे फारच हाल झाले. परंतु कोणी गौर पुर्तुगीज तरुणी त्याला दिसली व त्याच्याबरोबर शुद्ध मराठींत बोलली. त्यांची ओळख झाली व तिचें पर्यवसान प्रीतींत झालें. तीही दासीच होती, तिची आई ब्राह्मणी व पिता पुर्तुगीज राजकुलांतील होता. ती त्या मूराच्या घरांतून सुटूं पाहात होती. तीं दोघेंही पळालीं. एका पूर्वपरिचित मूर स्त्रीच्या साहाय्यानें एका घोर अरण्यांत तीं राहिलीं, व पुढें पुर्तुगाल देशास तिच्या जनकाकडे जाऊन पोंचलीं. त्या तरुणीचा गौरव व स्वागत झालें. थोड्या वर्षांनीं तिचा पिता निवर्तला. तेव्हां त्याला आपल्या वित्तासह स्वतःचें पाणिदानही तिनें केलें, व तीं दोघें निरनिराळे देश पहात भारत-देशास निघालीं. पुढें समुद्रावर एका महाराष्ट्रनौकेनें त्यांच्या नौकेवर हल्ला केला. त्यांत या तरुणानें महाराष्ट्राचा पक्ष घेतल्यानें त्याला तोफेच्या तोंडीं देण्यांत येणार तोंच लिली अथवा ती तरुण स्त्री पुढें झाली व त्याच्या गळां पडली. त्याच हल्ल्यांत त्यांचें जहाज नष्ट होऊन तीं दोघें एका फळीच्या आधारानें तरंगत असतां एका लाटेनें ती तरुणी नष्ट झाली, व तो मात्र तेथें आज उभा होता. अर्थात्

त्याला निनामीबावानें विमानांत घालून नेलें ही शुक्रसाधूची केवळ थापच होती. आपलें ढोंग लोकांस कळलें असें पाहून त्यानें पळ काढला. असत्य जर अतिधूर्त असेल तर सत्यापेक्षां अधिक चिरंजीव होतें असा दाखलाच जगाला दिसला.

काव्य येथें संपलें, परंतु कथानक वर सांगितल्याप्रमाणें संपूर्ण झालेंसें वाटत नाहीं. उत्तरार्धांत घटना फारशा नाहींत. त्यांत शेवटीं वर्णन केलेल्या सार्‍या घटना पूर्वीच होऊन गेलेल्या आहेत व फक्त एकापुढें एक कथन केल्या आहेत. वरील सारांशावरून कथानकाची स्थूल कल्पना आली तरी, त्यांतील प्रसंगांची लोमहर्षण भीषणता एवढयानें यथार्थपणें आकलन व्हावयाची नाहीं. त्याकरितां तें काव्यच वाचावयास हवें. विशेषतः पति कीं पुत्र असा प्रश्न पडला असतां झालेली रमेची अवस्था, माधवाचें जिवंतपणीं दहन, निनामी साधूचा सत्य अहिंसेचा दुराग्रह व त्याचें घोर पर्यवसान, पंतोजीची उपरोधिक वक्रोक्ति व शेवटचें भाषण, अंतुनीचें खलास साजणारें अथपासून इतिपर्यंतचें चरित्र या गोष्टी काव्यांत फारच परिणामकारक झाल्या आहेत. ज्या हेतूनें काव्य लिहिलें गेलें आहे, म्हणजे हिंदूंचा पुर्तुगीजांनीं केलेला धर्मच्छळ वर्णन करणें व त्याबाबत शुद्धीकरणाची आवश्यकता प्रतिपादणें, तो सिद्ध होण्याजोगें लेखन या काव्यांत खास झालें आहे. धार्मिक, सामाजिक व राजकीय तत्त्वज्ञानाचा कथेच्या किंवा काव्याच्या द्वारें प्रचार करण्याकरतांच हें काव्यलेखन झालें आहे ही गोष्ट विसरतां येत नाहीं. पण हा हेतूही साध्य होणें सहजशक्य नाहीं. तें होण्यासारखी प्रसंगांची निवड कवीनें केली आहे यांत शंका नाहीं.

प्रस्तुत काव्यांत घटना किंवा प्रसंग यांनाच अर्थात् प्राधान्य आहे. व्यक्तिरेखांना कमी. यांतील प्रधान व्यक्ति म्हणजे रमा, माधव किंवा त्यांचा मुलगा शंकर या होत. परंतु यांचें व्यक्तिदर्शन ठराविक सांच्याचें उदात्त स्वरूपाचें झालें आहे. एक मानी व स्वाभिमानाकरतां प्राणही देणारा तरुण म्हणून माधव, त्याची पतिव्रता व प्रेमळ अशी पत्नी म्हणून रमा, व लहानपणापासून अनेक संकटांतून पार पडलेला तरुण म्हणून शंकर एवढेंच या तिघांचें व्यक्तित्व आहे. त्या मानानें इतर व्यक्तिच अधिक ठसठशीत रंगल्या आहेत. मिल्टनप्रमाणेंच सावरकरांचीही स्थिति झाली आहे. त्याच्या Paradise Lost मध्यें देवापेक्षां सैतानाचेंच चित्र जसें अधिक उठावदार वठलें आहे, तसेंच गोमान्तक काव्यांत खलनायक अंतुनी व इतर गौण व्यक्ति यांचींच चित्रें स्पष्टतर उतरलीं आहेत.

एका हातांत येशूची प्रतिमा व क्रॉस, आणि दुसऱ्या हातांत चाबूक घेऊन जबरदस्तीनें धर्मप्रसार करूं पाहणारा हा क्रूर अंतुनी पूर्वार्धांत प्रधान व्यक्ति होऊन बसली आहे. मिल्टनच्या सैतानाबद्दल वाटणारा आदर मात्र याच्याविषयीं वाटत नाहीं. मूर्तिमंत क्रौर्य असें त्याचें चित्र कवीनें रंगविलें आहे. धर्मप्रेमाचें ढोंग आणून तो आपल्या क्रौर्यभावनेचें सूक्ष्मासूक्ष्म मार्गांनीं तर्पण करून घेत आहे. धर्मकृत्यें जाहीरपणें करावयास प्रत्यवाय असूं नये, पण राजाज्ञेनें तो घातला असला तरी वाढदिवस साजरा करणें हें धर्मकृत्य मानावें, तें केल्यावरून राजाज्ञा व पोपाज्ञा भंग पावली असा आरोप करावा, जाब विचारावयाचा व चौकशी करावयाचा फार्स करून उत्तरें मिळण्याआधींच चाबकाचा प्रयोग करावा, सत्य अहिंसेवर दुर्दम विश्वास असणाऱ्या साधूशींही घोर वर्तन करावें, त्याच्यामुळें आपण वांचलों हेंही लक्षांत न घेतां त्यालाही देहान्तशासन करावें, रमा ही स्त्री म्हणून दाक्षिण्यामुळें नव्हे तर, तिजविषयींच्या अभिलाषानेंच तिला जीवदान द्यावें व पुढें भ्रष्टही करावें, ‘ पति कीं पुत्र पाहिजे तें बोल ’ अशासारखी अमानुष व राक्षसी निवड तिच्यापुढें ठेवून तिला पेंच घालावा, इत्यादि कृत्यांनीं खलनायकाची पदवी त्यास खरोखरच साजते. अंतुनीशिवाय इतर व्यक्तींत निनामी साधूचें चित्र चांगलें उतरलें आहे. सत्य, अहिंसा व हृदयपालट यांवरील त्याची श्रद्धा दुराग्रहाचें रूप धारण करती झाली. सत्याच्या प्रयोगांत रमामाधवांचा जीव गेला, अंतुनीसारखा दुष्ट बचावला व अखेर त्यालाही प्राणाला मुकावें लागलें. त्याच्या तत्त्वनिष्ठेबद्दल त्याचें कौतुक करावें कीं मानवी व्यवहार व स्वभाव यांच्याकडे जाणून बुजून दुर्लक्ष करण्याबद्दल त्याचा तिरस्कार करावा हेंच समजत नाहीं. ज्या सापाला दूध पाजून आपण हिंसेवर जय मिळविला असें त्याला वाटलें, तोच साप आगीच्या गर्दींत त्याला चावला असतांही मूल आईच्या स्तनाला अजाणतां नाहीं का चावत ? असेच उद्गार त्याच्या मुखांतून बाहेर पडतात. ज्याच्यामुळें हें घोर हत्याकांड उद्भवलें तो अंतुनी दुसऱ्यांकडून मारला जात असतांही जो आपण स्वतः मध्यें पडून त्याला वांचवतो त्याच्या वर्तनाला तत्त्वनिष्ठा म्हणावें कीं भोळसटपणा म्हणावें हें समजत नाहीं. त्याच्यावर विश्वास टाकून रमामाधवांस घेऊन लोक त्याच्याकडे आले. अंतुनीचा हेर चौकशी करण्यास तेथें आला, तेव्हां ती मंडळी आपल्याकडे आहेत हें त्यास सांगून दाखवूनही दिली. अर्थात् हृदयपालट करण्याचा प्रयत्न झालाच. पुढें त्यांच्या रक्षणकर्त्यांनीं त्यांना घेऊन प्रयाण केलें व आपण कोठें

ज्ञात आहों हें तरी सांगूं नका, गप्प बसा अशी प्रार्थना केली असतांही तेवढेंही त्यानें केलें नाहीं. सत्य व अहिंसेच्या या विरोधांत अहिंसा सोडून प्राणघातक सत्याचीच कास त्यानें धरली, आणि अखेर तो स्वतःही प्राणास मुकला. कोणत्याही चांगल्या गोष्टीचा स्थलकालपरिस्थितिभेदाकडे दुर्लक्ष्य करून अतिरेक केला तर हितापेक्षां अहितच निष्पन्न व्हावयाचें, हा धडा या साधूच्या चरित्रावरून घेतां येईल. या साऱ्या व्यक्तिदर्शनामध्यें दोष इतकाच कीं, गोमान्तक काव्यांतील कथानकाचा जो काल घेतला आहे, त्या कालांत म्हणजे दोनशें वर्षांपूर्वी आपल्याकडे सत्य अहिंसेचा प्रणेता व इतका दुर्दम उपदेशक झाला असणें शक्य वाटत नाहीं. त्या काळच्या साधूंनीं किंवा संतांनींही व्यावहारिक संकटांत सत्य अहिंसेचें एवढें स्तोम माजविलें असेल असें वाटत नाहीं. या साधूच्या चित्रांत ऐतिहासिक सत्यापेक्षां वर्तमानकालीन राजकारणाकडेच अधिक लक्ष असल्याचा भास होतो. ज्यावेळीं हें काव्य लिहिलें गेलें त्यावेळीं या तत्त्वज्ञानास किती महत्त्व होतें तें सांगतां येत नाहीं. तें प्रसिद्ध झालें त्यावेळीं मात्र तें लोकांस परिचित होतें.

स्त्रीव्यक्तींत नायिका रमा हिजपेक्षांही उत्तरार्धांतील देशमुख वधूंपैकीं थोरल्या जावेचें व्यक्तिचित्रच अधिक तेजस्वी वाटतें. आपल्या धाकटया जावेसह ती एका पुर्तुगीज लांडग्याच्या हातांत सांपडली असतां, त्याला फसवून तिनें विहिरींत ढकलून दिलें, जावेसह संकटमुक्त होऊन ती परत आली असतां घरांतील माणसांनीं त्या दोघींना घरांत घेतलें नाहीं तेव्हां संतापून गोव्यालाच जाण्याचा विचार तिच्या मनांत आला, आपल्या स्त्रीत्वाचें चीज सोंवळ्या हिंदु क्लीबांच्या येथें होणार नाहीं, तेव्हां स्त्रियांचीं आर्जवें करणाऱ्या पुर्तुगीजांकडेच कां न जावें असेंही तिच्या मनांत आलें. धाकट्या जावेनें कांहीं समजूत घातल्यानें त्या दोघीजणी वनांतच राहूं लागल्या. पण तेथेंही सद्धर्माचे अनुयायी येऊन त्यांना गुलाम करून त्यांनीं नेलें. दुःखातिरेकामुळें ज्यानें तिला गुलाम म्हणून विकत घेतली, त्याला तिनें सुरी खुपसून ठार केलें. तेव्हां तिला गाडीला बांधून गोठयांतून फरफटत नेली. त्याही स्थितींत ख्रिस्तभक्तांची निंदा तिनें केली, तेव्हां तिला सांतकाजच्या भुयारांत कोंडून ठेवलें. तेथें आपण होऊनच अनेकांनीं जीव दिले. पण हिच्या छातीवर बसून गुडघा रोवून तुझा धर्म कोणता असें विचारलें असतां ' गोविंदा ! गोपाळा ! ' असेच शब्द तिच्या मुखांतून बाहेर पडले. तेव्हां तिचे हात जाळून, घणाखालीं गुडघ्याचे घोट्याचे सांधे ठेचून, अखेर गळा दाबून

तिचा प्राण घेण्यांत आला. पुर्तुगीजांनीं अंगावर शहारे येण्याजोगा छळ स्त्रियांचाही कसा केला हें सांगणें हा हेतु जरी येथें प्रधान असला, तरी त्या अनुषंगानें निघालेलें हें चित्र खरोखर अविस्मरणीय आहे.

पण व्यक्तिदर्शन हा या काव्याचा मूळ हेतु नाहीं. सावरकरांच्या साऱ्याच वाङ्मयाप्रमाणें तो तत्त्वप्रतिपादन हाच आहे. निःश्रेयस् हें ध्येय म्हणून वाईट नाहीं, पण ऐहिक अभ्युदय हें आधींचें ध्येय आहे. दुबळ्यांचे देवही दुबळे असतात. सत्य व अहिंसा यांना व्यावहारिक मर्यादा आहेत, हिंसेचा प्रतिकार हिंसेनेंच करण्यांत पाप नसून परिणामकारकता आहे, शुद्धीकरण व पतितपरावर्तन या गोष्टी धर्मदृष्टया व समाजदृष्टया योग्य, इष्ट व आवश्यकही आहेत, जुलमानें व अज्ञानानें धर्म-भ्रष्ट झालेले खरे भ्रष्टच नव्हेत व त्यांनाही परत घेणेंच योग्य, स्त्रियांसंबंधींच्या अक्षम्य अशा चुकीच्या वृत्तीनें आपल्या धर्माचा नुसत्या संख्येच्या दृष्टीनेंच नव्हे तर नैतिक दृष्टया मोठा ऱ्हास झाला आहे, बाबावाक्यं प्रमाणं, कूपमंडूकता, पूर्वजांच्या नांवावर विकण्याची खोड, भेकडपणा इत्यादि दोष आपल्या समाजाच्या अंगीं फार खिळले आहेत, इत्यादि अनेक गोष्टींचें प्रतिपादन या काव्यांत चांगलें झालें आहे. हें सांगतांना केवळ आपल्या लोकांचा तेजोभंग करण्याचाही कवीचा हेतु नाहीं. म्हणूनच आपल्यापैकीं अनेक स्वाभिमानी, शूर, कर्तबगार अशा स्त्रीपुरुष व्यक्तींचीं चित्रें काढून मराठ्यांच्या विजयाचें वर्णनही त्यांनीं केलें आहे. वाचकास आपल्याबरोबर खेंचून नेण्याचें सामर्थ्य त्यांच्या प्रतिपादनांत आहे. हें सारें प्रतिपादन आज हिंदुसमाजाला मान्यच झालेलें आहे. परंतु काव्य लिहिलें गेलें त्यावेळीं मात्र त्याची आवश्यकता होती. हें करीत असतां अनेक सुभाषितात्मक वचनें कवीनें लिहिलेलीं इतस्ततः आढळतात. गोव्यांतील देवांची अनुकंपनीय परिस्थिति सांगतांना सहज येणारें 'देवही दुबळ्यांचे ते असणार किती बळी' हें सुभाषित पहावें. उत्तरार्धाचे शेवटचें समारोपात्मक वचनही असेंच आहे—
अहल, अतिधूर्त जरी तरि असत्यही । सत्याहुनि अधिक चिरंजीव होतसे ॥
ख्रिस्ती धर्माविषयींचे कवीचे उद्गार आज साऱ्या धर्मेतिहासवाचकांस मान्य होण्याजोगेच आहेतः—

जयी, जीवित–जो भंगे ख्रिस्तादेश पदोपदा
जळे जिवंत जो वर्ते जसा ख्रिस्त तसा सदा

त्याचप्रमाणें ‘ जिंकि बल बला ’ ‘ बल आहे तोंच बलात्कार कीं टिके ’ ‘ दीनता द्रववी दया ’ अशीं वाक्येंही ठिकठिकाणीं दिसतात. पुढील सुभाषित उपरोधयुक्त असलें तरी सत्यकथन चांगलेंच करितें—

सूक्ष्मा असोचि कीं आधीं धर्माधर्मविचारणा
परी सूक्ष्मतरा ऐशी धर्म-धर्म-विचारणा ॥

सावरकरांचें एकंदर तत्त्वज्ञानच बल व सामर्थ्य यांजवर आधारलेलें आहे. त्याचें प्रतिपादनही ते आवेशानें करतात. त्यांच्या इतर वाङ्मयाप्रमाणें याही काव्यांत त्याचा जोरदार प्रत्यय आल्यावांचून रहात नाहीं.

काव्याच्या गोमान्तक या नांवाला साजेसें गोमान्तकाचें विशेष वर्णन मात्र या काव्यांत आलें नाहीं. एक दोन वेळां आंबे, फणस, नारळी, पोफळी इत्यादि वृक्षांचा उल्लेख येण्यापलीकडे गोमान्तकाचीं वाचकाची अपेक्षा पुरविणारीं वर्णनें यांत आलीं नाहींत. भार्गव गांवाचें वर्णन गोमान्तकांतील गांवाचें कां समजावयाचें तें ठरविणें कठीण आहे. वटवृक्षाचा पार, पाटील, पंतोजी, शेटजी, भटजी किंवा शंकराचें देवालय व साधूचा मठ या गोष्टी देशावरही आढळतात. गोवें म्हटलें कीं समुद्रकांठ, भातशेती, झाडी, कोंकणी भाषा, फुरशीं, काजीं, झाडींतल्या लहान लहान वाड्या, निसर्गसौंदर्य, मासळीची घाण इत्यादि अनेक गोष्टी आपल्या डोळ्यापुढें उभ्या राहतात. त्यांची अस्पष्ट छायाही या काव्यांत दिसत नाहीं. मराठ्यांच्या समुद्रावरील पराक्रमाचें वर्णन करतांना कोंकणाचा व दर्यावरील विविध प्रकारच्या जहाजांचा उल्लेख येतो तेवढाच. गोमान्तकाची पार्श्वभूमि निर्माण करण्याकडे कवीनें बहुतेक सर्वस्वीं दुर्लक्ष्य केलें आहे. वाचकालाच त्याची जी कांहीं कल्पना असेल तीवरून त्यानें गोमान्तकाचें चित्र पार्श्वभूमि म्हणून डोळ्यापुढें आणावें. धर्मच्छळ गोमान्तकांत विशेष झाला व त्यासंबंधीं काव्य लिहून आपलें धर्मविषयक तत्त्वज्ञान प्रतिपादणें आहे एवढ्याकरतांच गोमान्तकाची निवड कवीकडून झाली हें स्पष्ट आहे. काव्याचा उगम तत्त्वप्रतिपादनामधून झाला आहे याचें हें गमकच म्हणतां येईल.

सावरकरांच्या या काव्याचा सर्वांत महत्त्वाचा पण तितकाच जाचक असा विशेष म्हणजे त्यांची लेखनशैली होय. महाकाव्याची मिल्टनूची कल्पना त्यांच्या डोळ्यापुढें असावी असें वाटतें, व त्यामुळें मिल्टनूची भारदस्त भाषाशैलीच त्यांनींही

उचलली असावी असें वाटतें. एक प्रकारचें बोजड गांभीर्य या काव्यास व्यापून राहिलें आहे. म्हणून त्यांतील विनोद किंवा नर्मशृंगारही गांभीर्यजड झाला आहे. संस्कृत शब्दांचा अतिरिक्त उपयोग; परकीय शब्दांना काव्य म्हणूनच नव्हे, तर एकंदरींतच टाळा देण्याचा आग्रह, व एकंदर वर्णनीय विषयाचें गांभीर्य या साऱ्या गोष्टींमुळें प्रसादगुणाचें अस्तित्व बहुतांशीं अभावानेंच जाणवतें. साध्या गोष्टीही सावरकरांच्या लेखणींतून क्लिष्ट व गंभीर होऊन बाहेर पडाव्यात असा विधिसंकेत असावा. यांतील कोणताही पुरुष अथवा स्त्री व्यक्ति बोलत असो, त्यांत तिची भाषा, व तिचें वैशिष्ट्य न दिसतां सावरकरांचेंच व्यक्तित्व दृग्गोचर होतें. फारशी शिक्षित नसलेली उपरिनिर्दिष्ट देशमुखवधू, तिच्यापेक्षां अधिक शिक्षित अशी रमा, भार्गव खेड्यामधील पंतोजी अथवा पुढें महापंडित झालेला त्याचा मुलगा, पुर्तुगीज संस्कृतींत वाढलेला उत्तरार्धाचा नायक शंकर, सत्य-अहिंसावादी साधु किंवा त्याच्याबरोबर वाद करणारा शूर मराठा साहाय्यक वीर, ख्रिस्ती अंतुनी किंवा मराठी राज्यांतील राजमुख्य किंवा सिंधुमुख्य सारे एकच बोजड संस्कृतप्रचुर सावरकरी थाटाची भाषा बोलत असतात. यांत कोणी साधें बोलत नाहींत. सारेच भाषणें करतात. अंतुनीचा गोरा हेर सैनिक तेंच करतो. आधीं या काव्यांत विनोदाला स्थान नाहीं, पण त्यांतून कोठें आलाच तर त्याची खुमारी प्रौढपणाच्या दडपणाखालीं कमी झालेली असावयाची. याचें उदाहरण म्हणून गांवांतील शेटजीचें वर्णन पहावें (पृ. ११). शृंगाराचीही तीच गति. आरंभीं रमामाधवांच्या वर्णनामध्यें त्याला कांहींसें स्थान मिळालें आहे व तें वर्णनही चांगलें झालें आहे. पण भारदस्तपणा कोठें सुटेल कीं काय याची भीति कवीस नेहमीं वाटत असावी असें वाटतें. श्री. शि. म. परांजपे या आपल्या वाङ्मयगुरूपासून उचललेला उपरोधाचा गुणही मधून मधून सावरकरांच्या या काव्यांत दिसून येतो. अग्नींत जळून मरण येण्याची भीति असतांनाही पंतोजीनें केलेलें भाषण उपरोधाचा चांगला नमुना होईल. तें भाषण समग्र उद्धृत करण्याजोगें आहे—

धन्य प्रसव तो, धन्या प्रसू अक्षतकन्यका
धन्य सद्धर्म, ना तेथें धर्मशासन धन्य कां ?
'वधः कार्यो न जीवानाम्' येशूक्ती प्रथमा अशी
एतदर्थेंचि तूं जीवा वधीत नच–जाळिशी

‘ पारदार्यमकर्तव्यं ’ येशूक्ती म्हणुनी भयें
बलात्कारकरा अन्यां कुमारीच वरी स्वयें
‘ निषिद्धमपि चौर्यं च ’ येशूक्ती करण्या पुरी
लूटमारीमध्यें तुम्हीं चोरी सोडुनिया दिली
‘ मा गृधो गर्दभे कस्य ’ उक्ती ही करण्या खरी
गर्दभा सांडुनी पागा घोड्यांची बळकाविली
‘ मा गृधः कस्यचित् किंचित् ’ ह्या आज्ञेस्तव आणखी
किंचित् सोडुनि सर्वस्वी राज्येंची बळकाविलीं.

प्रश्न इतकाच कीं, हें व यापुढील भाषण सारेंच्या सारें वाचकांना अथवा ज्यांच्याकरितां तें केलें त्यांना सहज कळण्याजोगें आहे काय? काव्य वाचणारा सहृदय काव्यलेखकाइतकाच व्युत्पन्न हवा ही सहृदयविषयक कल्पना येथें सर्वस्वीं खरी ठरण्याजोगी आहे.

मिल्टन्च्या भारदस्तपणाच्या कल्पनेबरोबर भाषणें व संवाद भारदस्त हवेत ही कल्पना जशी कवीनें उचलली, तशीच त्यांतील उपमाही होमरच्या दीर्घोपमां-प्रमाणें आपल्या काव्यांत दीर्घोपमा आल्या पाहिजेत अशी कवीची कल्पना असलेली दिसते. अशा उपमांचीं ठळक उदाहरणें पृ. ९, १५, १६१ वर दिसतात. तथापि ही वृत्ति कायम टिकली नाहीं व एकंदर काव्यांत त्यांची संख्या फारशी नाहीं. भारदस्तपणापुढें इतर काव्यालंकरण कवीला करावेंसें वाटलें नाहीं. परंतु जातां जातां अनुप्रासयमकांची चुणूक कवि दाखवितो. पुढील उदाहरण पहावें:—

**व्हाया** शीतल ही छाया **न्हाया** निर्झर अच्छ हा
**गाया** कोकिल मैना या **प्याया** आम्रफलें अहा

किंवा

**पसंत** उभया ऐशा **वसंत**वनभोजना.

हेंही उदाहरण पहावें. या भारदस्तपणामधूनही कांहीं साध्या आणि रम्य उपमा दिसून येतात, तेंही पाहण्याजोगें आहे. उदा०:—

शैशवांत जशी आई, विरहांत जशी प्रिया
आनंद आंबराई दे उन्हाळ्यांत तशी प्रिया

गोमान्तकांतील आंब्याचें पुढील वर्णन बघण्याजोगें आहे.

अंबेचा स्तन वा प्यावा, अंबा कांचनगौर वा
स्तनंधयें दों लोभांच्यामध्यें स्तंभित तेधवां ॥

बाल्याचें पुढील वर्णन साऱ्यांनाच पटेल असें वाटतें.

शैशवीं दूधभाताचा घास लावुनि लोणचें
ताटलींतुनि जो देई आई त्यासम कोणचें
मिष्ट पक्कान्न हो लागे आयुष्यांत पुनः तसें ?

परंतु हा रम्य अलंकरणाचा भाग आरंभींच्या लेखनांतच आहे. पूर्वार्धांतही पुढें पुढें व उत्तरार्धांत सारीकडेच त्याचा अभाव तीव्रतेनें जाणवतो. दूरान्वय व दुर्बोधता हाच प्रकार पुष्कळ. सामान्य वाचक या बाह्य वेषानेंच विमुख होऊन त्यांतील विचार-गौरवास आंचवतो. साध्या रचनेंतही पुढें आल्याप्रमाणें दूरान्वय झालेला दिसतोः—

अवश्य **पाहिजे** भीता हरिणीकळपामधें
क्रूर हिंस्र पशू कोणी घुसला **असला** इथें

किंवा हेंही उदाहरण क्लिष्टान्वयाचें म्हणून पाहण्याजोगें होईलः—

अनपेक्षित तों त्यांच्या शस्त्रें रोखुनि आडवीं
दृष्टीसि पोर्तुगीजांचीं पथकें पडलीं नवीं.

केव्हां केव्हां दुर्बोधतेची मजल कोठपर्यंत जाते त्याची कल्पना पुढील ओळींवरून येईलः—

अस्तदुःख तिचें ऐसें; तिची दुर्गति ज्यास ही
पेटवीं त्या प्रकोपोंची अस्त माधव दुःखही पृ. १८६

तात्त्विक परिभाषेमुळें पुढील ओळ क्लिष्ट झालेली दिसेल—

' ससीमीं वांकडें, तें त्या निस्सीमीं लगणें कसें ? पृ. ४८०

क्वचित् इंग्रजी पद्धतीची वाक्यरचनाही दिसते. उदा०ः—

नेऊं ह्या आयुष्या ह्या वनामधें
जीवन नेतात तरी केंवि अशा ह्या—

सारांश, गोमान्तक काव्याची लेखनशैली अत्यंत चमत्कारिक व म्हणून वैशिष्ट्यपूर्ण झाली आहे. विचारगौरव व पांडित्य यांचा पाठिंबा तिला नसता तर ती दोषार्हच झाली असती.

गोमान्तकाच्या पूर्वार्धांत तीन लहान स्वयंपूर्ण कविता व उत्तरार्धांत एक मोठा स्वयंपूर्ण पोवाडा आला आहे. पोवाडा २६२ ओळींचा फटक्याच्या चालीवरचा असून बराच दीर्घ आहे, पण पूर्वार्धांतील कविता लहान लहान आहेत. पहिली निरंजनाची आरती असून शंकराच्या आरतीच्या निमित्तानें आली आहे. मामुली आरत्यांच्या मानानें ती अधिक अर्थपूर्ण आहे. पहिल्या दोन कडव्यांमध्यें अर्थव्यक्ति व्हावी तेवढी स्पष्ट नसली तरी ध्रुवपदामध्येंच मुख्यार्थ येऊन गेल्यानें त्यांचा अर्थ लावण्यास कांहीं साहाय्य होतें. तो अर्थ असा:— स्वतः निरंजन असणाऱ्याला लोक निरांजनानें ओवाळतात यांत गतार्थता आहे असें वाटलें तरीही त्यांत वावगें कांहीं नाहीं. सहस्रसूर्य तेवत असूनही जो मनांतला अंधार नाहींसा होत नाहीं तो या निरांजनाच्या उजेडानें जावा अशी अपेक्षा असते. म्हणून आईच्या बागेंतून आणलेलीं फुलें तिचीं अपत्यें तिच्या वेणींत घालतात तद्वत् ही निरंजनारती आहे असा त्या कवितेचा आशय आहे. दुसऱ्या कवितेमधील आशय असाच तात्त्विक आहे. शंकर हलाहल प्याले परंतु त्यांतला सुखदुःखरूपी एक थेंब खालीं पडला व त्यामुळें जग आजवर त्रस्त झालें आहे. शंकर स्वतःचा ताप शमविण्यासाठीं अमृतार्द्र सोमफुलें सारखीं स्वतःच्या मस्तकावर पिळीत आहेत व तें निर्माल्य फेंकून देत आहेत. त्यांची स्पर्धा करण्याची मानवाची योग्यता नाहीं. तेव्हां देवां-प्रमाणें त्यांना अमृतवल्ली मिळणार नाहीं, तथापि विवेकरूपी औषधि तरी शंकरांनीं मानवाला द्यावी असें कवीचें म्हणणें आहे. कारण सुखदुःखरूपी हलाहल जगतास जाळीत आहे. तिसरी कविताही मागील दोन कवितांप्रमाणें साधूच्याच मुखांत घातली आहे. कथाप्रसंगांत एक उंदीर शंकराच्या पिंडीवर चढून बसला आहे असें दृश्य आहे. अशा देवाची थट्टा एक गोरा करीत आहे. त्यावेळीं साधु त्यास उत्तर देतो— ही पिंडिका म्हणजे जगाची जननी चंडिका आहे. तिनें महद्ब्रह्मयोनींत महेश्वरवीर्य धरल्यानें दाही दिशांपर्यंत तिचें उदर फुगून सारे ब्रह्मांड जन्म पावलें. त्यांत कृमीपासून कार्तिकदेवापर्यंत सारी प्रजा निर्माण झाली. त्या प्रजेंत मनुष्य अधिक हावरा व दांड झाला. मीच पितरांचा वारस असें म्हणूं लागला अशा वेळीं मूषकानें बिचाऱ्यानें जावें कोठें ? म्हणून तो आपल्या जननीकडे म्हणजे पिंडीकडे आला आहे आणि आईच्या प्रेमचंद्रिकेचा आसरा घेत आहे. या तीनही कविता अर्थगौरवाच्या दृष्टीनें चांगल्या उतरल्या आहेत व तोच सावरकरांच्या काव्याचा मुख्य विशेष आहे.

पोवाड्याचें स्वरूप विजयगीताचें आहे. त्याचा काव्याच्या कथानकांत अंतर्भाव कृत्रिमतेनें झाला आहेसें वाटतें. वस्तुतः तो स्वतंत्रपणें लिहिला गेला असावासें वाटतें. ऐतिहासिक उल्लेख, पूर्वीच्या वैभवाची स्मृति, वर्तमानकालांतील विजयोन्मादाचें उज्ज्वल शब्दांत वर्णन, हिंदुपदपादशाहीच्या कल्पनेचें विवेचन, एकंदर उत्साहजनक वातावरण व त्यास साजेशी ओजस्वी भाषा व वृत्तयोजना या साऱ्यांचें सुंदर मिश्रण यांत आहे. सामान्य पोवाड्यापेक्षां विचारपरंपरा, विषयविवेचन, इतिहासाचें आलोचन आणि भाषेमधील सुसंस्कृतपणा या गोष्टी यांत विशेष असल्यानें साध्या विजयगीतापेक्षां तें अधिक महत्त्वाचें ठरतें.

गोमान्तकाचा पूर्वार्ध जुन्या अनुष्टुभ् छंदांत व उत्तरार्ध आपल्या मतानें नवीन अशा वैनायक वृत्तांत कवीनें लिहिला आहे. नवीन वृत्त वस्तुतः अगदीं नवीन नाहीं. तें एक मात्रावृत्त म्हणजे आधुनिक परिभाषेंत जाति आहे. श्री. कृ. कोल्हटकरांचें महाराष्ट्रगीत व गोविंदाग्रजांचें निद्रागीत याच मात्रावृत्तांत आहे. देवलांच्या मृच्छकटिकांतील 'नोहे हा जवन पवन वायु भासतो' या ओळीसारख्या साऱ्या ओळी या वैनायकवृत्ताच्या आहेत. याचें मात्रालेखन म्हणजे सहा सहा मात्रांचे तीन गण अधिक एक गुरु अथवा ॥ भृ । भृ । भृ । + ॥ असें होईल. यांत सावरकरांनीं केलेला फरक म्हणजे त्यांतील अन्त्ययमक काढून टाकून तें इंग्लिश Blank Verse प्रमाणें अर्थदृष्ट्या धावत्या, सलग, चालू अशा चरणांचें केलें. दोन दोन ओळींचें यमक झालें कीं अर्थ दोन ओळींत पुरा करण्याकडे प्रवृत्ति होते. पल्लेदार अर्थाचे तुकडे तुकडे होतात. महाकाव्यांत, विशेषतः ज्या कल्पनेचें महाकाव्य सावरकरांना लिहावयाचें होतें त्या महाकाव्यांत प्रौढ अर्थ फार आणावयाचा होता. त्यांतील एकेक वाक्यार्थ संपूर्ण व्हावयास अनेक ओळींची लांबी आवश्यक होती. तो वाक्यार्थ सलग आला तरच इष्ट तो परिणाम होण्याची शक्यता होती. यमकांनीं तो खंडित झाला असता, म्हणून यमकें काढलीं व इंग्रजी धर्तीची सलग धावती रचना केली. उत्तरार्धांतील निर्यमक रचनेची पद्धति पूर्वार्धांतही स्वीकारावयास प्रत्यवाय नव्हता. मूळ अनुष्टुभ् छंदांत यमक नसे. मराठींत त्याचा उपयोग झाल्याबरोबर तिनें आपला स्वभावगुण किंवा आवड त्या छंदावर लादली. पण यमकामुळें येणारी कांहीं ठिकाणची तरी अपरिहार्य अशी कृत्रिमता यमक सोडल्यामुळें टळली असती. ज्या पद्धतीनें काव्यरचना झाली असें मागें सांगितलें आहे त्या रचना-परिस्थितीनें या दोनही वृत्तांच्या योजनेंत कांहीं निर्णायक भाग घेतला असावा.

कारागृहांत इतर कामांत असतांनाच मनांतल्या मनांत रचना करून ती मग केव्हांतरी अक्षरनिबद्ध करावयाची असल्यानें त्याला अनुकूल अशी त्यावेळीं सुचली व वाटली अशी सयमक अनुष्टुभ् छंदाची योजना कवीनें केली. एवढेंच त्यासंबंधानें आतां म्हणण्याजोगें आहे. वैनायक वृत्तांत महाकाव्यानुकूल असें विशेष आनुरूप्य आहे असें नाहीं. यमक काढून अर्थाची धावती योजना केल्यास चामरादि वृत्तें किंवा स्वतः अनुष्टुभ् छंदच चालला असता. यमक असलें तरीही वाक्यार्थ पहिल्याच ओळींत संपत नसल्याचीं व दुसऱ्या ओळीच्या अखेरीपर्यंत चालल्याचीं उदाहरणें पुष्कळच असतात. अनेक वेळां तेथेंही तो संपतोच असें नाहीं. मुख्य रोख ठराविक अंतरानें वाक्यार्थ संपविण्याचें बंधन नको या गोष्टीवरच आहे. यमकानें तसें करण्याचा मोह होत असला तर तें काढून टाकल्यानें इष्टसिद्धि होण्याजोगी आहे. प्रौढगंभीर वाक्यार्थास अनुकूल असें वृत्त पाहिजे असा आग्रह असल्यास वर सुचविल्याप्रमाणें इतर कांहीं वृत्तेंही चाललीं असतीं.

प्रस्तुत अनुष्टुभ् छंद आणि ‘वैनायक वृत्त’ अथवा धवलचंद्रिका जाति यांचा उपयोग कवीनें कसा काय केला आहे हा पुढचा विचार होय. आधुनिक मराठींत अनुष्टुभाचा उपयोग फारसा कोणीं न केल्यानें त्याचें वैशिष्ट्य एकदमच भासतें व वाचक आकृष्ट होतो. त्याचा उपयोगही सावरकरांनीं सामान्यपणें सफाईनें व सहजतेनें केला आहे असें दिसतें. यांत जी कांहीं न्यूनता आली आहे ती लेखकाच्या भाषागुणामुळें आली आहे. उत्तरार्धामधील लेखनापेक्षां पूर्वार्धामधील लेखन अधिक सुगम वाटतें याचें एक कारण म्हणजे अनुष्टुभ् छंदावर कवीनें मिळवलेलें प्रभुत्व हेंच होय. क्वचित् अष्टाक्षर चरणांत एक (पू. ३२, २३१, २३३, ५०३) किंवा दोन (पू. ६३१) अक्षरें कमी आलेलीं दिसतात. चरणांत आठांपेक्षां अधिक अक्षरे आल्याचीं स्थळें अधिक आहेत (पू. १८३, ४०४, ७१५, ७३९, ७४४ ते ७४६, ७४८, ७६६, ८४४–४५). या ठिकाणीं हरहर, फरफर, थरथर या शब्दांचीं लेखनदृष्ट्या चार अक्षरें लिहूनही त्यांचा उच्चार मात्र तीनच अक्षरांसारखा कवीला अभिप्रेत असावा असें वाटतें. क्वचित् हें कारणही देतां येणार नाहीं (पू. ८५०). तथापि यांत झालेले वृत्तभंगाचे दोष अनवधानानें किंवा मुद्रण-शैथिल्यानें आले असावेत. यतिभंगाचे दोषाविषयीं मात्र तसें म्हणतां येणार नाहीं. चरणान्तीं शब्द संपणें इष्ट असतां रचनेच्या सोईकरतां तें केलें नाहीं. पू. ३५, १०९, १५८, १९७, २३४, ५५८, ७४५, ७७०, ८०८ इत्यादि स्थलीं यतिभंग

निर्विवादपणें आला आहे. वारं–वार, वार्ते–नें, अ–प्रतिकार, ना–तरी, तद्–वधें, वि–स्मृति, गुप्ता–गारीं, दयाशील–त्वें इत्यादि उदाहरणांचें समर्थनही कसेंबसेंच करतां येईल. पण एकंदर लेखनाच्या मानानें हीं स्थळें कमीच म्हणावयाचीं. वृत्तप्रभुत्वाचा आणखी एक विशेष म्हणजे पादपूरणार्थ निरर्थक अक्षरें योजलेलीं नसणें हा होय. सावरकरांनीं अशीं पादपूरकें योजलेलीं नाहींत. मराठींत रे, हो, अहा, पहा, तत्त्वतां अशीं पुष्कळ पादपूरकें उपलब्ध आहेत. त्यांचें दर्शन या काव्यांत होत नाहीं. याला एक अपवाद आहे. तो म्हणजे चि या शब्दयोगी अव्ययाचा व ' आणि ' या उभयान्वयी अव्ययाचा. आणि या अव्ययाचें 'अणी' हें रूप अनेक वेळां दिसतें व ' चि ' चा ' ची ' झालेला दिसतो. या अव्ययांचा उपयोग निरर्थक आहेच असें दाखविणें पुष्कळवेळां कठिण जाईल. परंतु त्यांचा सारखा उपयोग झाला कीं पुनरुक्तीचा दोष उत्पन्न होतोसा वाटतो. हे दोष सोडले तर अनुष्टुभामधील बहुतेक सारी रचना प्रौढ पण व्यवस्थित झाली आहे.

वैनायक वृत्त हें मात्रावृत्त आहे. त्यांत तीन षण्मात्रिक संपूर्ण गण व शेवटीं एक गुरु येतो हें वर सांगितलेंच आहे. प्रत्येक सहा मात्रांचा गण संपल्यावर निदान पहिल्या दोन षण्मात्रिक गणांच्या बाबतींत यतिस्थान येतें व शब्द संपूर्ण झाला पाहिजे असा आग्रह धरणें अयुक्त होईल. प्रदीर्घ रचनाच त्यामुळें अशक्य होईल. तथापि षण्मात्रिक गण संपला कीं विशेषतः पहिल्या दोन गणांच्या बाबतींत शब्द किंवा त्याचें सामान्यरूप तरी निदान संपावें हें चांगलें असें म्हणतां येईल. गोमान्तकांतील बहुसंख्य ओळी घेतल्या तरी हा नियमच पाळला गेला आहे असें दिसेल. शेवटल्या गणाबरोबर उरलेला एक गुरु सहज जाऊं शकतो. पहिले दोन गण मात्र स्वतंत्र पडतात, तेथें वरील नियम पाळला गेला तर रचना अधिक चांगली वाटते. सार्‍याच ठिकाणीं हें साधलें नाहीं. त्यामुळें थोडी श्रुतिकठोरता येते. ती कदाचित् विषयदृष्ट्या उपकारकच ठरली असेल. आणखी एक विचारही लक्षांत घेणें योग्य होईल. वैनायक वृत्ताच्या मूळ रचनेंत चरणाचें उपान्त्य अक्षर लघु असावें अशी अपेक्षा दिसते. ती अपेक्षा या काव्यांत बर्‍याच ठिकाणीं पूर्ण होत नाहीं. उपान्त्य अक्षरही गुरु येतें व मग त्या गणांतील मात्रासंख्या कायम राखण्याकरितां मागें कुठें तरी लघु अक्षर येतें. त्यामुळें चरणाच्या उत्तरार्धाच्या गेयतेमध्यें फरक होतो. बहुसंख्य चरणांत असें झालेलें नाहीं. परंतु एकेका पानावर ४–५ ओळी साधारणपणें अशा निघतात. सबंध

चरणाची मात्रासंख्या तेवढीच भरते एवढ्यावरच या निराळ्या रचनेचें समर्थन करणें योग्य नव्हे. प्रस्तुत वृत्ताच्या मूळ गेयतेचा त्यामुळें भंग होतो. हा विचारही लक्षांत घ्यावयास हवा. चरणाचा एकच एकपणा (Monotony) मोडून रचनेंत विविधता, निराळेपणा येतो असें सांगून याचाही निर्वाह करणें अशक्य नाहीं. परंतु अशा प्रत्येक ओळीचें समर्थन तेवढ्यानें होणार नाहीं. एवढें झाल्या-वर या वृत्तांत वृत्तभंगाचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. तरी क्वचित् (ओळ २११, २२३, ६६९, १०५५, २६६२) अशीं स्थळेंही सांपडतात. बहुधा तीं अनवधाना-मुळें किंवा मुद्रणदोषामुळें आलीं असावींत.

गोमान्तक काव्याचें स्वरूप हें असें आहे. त्यामध्यें लालित्य कमी असलें तरी ओजोगुणाचा प्रकर्ष साधला आहे. कल्पनारम्यता किंचित् कमी असली, तरी अर्थगौरवाची परिसीमा झालेली आहे. सौंदर्यापेक्षां भव्योदात्ततेचाच प्रत्यय त्यामध्यें अधिक येत आहे. कसें सांगितलें आहे यापेक्षां काय सांगितलें आहे यालाच अधिक महत्त्व या काव्यांत आहे. वाङ्मयाच्या या दोन घटकांचा गुणाकार जो मनावर होणारा परिणाम, त्यांत प्रस्तुत काव्य इतर आधुनिक मराठी काव्यांना हार जाणारें नाहींच—कदाचित् वरचढच ठरेल. भाषाप्रौढीच्या दडपणाखालीं तें सांपडलें नसतें तर पंडित रसिकांबरोबर सामान्य माणसालाही त्याचा आस्वाद घेणें शक्य झालें असतें. आज थोडी चिकाटी धरून वाचणाऱ्या रसिकाला कवीच्या प्रतिभेचा आटोप मोठा आहे याचा प्रत्यय आल्यावांचून राहणार नाहीं. मग त्यास तुम्ही महाकवि म्हणा किंवा न म्हणा.

---

# ' तारकांस पाहून '

## ( रस-ग्रहण )

श्रीयुत अनंत काणेकर, बी. ए., एल्‌एल्‌. बी.

श्री. सावरकरांच्या एका अप्रकाशित कवितेचें सर्वांआधीं रसग्रहण करण्याची संधि मला मिळाली, हें मी माझें सद्भाग्य समजतों. विद्यार्थी दशेंत मी किंवा माझ्या बरोबरीचे इतर तरुण यांच्या अंतःकरणांत देशभक्तीच्या उदात्त भावनेची ज्योत सळसळून प्रज्वलित करावयाला या देशांतल्या ज्या थोर व्यक्तींचीं चरित्रें कारणीभूत झालीं त्यांत सावरकरांच्या रम्याद्‌भुत पूर्वचरित्राची खात्रीनें गणना केली पाहिजे. सावरकरांच्या सध्यांच्या राजकारणासंबंधीं तीव्र मतभेद असूनही ही गोष्ट नमूद करण्यांत मी माझें केवळ कर्तव्यच बजावतों आहें असें मला वाटतें. (सावरकरांचें पूर्वायुष्य हेंच एक अद्‌भुतरम्य काव्य आहे.) आणि अंदमानमधील कोठडीच्या भिंतीवर कांटयांनीं खरडून, खरडलेलें तोंडपाठ करून, तोंडपाठ केलेलें कित्येक वर्षांनीं लिहून काढून त्यांनीं निर्मिलेलीं काव्यें, महाकाव्यें, स्फुटकाव्यें हा त्या अद्‌भुतरम्य आयुष्यांतला अत्यद्‌भुत भाग होय. ' तारकांस पाहून ' ही कविता मात्र अशा कोणत्याही रोमांचकारी परिस्थितींत निर्माण झालेली नाहीं. चोवीस वर्षांचे तरुण सावरकर पुढील अभ्यासासाठीं विलायतेला जात असतां बोटीच्या डेकवर त्यांनीं ही कविता लिहिली आहे. या कवितेच्या स्फूर्तीचा इतिहास कवितेच्या अग्रभागीं आलेल्या परिचयांत संपूर्णपणें दिलेलाच आहे. ही कविता परिणतप्रज्ञ कवि विनायकाची नव्हे; तर कवि म्हणून अपरिपक्व पण आपल्या उज्ज्वल भविष्याची भरपूर चुणूक दाखविणाऱ्या तरुण सावरकरांची आहे, हें विसरतां कामा नये. उत्तम काव्य म्हणजे काय, या अनाद्यनंत प्रश्नाची चर्चा करण्याच्या भरीस मी पडत नाहीं; पण कल्पनाविलास, भावनोत्कर्ष आणि तत्त्वचिंतन हे तीन घटक बहुतेक उत्कृष्ट काव्यांत कमीअधिक प्रमाणांत असतात याबद्दल दुमत होईल, असें वाटत नाहीं. प्रतिभाशाली परंतु अननुभवी, तरुण कवीच्या काव्यांत भावना फारशी सखोल नसते, तत्त्वचिंतनही यथातथाच असतें, पण कल्पनेचा मात्र अत्यंत उच्छृंखल विलास दृष्टीला पडतो. एकामागून एक स्फुरणाऱ्या कल्पनांची सहजता, सौंदर्य

आणि भव्यता यांच्या प्रमाणावरूनच त्या नवकवीच्या प्रतिभेचें तेज अजमावायचें असतें. या दृष्टीनें पहातां 'तारकांस पाहून' या कवितेंत सावरकरांनीं उत्तुंग कल्पनांचे जे मनोरे रचले आहेत, ते पाहून त्यांच्या तेजस्वी प्रतिभेची ताबडतोब साक्ष पटते.

सागरांत प्रतिबिंबित झालेले आकाशांतले तारे पाहून पुढील सहजरम्य कल्पना त्यांनीं रंगविली आहे.

'नुमजे लागे कुठें नभ; कुठें जलसीमा होई
नभांत जल तें, जलांत नभ तें संगमुनी जाई
खरा कोणता सागर यांतुनि वरतीं कीं खालीं
खरे तसें आकाश कोणतें गुंग मती झाली
आकाशींचे तारे सागरिं प्रतिबिंबित होती
किंवा आकाशीं हे बिंबति सागरिंचे मोती
किंवा आकाशचि हें सगळें ! कीं सागर सगळा
–भवसागर बोलती पुराणीं प्रथित ऋषी ज्याला

एवढ्या लहान वयांत आत्मसात् केलेल्या हिंदूंच्या इतिहासपुराणांचाही आपल्या कल्पनाविलासासाठीं या कवितेंत त्यांनीं भरपूर उपयोग केला आहे. उपरोक्त भवसागराच्या कल्पनेपेक्षांही आकाशांतले हे तारे म्हणजे 'नंदनवनिंच्या काजव्यांचे थवे' कीं 'मायेच्या सुनील शालूवरले लकलकणारे टिकले' अशा सुंदर कल्पना उधळून ते म्हणतात:

'सुवर्णगौरा गौरी श्रीहर लीलारत झाले
थाप पडे तों द्वारिं श्रीहरि भेटाया आले
नग्ना लगबग गिरिजा धावे सावरुं शालूला
हिसका बसुनी हार गळ्यांतिल तटकन तो तुटला
त्या हारांतिल मोती सैरावैरा ओघळले
तयांचि तारे म्हणुनि ज्योतिषी भलेभले चकले'

एकाहून एक सुंदर कल्पना त्यांची प्रतिभा जितक्या सहजतेनें प्रसवूं शकते तितक्याच सहजतेनें भव्योदात्त कल्पनाही ती निर्माण करते. विश्वेतिहासाचा जो प्रचंड ग्रंथ कालानें लिहिला त्याचे रुपेरी पुठ्ठ्याचे कांहीं भाग म्हणजेच हे तारे कीं काय असें कल्पून ते म्हणतात:

‘ आकाशाच्या ग्रंथसंग्रहालयासि अर्पियला
काळें ग्रंथ प्रचंड विश्वेतिहास जो लिहिला
रौप्यमुद्रिकांकित तद्भागां अनुक्रमें रचिले
तयांचि तारे म्हणुनि ज्योतिषी भलेभले चकले ’

सावरकरांच्या सर्व काव्यगुणांचा ज्यांत परमोत्कर्ष दृष्टीला पडतो त्या प्रतिभेच्या परिणतावस्थेंत लिहिलेल्या त्यांच्या ‘ जगन्नाथाचा रथोत्सव ’ या उत्कृष्ट कवितें-तल्या उदात्त तत्त्वचिंतनाचें बीज ‘ तारकांस पाहून ’ या कवितेंत आढळतें. जगन्नाथाच्या रथोत्सवांतील,

‘ इच्छांत आणि या भूतमात्र वेगांच्या
ओवुनी लगामा तुझ्या परम इच्छेच्या
त्या अतुट उतरणीवरति अहा काळाच्या
खेळत हा अतलीं । रथोत्सव । खेळत हा अतर्ल,
महाराज आपुली कथा ना कुठें निघे स्वारी ?

या ओळींची ‘ तारकांस पाहून ’ या कवितेंतील,

‘ गजराजाहुनि, फुलपांखरुची सुरंग शोभावें
बीज फुलावें, फुलुनि सुकावें, सुकुनि बीज व्हावें
लहान मोठीं घटिकायंत्रीं बहुविध यंत्रें तीं
स्वस्वगतीनें परि एक्याची साध्यास्तव फिरती
असा कोणता हेतु जयाच्या सिद्धीस्तव साचीं
विश्वाच्या या चक्रें फिरती भव्य घड्याळाचीं ’

या ओळींशीं तत्त्वविवेचनदृष्ट्या तुलना करण्यासारखी आहे.

या कल्पनाप्रधान कवितेंत भावनेचा भाग जवळ जवळ नाहींच म्हटलें तरी चालेल. नाहीं म्हणायला एके ठिकाणीं कवीच्या वैयक्तिक भावनेचा अप्रत्यक्षपणें कां होईना पण थोडासा आविष्कार झाला आहे. ‘ नभांतून निसटून ’ ‘ सागराच्या जलमंदिरीं लगबगीनें घुसणाऱ्या’ एका चटकचांदणीला पाहून कवि सागराला म्हणतातः

‘ लाजुं नको जा ! भोग विलासा कामोत्सुक तूं ती
तुझिया शतजलतरंगमंजुल सुखा साथ दे ती

प्रेमाची चांदणी परंतू ज्यांची दूर वसे
किती प्रवासी तळमळती बा, तुझ्यानिकट ऐसे
तुझा तुझ्या चांदणिशीं पाहुनि प्रियसंगम साचा
तव मत्सर ना ! परी छळी त्या वियोग दयितांचा

या ओळींत वर्णिलेलें सागर–चांदणीचें प्रेम किंवा 'सुवर्णगौरा गौरी श्रीहर' यांच्या शृंगाराचें या पूर्वींच्या ओळींत येऊन गेलेलें वर्णन पाहिल्यानंतर मराठी काव्यक्षेत्रांत केशवसुतांनंतर सुरू झालेल्या बालकवि, गडकरी इत्यादि सावरकरांच्या जवळजवळ समवयस्क किंवा समकालीन कवींच्या आधुनिक सांप्रदायाचा सावरकरांवर यत्किंचितही परिणाम झालेला नाहीं, आधुनिक मराठी काव्यवाङ्मयांत त्यांचें स्थान अजिबात स्वतंत्र आहे, ही गोष्ट ताबडतोब ध्यानांत येते. केशवसुत, गडकरी, बालकवि यांच्या काव्यांवर इंग्रजी काव्याचा परिणाम झालेला दिसतो, तर सावरकरांची स्फूर्ति संस्कृतोद्भव आहे. पाश्चिमात्य संस्कृतीच्या संघर्षामुळें भारतीय जीवनांत आलेल्या आधुनिकतेचा तिला वासही लागलेला नाहीं. याचें एक कारण संस्कृत वाङ्मयाचा त्यांचा गाढ व्यासंग हें तर असेलच, पण त्याहीपेक्षां महत्त्वाचें दुसरें कारण अंदमान येथील हद्दपारीमुळें समकालीन सामाजिक जीवनापासून त्यांची झालेली ताटातूट हेंही असण्याचा संभव आहे. आधुनिक जीवनांत स्त्रीला बरेचसें पुरुषाच्या बरोबरीचें स्थान मिळालें आहे. प्रियतमेचें प्रेम संपादन करावयाचें म्हणजे आधुनिक प्रियकराला तिचा अनुनय करावयाला पाहिजे. ती दुष्प्राप्य झाली कीं ध्यान, चिंतन, मानसपूजा, त्यागवृत्ति इत्यादि उदात्त भावना त्याच्या मनांत उद्‌भूत होतात. आधुनिक मराठी काव्यांत या कल्पनारम्य उदात्त प्रणयाचें चित्र दिसतें. ज्या मध्ययुगांत संस्कृत काव्यवाङ्मय लिहिलें गेलें त्या काळीं स्त्री हा समाजाचा इतका महत्त्वाचा घटक खास नव्हता किंवा तिच्या प्राप्तीसाठीं इतका खटाटोपही करावा लागत नव्हता. स्त्रीपुरुषांमधल्या प्रेमाची त्या काळची कल्पना कांहीं आधुनिकांना अश्लील वाटली तरी, साधी, सरळ आणि बिनगुंतागुंतीची होती. स्त्री-पुरुषांमधलें प्रेम म्हणजे 'सकाम' पुरुषाला 'कामयमाना' स्त्रीबद्दल वाटणारे लैंगिक आकर्षण, आणि त्या प्रेमाचा परमोत्कर्ष म्हणजे त्या आकर्षणाचें सुरतोत्सवांत झालेलें पर्यवसान. कामोत्सुक सागर किंवा गौरी-श्रीहर यांच्या सावरकरांनीं केलेल्या प्रणयवर्णनांत हाच दृष्टिकोन दृष्टीला पडतो.

सावरकरांनीं कोवळ्या वयांत लिहिलेल्या या सहजसुंदर, चिमुकल्या कवितेंत ज्याप्रमाणें त्यांच्या प्रगल्भावस्थेंतल्या काव्याचीं कांहीं बीजें आपणांला दिसतात. त्याप्रमाणेंच वस्तुस्थितीच्या कठोर पृथक्करणापेक्षां भावनात्म स्वप्नरंजनांतच रंगून जाण्याची त्यांची जी वृत्ति आहे तिचेंही बीज शोधावयाचेंच ठरविल्यास या कवितेंत आपणांला सांपडेल. आपल्या दूरदर्शी दुर्बिणीच्या साहाय्यानें प्रत्येक तारका म्हणजे एक एक धगधगता अग्निगोल आहे, असें शास्त्रज्ञांनीं निर्विवाद सिद्ध केलें आहे. हें कठोर शास्त्रीय सत्य चांदण्यांसंबंधींचें आपलें कोमल स्वप्नरंजन उध्वस्त करून टाकतें म्हणून सावरकरांनीं पुढीलप्रमाणें शास्त्रज्ञांवर हल्ला चढविला आहे.

‘ हे चांदणि सुखशीतल गमसी तशीच असशी ना ?
आगचि लागो लोळ आगिचा तुजसी वदत्यांना
आल्हादक किति चंद्रबिंब हें ! नंदसुधा झरतें
फुटो भिंग तें भिकार त्या जें मसणासम करतें
... ... ... ... ... ...
फुटोत ते त्या विद्रुप करिते दुर्बिणिचे डोळे

सावरकरांच्या व्यक्तित्वाचे असे अनेक पैलू बीजरूपानें या कवितेंत आपणांला दिसतात. आधुनिक मराठी काव्यांत त्यांचें जें स्वतंत्र अद्वितीय स्थान आहे त्याचेंही थोडेंबहुत दिग्दर्शन ही कविता करते. त्यांचें हें स्थान चिरकाल टिकेल यांत मुळींच शंका नाहीं.

---

# सावरकरांचीं दीर्घकाव्यें

प्रो. श्री. शं. खानवेलकर, एम्. ए.

लोकप्रिय कवींच्या काव्याला जें महत्त्व प्राप्त झालेलें असतें त्याचीं कारणें विविध असूं शकतात. एखाद्या कवीच्या विशाल कल्पना रसिकांना मान्य होतात, तर एखाद्या कवीच्या प्रखर भावनाच लोकांना आवडतात. एखाद्या कवीच्या काव्यांतील विषय रसज्ञांना डोलवतात तर दुसऱ्या एखाद्या कवीच्या भाषाशैलीमुळें, अलंकारांमुळें जनता त्याच्या काव्याकडे आकर्षित होते. कल्पना, भावना, अनुरूप विषय, गेयता, भाषाशैली, तत्त्वज्ञान, रसाविष्कार, इत्यादि विविध गुणांनीं उत्कृष्ट काव्य नटलेलें असतें. एखाद्या काव्यांत वरील गुणांपैकीं कांहीं गुणांचाच इतका मधुर प्रकर्ष झालेला असतो कीं, त्यामुळेंच त्यावर रसिकांच्या उड्या पडतात.

श्री. सावरकरांच्या काव्यवाङ्मयाचा जेव्हां आपण विचार करूं लागतों, तेव्हां मात्र केवळ वरील गुणांकडेच आपलें लक्ष जात नाहीं. त्यांच्या काव्यांत वर सांगितलेले गुण कितपत आहेत याचा विचार निरनिराळ्या लेखकांनीं आपल्या टीकालेखांतून केलाच आहे, आणि याही लेखांत तो होईलच. पण श्री. सावरकरांच्या काव्याला वरील गुणांमुळेंच महत्त्व प्राप्त झालेलें नसून त्यांत आणखी एक महत्त्वाचा गुण आहे. त्यांच्या साऱ्या काव्याची निर्मिति ज्या ठिकाणीं झाली त्यांत मोठी अद्भुतता आहे. काव्यनिर्मितीचें स्थल, काल, आणि त्यावेळची मनःस्थिति यांचें ज्ञान श्री. सावरकरांचें काव्य वाचण्यापूर्वीं वाचकाला झालेलें असलें तर काव्याची गोडी चाखण्याला त्याला जास्त साहाय्य होईल. अंदमानच्या भीषण कारागृहांत, पन्नास वर्षांची दोन जन्मठेपींची शिक्षा झालेला—एक भावनाप्रधान तरुण देशभक्त आपल्या गतायुष्याचें चिंतन करीत करीत, भारतवर्षाच्या स्वातंत्र्याची काळजी वहात, हिंदुजातीच्या भविष्यकालासंबंधीं विचार करीत, आपल्या मनाशींच बोलत बसलेला असतांना त्याला कांहीं प्रसंगांवरून काव्यरचना करण्याची स्फूर्ति होते, आणि त्या वयांत न झेपणारें काम करीत असतांना, विश्रांतीच्या वेळीं, भोजनाच्या वेळीं तो कवितेच्या ओळी आपल्या मनाशीं गुणगुणतो, कांट्यांनीं त्या भिंतीवर लिहितो, पाठ करतो आणि आपल्यापूर्वीं सुटका झालेल्या एखाद्या कैद्या-

बरोबर तो त्या प्रसिद्धीसाठीं पाठवून देतो किंवा एखाद्या अन्य मार्गानें आपलें काव्य तो बाहेर पाठवतो, यांत निःसंशय अद्भुतता आहे. जवळ नाहींत संदर्भाचीं पुस्तकें, एखादा शब्द अडला तर तो आठवण्यासाठीं दोनदोन दिवससुद्धां खर्ची घालावयास लागावेत, तेवढ्यांत गुंफलेल्या कांहीं ओळींमधील मोती स्मृतीच्या सूत्रांतून ओघळावेत, नेमून दिलेल्या कामाशिवाय इतर काम करतांना कोणी आढळला तर कठोर शिक्षेचें कृपाण मानेवर असलेलें, अशा स्थितींत त्यांच्या या सर्व काव्यांची रचना झाली आहे. म्हणूनच इतर कवींच्या काव्यापेक्षां श्री. सावरकरांच्या काव्यांत एक निराळाच गुण वसत आहे, असें मीं म्हटलें तें एवढ्याचसाठीं !

या लेखांत श्री. सावरकरांच्या दीर्घ काव्यांचाच फक्त विचार करावयाचा आहे. हीं काव्यें भयाण एकलकोंडींतच निर्माण झालेलीं आहेत. कवीच्या मनांतील आशानिराशेचें द्वंद्व, आणि शेवटीं काव्यावर बसलेला निराशेचा पगडा, आणि त्यांतूनही उसळी घेऊन बाहेर पडलेला दुर्दम्य आशावाद या काव्यांतून आपल्याला स्पष्ट दिसतो. हीं सर्व काव्यें त्यांनीं बंदिशाळेंतच लिहिलीं. 'मूर्ति दुजी ती' 'सप्तर्षि,' 'मरणोन्मुख शय्येवर,' 'आकांक्षा,' 'चांदोबा चांदोबा ! भागलास का ?' आणि 'सायंघंटा' हीं श्री. सावरकरांचीं सहा दीर्घ काव्यें आहेत. यांतील प्रधान कल्पना जवळ जवळ सारख्याच आहेत असें म्हटलें तर फारसें चुकणार नाहीं. सकृद्दर्शनीं या सर्व कविता निराळ्या वाटतात. त्यांचे विषय, रचना, आणि विषय हाताळण्याची हातोटी जरी निराळी असली तरीही त्यांत आशानिराशेचें द्वंद्व आहेच. एक एक दिवस मोजीत पडलेला दीर्घ शिक्षेचा कैदी ज्या भावना मनांत बाळगील त्यांचें प्रतिबिंब कमीअधिक प्रमाणांत या काव्यांत पडलेलें आढळून येईल. आकाशांत भरारी मारणाऱ्या पक्षिराजाला एखाद्या पिंजऱ्यांत दीर्घ कालपर्यंत बंदिस्त करून ठेवलें आणि त्या पिंजऱ्याला सर्व बाजूंनीं आच्छादन लावलें तर त्याची जी स्थिति होईल तीच स्थिति बंदीची होते आणि त्यांतून दुःखमय काव्य निर्माण होतें. त्याला कधीं घरची आठवण येते, कधीं तो रम्य अशा बालपणांतील स्मृतींत रंगून जातो, तर कधीं त्याला आपल्या जीवितांतील विविध घडामोडींची आठवण येते, आणि बाहेर पडण्यासाठीं तो विव्हल होतो. मित्र, बांधव, आप्तेष्ट, प्रेमाचीं माणसें यांची त्याला स्मृति होते, आणि त्यांच्यापासून आपण आतां दूर आहोंत या आठवणीनें त्याच्या कोठडींतील तरट अश्रूंनीं ओलावतें. हाताची उशी करून, अंगाला बोचणाऱ्या तरटावर निजणाऱ्या कैद्याला दुसऱ्या कसल्या आठवणी येणार ? त्याचा सारा शृंगार, त्याचें

सुख सगळें कल्पनेंतच. कल्पनेच्या वारूवर स्वार होऊनच तो प्रणयीजनांच्या सान्निध्यांत असण्याचा आनंद उपभोगील, नि स्वैरविहार करील.

'सप्तर्षि' ही कविता भायखळ्याच्या एकलकोंडींत लिहिलेली आहे. इंग्लंडमध्यें त्यांना पकडलें खरे, पण तेथें कांहीं त्यांच्या बंदिवासाला खरी सुरवात झाली नव्हती. ते डोंगरीमध्यें ज्या दिवशीं गेले त्या दिवशीं त्यांच्या बंदिवासाला खरी सुरवात झाली. त्यांनीं आतांपर्यंत धैर्याचा उपदेश लोकांना केला पण आतां मात्र त्यांना स्वतःलाच उपदेश करून घेण्याची पाळी आली. अंदमानमध्यें त्यांना एक नव्हे, दोन जन्मठेपी काढावयाच्या होत्या. पंचवीस वर्षे त्यांनीं पुढच्या आशेवर तरी काढलीं असतीं. कारण सुटका झाल्यावर कांहीं जीवन जगण्याची तरी संधि त्यांना प्राप्त झाली असती. पण पन्नास वर्षे !

'वर्षें पन्नास!' परी ऐकुनि उत्साह तोहि कोसळला !<br>सुकला तरंग अंतिम होता जो मृगजळांत सळसळला !

अशी त्यांची स्थिति झाली. त्यावेळीं त्यांना रामचंद्राच्या वनवासाची आठवण झाली. आणि ऐंशीं वर्षांचे असतांना आपण मायभूमीला परत जाऊं, या विचारानें त्यांना दुःख झालें. पण यांतही त्यांच्या आशावादानें वर डोकें काढलेंच आहे. ऐंशीं वर्षांचे असतांनाही ज्यांनीं मायभूमीची सेवा केली अशा दादाभाई नवरोजी, राजा कुमारसिंह, ग्लॅडस्टन, डिझरायली, रामानुज, भगवान् बुद्ध, इत्यादींची त्यांना आठवण झाली आणि आपण मायभूमीला परत जाऊं आणि तिच्यासाठीं कांहींतरी करूं शकूं, असा विश्वास त्यांच्या मनांत डोकावला. पण त्यांना कशा स्थितींत दिवस काढावयाचे होते ? त्यांना कोणत्या ठिकाणीं रहावयाचें होतें ? सप्तर्षींत त्यांनीं केलेलें एकलकोंडीचें वर्णन वाचल्यावर कशा स्थितींत त्यांना रहावयाचें होतें याची कल्पना येईल. अशा स्थितींत पन्नास वर्षांची शिक्षा भोगूनही पुन्हा धडधाकटपणें परत येऊन मायभूमीची सेवा करण्याची आशा बाळगणारा तरुण वीर खराच !

यानंतर खरे सुख आणि दुःख कशांत असतें याची मीमांसा त्यांनीं केली आहे. चित्त एकाग्र करून, आपल्याला समाधिद्वारा सुख होईल असाही विश्वास व्यक्त केला आहे. आणि याच वेळीं पुष्कळ वर्षेपर्यंत एकान्तांत राहिलेल्या लोकांचीही त्यांनीं आठवण केलेली आहे. विविध प्रकारचा विचार करीत असतांनाच कोठडींतून

त्यांना सप्तर्षि दिसले. त्यावेळीं त्यांना अतिशय आनंद झाला. सुनील आकाशांत, रात्रीच्या शांत वेळीं चमकणाऱ्या असंख्य तेजोमय तारकांकडे पाहिल्यावर कोणत्याही माणसाला आनंद होतो तर चार भिंतींच्या आंत वर्षानुवर्षें पिचत पडणार ही जाणीव असणाऱ्या बंदीला आकाशांतल्या तारकांकडे पाहिल्यावर किती आनंद होईल ! तारकांना पाहिल्यावर त्यांनीं त्यांच्याशींच संभाषण सुरू केलें. पृथ्वीची उत्पत्ति कशी झाली असेल येथपासून संभाषण करीत करीत कवि पुन्हा स्वस्थितीवर आलेला आहे. सप्तर्षींवर काय असेल याचाही विचार त्यांनीं केलेला दिसतो. पण कोंडलेल्या माणसाला बाहेर पडावेंसें वाटतें ! या ठिकाणींही त्यांचे विचार असेच दिसतात. त्यांना वाटतें, सप्तर्षींवर जावें आणि तेथून अनंत काळचा इतिहास पहावा. ते इतिहाससंशोधकांसंबंधीं म्हणतात,

हाडें हुडकित उकरित भूस्तर, शुष्कौघ, भग्नसेतु, कडे
मरुभू, पर्वत; जुळवित पत्रांचे कीट गलितसे तुकडे,
हे ऐतिहास संशोधक वेडे श्रम कशास करिताती
तर्कवितर्कांमध्यें सत्याचा शेष जीव हरिताती !

कशाला निष्कारण इतिहाससंशोधन करीत बसतां ? पृथ्वीपासून जो तारा हजारो प्रकाशवर्षें दूर आहे, त्यावर जाऊन बसा. म्हणजे तुमच्या डोळ्यासमोर सारा इतिहास येईल आणि नसते वाद तुम्हांला करीत बसावें लागणार नाहीं. सप्तर्षींशीं अशा रीतीनें बोलत बसत असतांनाच पहारा बदलला आणि त्यांना इच्छा नसतांना विश्रांतीसाठीं पडावें लागलें. त्यांनीं जातां जातां सप्तर्षींची प्रार्थना केली.

अंधारकोठडीच्या हरण्या हृदिंच्या तशा तमालाही
मज विश्वदीप्ति संतत तुमच्या देवोत सातमालाही

'चांदोबा चांदोबा ! भागलास का ?' ही कविता कांहींशी 'सप्तर्षि' या कवितेसारखीच आहे. एकलकोंडींतून एकदां कवीला चंद्राची कोर दिसली आणि ती पाहून ज्या नानाप्रकारच्या रमणीय आठवणी त्याला झाल्या, त्यांचें हृद्य वर्णन या काव्यांत आहे. बंद्यांना चंद्र पहाण्याचें भाग्यसुद्धां क्वचितच लाभतें. अशा वेळीं त्या भाग्याचा पुरेपूर उपयोग करून घेतला पाहिजे. आपल्याला हें सुख कायमचें मिळत नाहीं म्हणून हा क्षणाचा आनंद आपण घेऊं नये काय ? अशा कल्पना करीत असतांनाच पोळ्यामध्यें मधमाशा याव्यात आणि त्यांनीं गुणगुणावें त्याप्रमाणें भावना मेंदूमध्यें

गुणगुणूं लागल्या आणि ' चांदोबा ! चांदोबा ! भागलास का। लिंबोणीच्या झाडामागें लपलास का ॥ लिंबोणीचं झाड करवंदी । मामाचा वाडा चिरेबंदी ॥ ' या पंक्तींची कवीला आठवण झाली. त्या आठवणींत गुंगत असतांनाच त्याला मामाच्या वाड्याची, आपल्या घरच्या लिंबोणीच्या झाडाची नि सगळ्या भावंडांची स्मृति झाली आणि त्या स्मृतीमध्यें कवि बराच वेळ रंगून गेला.

' सायंघंटा ' ही कविता बंदिजीवनावर आधारलेली आहे. बंदिजनांचें दिवसाचें काम संपलें कीं, त्यांना कोठडींत बंद करण्यापूर्वी सायंकाळची घंटा होते. ही घंटा झाली कीं आपल्या कैदेचा एक दिवस संपला अशी जाणीव त्यांना होते. या कल्पनेवर ही कविता रचली आहे. ' सप्तर्षि ' या कवितेंत बंदिस्थानाचें वर्णन आहे; या कवितेंत बंद्यांच्या कार्यक्रमाचें वर्णन दिलेलें आहे. सकाळपासून घाण्याला जुंपलेले, पशुप्रमाणें वागवणूक मिळालेले कैदी सायंकाळीं कसेबसे दोन घास तोंडांत कोंबतात नि कोठड्यांत डांबले जातात. कांहीं जणांना मात्र रात्रभर काम करावें लागतें, कारण त्यांना ठरविलेलें तेल देतां आलेलें नसतें. त्यावेळीं बंदिप त्यांना म्हणतोः

खून तुमारा लूंगा देहसे अभी
तितना—के जितना कम तेल करोगे

अशाही परिस्थितींत त्यांना काम करावें लागतें. धक्के सोसावेत, अपमान गिळावा, मार खावा आणि उपाशी नि अर्धपोटीं घाणा ओढावा. त्यांना सायंघंटा क्रूर भासते. कारण इतर कैदी विश्रांति घेत असतांना यांना मात्र निष्कारणच तडफडावें लागतें. पण कवीला या सायंघटेंत निराळाच अर्थ भरलेला आढळतो. ही घंटा म्हणजे मायभूला स्वतंत्र करण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या कष्टांची गणक आहे. ज्या दिवशीं कष्टांचें मोल मायभूला मिळेल, त्या दिवशीं सारा लोक गर्जून उठेल नि हिंदुस्थानची विजयघंटा वाजेल. किंवा मायभूच्या स्वातंत्र्यासाठीं जें मूल्य द्यावें लागेल त्यांतला एक दिवस हा दिनार आहे, आणि हा दिनार दिल्याची खूण म्हणजे ही घंटा आहे. या कवितेंतून कवीनें एक सिद्धांत काढला आहे. तो म्हणतोः

कवण जगे ? अहह जरी हिंदची मरे
कवण मरे ? हृष्ट जरी हिंद जगे रे !

ह्या सिद्धान्तावर लिहिण्याचें कांहींच कारण नाहीं. पण या काव्यामधून तो निघत नाहीं. तो बुद्धया, ओढून ताणून आणलेला आहे असें वाटतें.

१९१० मध्यें इंग्लंडमध्यें श्री. सावरकरांना पकडलें आणि एका कोठडींत बंदिस्त केलें. त्यावेळीं ‘ मूर्ति दुजी ती ’ हें भीषणरमणीय काव्य त्यांना स्फुरलें. आतां आपण कारागृहांत दीर्घ कालपर्यंत खितपत पडणार याची त्यांना जाणीव होती. राजसत्तेच्या विरुद्ध झगडा करणाऱ्या तरुणाला कोणती शिक्षा होते याची त्यांना कल्पना होती. अशा वेळीं त्या गारदून टाकणाऱ्या कोठडींत त्यांनीं काव्यदेवीला आवाहन केलें. या आवाहनानें त्यांना धीर येणार होता. त्यांच्या मनांत अनेकविध विचारांचें तुंबळ युद्ध त्यावेळीं निर्माण झालें होतें. आशा, निराशा, अपमान, दुःख, मायदेशाची नि आप्तेष्टांची चिंता या त्यांच्या मनांत त्यावेळीं आल्या होत्या. अशा वेळीं त्यांनीं कवितेला आवाहन केलें. मात्र श्रीकृष्णाच्या मधुर बांसरींतून बाहेर पडलेले गोड आलाप यावेळीं त्यांना नको होते. यमुनेच्या पुलिंदावर गोपगोपींच्या सहवासांत, बालकृष्णाच्या नाजूक ओठांत धरलेल्या बांसरींतून निघालेल्या गोड आलापांनीं त्या बंदीला कसलें सुख होणार ! रत्नांचीं कंकणें घातलेली, शुभ्र वस्त्रें नेसलेली, मोहक युवतीच्या वेषांतील काव्यदेवी त्यांना नको होती. तर त्यांना कवितेची भयंकर मूर्ति पहावयाची आवश्यकता होती. कारण त्या मूर्तीच्या साक्षात्कारामुळेंच त्यांच्या घोर तपश्चर्येंत त्यांना सुख लाभणार होतें. “ मी आज हिंस्र पशूसारखा पिंजऱ्यांत पडलों आहें; म्हणून मला तुझ्या मनोहर स्वरूपाचें दर्शन नको. कविता ही कांहीं एकादी पण्यांगना नाहीं कीं केवळ सुखाच्या वेळींच ती आपला हात धरील. छे, कवितें, मला तुझ्या भयंकर स्वरूपांत तूं दर्शन दे ” अशी त्यांनीं तिची प्रार्थना केली आहे. कवितादेवी आपल्याला कधींही विसरणार नाहीं अशी त्यांना खात्री होती. ते म्हणतातः

ना कविता निजभक्ता त्यागिना कधीं
भक्त तिला त्यागो, ती त्यागिना तया

कवितेच्या कोमल आणि प्रखर मूर्तींपैकीं दोन्ही मूर्तींचें चित्र त्यांनीं या काव्यांत सुंदर रेखाटलें आहे. यमुनापुलिनावर मृदु ओठांनीं बांसरीचे स्वर काढणारी ही एक मूर्ति आणि दुसरी रणशिंग फुंकणारी व तांडवनृत्य करणारी ! या चंडिकामूर्तीचें वर्णन रम्यभीषण आहे.

कुरळीं जे खेळावे, केश मृदुल ते,
क्रोधानें राठ राठ उठुनिया जवें,
फुटलेल्या पेंवांतुनि सर्प कीं तसे
बुचड्यांतुनि चवताळत सुटुनि धावती
स्कंधीं वा वक्षीं वा पृष्ठिं वा मुखीं
विक्राल क्रोधभरे अति भयंकराः
एकया निज हस्तेंची छाटुनी स्वयें
खड्गानें आपुलेंच मुंड, फल तसें
अन्या निज हस्तीं घेः आणि अहो जी
रक्ताची धार उडे वरि उफाळुनी
लाल लाल चिकट बिकट त्या गळ्यांतुनी
धार तीच घटघट त्या क्रुद्ध मुखें पी
पेल्यांतुनि लाल मद्य पी जसें कुणी !
पिउनि रक्त आपुलेंचि आपली तृषा
शांतवित्या त्या प्रचंड रौद्रभीषणा
रुंडधरा छिन्नमुंड मूर्तिसी नमो !

या चंडमूर्तीची आठवण केल्यानंतर त्यांना धर्मासाठीं प्राण दिलेल्या बंदावीराची आठवण झाली. बंदावीराला पिंजऱ्यांत घालून आणला, त्याच्या दोनशें अनुयायांना त्याच्या देखत हाल करून ठार मारलें, त्याच्या कोवळ्या बालकाचाही प्राण त्याच्या देखत घेतला, त्या बालकाचें हृदय बंदावीराच्या मुखांत कोंबलें, तापलेल्या सांडसांनीं त्याच्या अंगाचें मांस बाहेर काढलें तरी तो अचलच ! शीखपंथासाठीं त्या वीरानें अतुल स्वार्थत्याग केला आणि छळ सोसला. त्याची आठवण या प्रसंगीं होणें अगदीं सहज आहे. या वीराला शेवटीं राजसेवकांनीं उकिरडयावर टाकलें. पण त्याच्या त्यागाचा परिणाम काय झाला ?

मानियले मूषक ज्या, कःपदार्थ ज्या
तेचि अहा सिंहासन पोखरूनिया
त्या धरित्या सिंहाच्या क्रूर भीषणा
तोंडासचि करिताती आपलीं बिळें !
पायदळींची रेती तापली अशी
कीं भाजुनि भस्म करी पायदळासी

अशी स्थिति झाली. आपल्या त्यागामुळें मायभूमींतील पददलित समाजाचें असेंच उत्थान होईल अशी कल्पना श्री. सावरकरांच्या मनांत त्यावेळीं डोकावून तर गेली नसेल ?

'आकांक्षा' ही कविता सर्व कवितांत निराळी आहे. यामध्यें मेघदूत आणि इसापनीति यांतील एकदोन कल्पना घेतल्यासारख्या दिसतात. या काव्यांतील कथानक स्वतंत्र कल्पनेप्रमाणें भासलें तरी तें अन्योक्तिपर आहे हें उघड आहे. एका गरुडाच्या जोडप्याला शापामुळें कावळ्यांच्या समुदायांत वावरावें लागतें. आणि तेंही पिंड खात खात तेथें सुखानें राहातें. पण त्यांच्या कन्येला मात्र या जीवनांत कांहीं राम नाहीं असें वाटूं लागतें. इतक्यांत तिला एका गरुडाची आणि सर्पाची चाललेली झुंज दिसते. त्या झटापटींत सर्प घायाळ होतो आणि गरुड विजयी होतो. त्याच्या प्राप्तीसाठीं ही गरुडकन्या तळमळते. तिचे आईबाप तिचा निषेध करतात. आणि गरुडाच्या प्राप्तीचें ध्येय सोडून द्यावयास तिला सांगतात. पण ती आपली आकांक्षा सोडीत नाहीं. ही गरुडकन्यका कदाचित् हिंदभू असूं शकेल किंवा तिच्या सेवेसाठीं तळमळणारी एखादी व्यक्तीही असूं शकेल. इसापनीतींतील मेंढ्यांच्या कळपांत राहिलेल्या सिंहाला विहिरींत स्वस्वरूपाचें दर्शन झाल्यानंतर जें ज्ञान झालें तसेंच ज्ञान प्रस्तुत गरुडकन्यकेला झालें, पण त्या ज्वलन्त महत्त्वाकांक्षेमधील दाह तिच्या गतानुगतिक पितरांना सहन झाला नाहीं. या कवितेंतील सर्पाच्या आणि गरुडाच्या झगड्याचें वर्णन अतिशय सुंदर साधलें आहे.

अंदमानमध्यें मृत्युशय्येवर असतांना 'मरणोन्मुख शय्येवर' ही कविता लिहिलेली आहे. मृत्यूविषयींचे विविध विचार या कवितेंत व्यक्त केलेले आहेत. कवीला मृत्यूची भीति वाटत नाहीं. मृत्यूला त्यानें आनंदानें निमंत्रण केलें आहे.

ये, मृत्यो ! ये तूं ये ! यावयाप्रती
निघालाचि असशिल जरि ये तरी सुखें !
कोमेजुनि जावया भिवोंत हीं फुलें;
हीं द्राक्षें रसरशीत सुकुनि जावया
भ्यावें तें कां म्हणुनी तुजसि परी मीं ?
माझ्या पेल्यांत किती पीत राहिलों
तरि न संपतीच अशा असति आजि या
अश्रूंच्या मदिराची मात्र राहिल्या !

आणि त्याही नैवेद्याची मृत्यूला आवश्यकता असेल, तर त्यानें तो सुखानें घ्यावा. मृत्यूचें गूढ अजून कोणालाही उकललेलें नाहीं. त्याच्याविषयीं निरनिराळीं मतें प्रचलित आहेत. पण मृत्यूची कोणतीही कल्पना घेतली तरी मृत्यूंत कवीला समाधानच आहे. जीवनांतील वासना कधींच संपत नाहींत. मृत्यूबरोबरच त्यांचा अंत होतो. ययाति इतकीं वर्षे जगला, तरी त्याच्या वासनांचा अंत कोठें झाला होता? तेव्हां आपल्या जीवनाचा निराशेंत अंत झाला तरी आपल्याला त्यांत वाईट वाटण्यासारखें काय आहे? जर पुनर्जन्म असेल तर तो कर्मफलाप्रमाणेंच असतो, तेव्हां जर मला पुनर्जन्म आला तर मी पुन्हा मायभूमीच्या सेवेसाठींच लागेन. बरें, मरण हेंच सर्व गोष्टींचा शेवट असेल तर मला वाईट वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. मृत्यु लोकांना वाईट वाटतो याचें कारण मृत्यूचें सैन्य हिडिस रोगांचें आहे म्हणून. एरवी त्यांत वाईट कांहींच नाहीं. मी सगळ्यालाच तयार आहें अशी कवीची विचारसरणी आहे.

या सर्व काव्यांतून आशावाद दिसतो असें वर सांगितलेंच आहे. काव्यांची निर्मिति काव्यमय आहे. यामुळेंही या काव्यांना इतर काव्यांपेक्षां महत्त्व प्राप्त झालें आहे. श्री. सावरकरांच्या भाषाशैलींत वैशिष्ट्य आहे. त्या भाषेंत त्यांचें व्यक्तिमत्त्व इतकें प्रकट झालें आहे कीं, 'Style is the man' हें तत्त्व त्यांच्या बाबतींत खरें आहे असें दिसून येतें. मधुर कल्पना, दुर्दम्य आशावाद, मधूनमधून पेरलेले उत्कृष्ट अलंकार, यामुळें सर्वच काव्यें सरस झालीं आहेत. क्वचित् प्रसंगीं दूरान्वय, 'सरितापुलिनोत्थ थंड तीं कलिंगडें' अशासारखी रचना, 'सहा सहा महिन्यांत कधीं। चंद्र दिसेना बंदिमधीं' अशासारखी जवळजवळ गद्यरचना दिसली तरी काव्य वाचीत रहावेंसें वाटतें. सामान्य वाचकाच्या आटोक्यांत न येण्यासारखे शब्द आणि कल्पना मधून मधून दिसतात. पण चंद्रावरील कलंकासारखेच हे दोष आहेत. शीघ्रान्तता, गणक, कल्पद्रुमसुमचय, सुपर्ण, भी, तार्क्ष्य, दहनवमत्या, हैमपक्ष्म, सुरपधनु, भास्वत् तमिस्रा, लिप्से, स्वयमपि, बुद्ध्यन्ध, निकी, व्योमकेश, तरणि, बर्बरता, सद्य, यासारख्या शब्दांशीं सामान्य वाचक अडखळल्याखेरीज रहाणार नाहीं. पण त्यामुळें काव्याचा आस्वाद घेण्यास अडथळा येत नाहीं, ही गोष्ट मात्र खरी आहे.

---

## भारतीय काव्यवाटिकेंत

# सावरकर-कवितेचें स्थान

### साहित्याचार्य वेदान्ततीर्थ बाळशास्त्री हरदास

" A great and vivifying message had to be given to a nation or to humanity. And God has chosen this mouth on which to shape the words of the message. A momentous vision had to be revealed, and it is his eyes which the Almighty first unseals. The message which he has received, the vision which has been Vouchsafed to him, he declares to the world with all the strength that is in him, and in one supreme moment of inspiration expresses it in words which have merely to be uttered to stir men's in most natures, clarify their minds, seize their hearts and impel them to things which would have been impossible to them in their ordinary moments. Those words are the *mantra* which he was born to reveal and of that mantra he is the seer. "

Shri Aurovind Ghoshe.

जुन्या सरदारी थाटाच्या सुभव्य दिवाणखान्यांत, कांचेच्या हंड्याझुंबरांमधून लुकलुकणाऱ्या शेंकडों मेणबत्त्यांचा प्रशांत प्रकाश पसरला असतां, ज्या डोळ्यांना सतत त्या प्रकाशांतच वावरण्याची संवय झाली आहे त्यांच्यासमोर, एकाएकीं, मेघमंडळांतून विजेचा प्रचंड प्रभा-तरल झोत तळपूं लागला, तर त्यांची किती अनुकंपनीय अवस्था होईल ? नेत्रशक्ति स्वतःच्या तेजांत विलीन करून टाकणाऱ्या त्या सघन पण तरल तेजस्वितेचें मूल्य-मापन तरी, त्या बिचाऱ्यांना करतां येणें

शक्य आहे काय ? आणि असें साहस करण्याचें त्यांनीं ठरविलेंच तर, त्यांचीं मूल्य-मापनाचीं साधनें तरी कोणतीं राहातील ? मेणबत्त्यांच्या क्षुद्र प्रकाशकणांना वेंचणाऱ्या तुटपुंज्या साधनांनींच ना ते त्या ज्योतिर्मयतेचें मूल्य-मापन करूं धजणार ? आणि मग त्यांच्या राणा भीमदेवी तर्कटांना किती मोल देतां येण्यासारखें राहील ? सर्वसामान्यपणें ज्या प्रकारच्या साहित्याचा व त्यामुळेंच साहित्य-समीक्षक-पद्धतींचा हल्लीं सुळसुळाट झालेला आहे त्या पद्धतींनीं व त्या दृष्टिकोनांतून स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर यांच्या वाङ्मयाचें विश्लेषण करूं धजणें, माझ्या मतें इतकेंच हास्यापद व मोलाचें आहे. कै. देवल अथवा अण्णा किर्लोस्करांपासून तर प्रल्हादराव अत्र्यांपर्यंतच्या मराठी नाटककारांचा कृति-संभार समोर रचून, त्या अनुरोधानें सावरकरांच्या नाट्यवाङ्मयाचें समीक्षण करूं पाहणें, केशवसुतांच्या तुतारीपासून तर केशवकुमारांचीं झेंडूचीं फुलें व काळेल्यांच्या कवितांपर्यंतचीं आधुनिक मराठी कवींचीं बाडें एकत्र आणून त्यांच्या अनुषंगानें सावरकरांच्या कवितेचें रसग्रहण करूं इच्छिणें, प्रा. फडके आदि कादंबरीकारांच्या अपेक्षेनें कादंबरीकार म्हणून सावरकरांची योग्यता ठरवूं धजणें, व प्रचलित प्रबंधकारांच्या तुलनेंत प्रबंधकार म्हणून सावरकरांचें मूल्य-मापन करण्याचें अवसान आणणें, हें " भवेदद्यश्वो वा किमिह बहुना पापिनि कलौ। घटानां निर्मातुः त्रिभुवनविधातुश्च कलहः ॥ " यासारखेंच होणार आहे. या सर्व साहित्यिकांचा अपमान करावा अथवा त्यांना हीन लेखावें असा माझा उद्देश असल्याचा गैरसमज कोणींही करून घेऊं नये. यांपैकीं कांहींच्या कृतींनीं माझ्या मनाची घेतलेली पकड अतिशय विलक्षण आहे. पण सावरकरसाहित्याची जात सर्वसामान्य साहित्याहून अत्यंत विभिन्न असल्यामुळें, प्रचलित समीक्षणपद्धतींनीं त्याचें मूल्यमापन करतां येत नाहीं इतकेंच काय तें मला निदर्शनास आणावयाचें आहे. जसें व्यक्तित्वाच्या तसेंच वाङ्मयगुणांच्याही दृष्टीनें आजचे सर्वसामान्य साहित्यिक शारदेच्या मंगलायतनांत सावरकरांपासून तिसऱ्या, चवथ्या व पांचव्या श्रेणींतच बसतात. **महान् घटना घडवून आणण्यासाठींच नियतिचक्रांत जिचा संभव झाला अशा विभूतीचें उत्स्फूर्त शब्दरूप भावाविष्करण म्हणजे सावरकरसाहित्य होय.** सावरकर-साहित्य हें एक प्रकारे महाकवि भवभूतीनें उत्तररामचरित्रांत आद्यऋषि म्हणून ज्यांचा नम्रतापूर्वक उल्लेख केलेला आहे त्यांच्या साहित्याच्या जातींत समाविष्ट होण्याच्या योग्यतेचें आहे. म्हणून भवभूतीच्या शब्दांत सांगावयाचें तर " लौकिक-साधूंच्या " वाङ्मयाशीं त्या साहित्यप्रकाराचा संबंध नाहीं.

# नियति आणि विभूति

अर्धवट मार्क्सवादी कांहींही म्हणोत; पण नेहमींच परिस्थितीच्या सांच्यांतून व्यक्ति तयार होत नसून केव्हां केव्हां महान् व्यक्तित्वच आपल्या अनाकलनीय अंतःसामर्थ्यानें परिस्थितीचें जनक बनतें. इतिहासाचें सूक्ष्म अवलोकन व वर्तमान जगाचें निरीक्षण केलें तर " राजा कालस्य कारणम् " हा भारतीय समाजशास्त्राचा सिद्धांतच इतिहासाचा व सामाजिक घटनांचा नीट उलगडा करून दाखवितो असें आढळून येईल. या सिद्धांताचें सार असें आहे कीं, एरवीं, परिस्थितीच्या क्रमानुसार ज्या घटना घडून यावयास कांहीं शतकांचा अवधि लागावा त्या, विशिष्ट व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावानें सबंध जगाची उलथापालथ करून, अत्यंत अल्पावधींत घडून आल्याचें इतिहासांत आढळून येत असल्यामुळें, व वर्तमान युगाचे अनुभवही त्याच्या विरोधी नसल्यामुळें, विशिष्ट व्यक्तिमत्त्व हेंच त्या घटनेचें खरें कारण असतें. भगवान् श्रीकृष्णादि अवतार, आद्य शंकराचार्य, श्रीज्ञानेश्वर, समर्थ, छत्रपति शिवाजी, भगवान् श्रीरामकृष्ण, कॉम्रेड लेनिन्, अॅडॉल्फ हिटलर, लोकमान्य टिळक या विभूतींच्या जीवनक्रमानेंच त्या त्या राष्ट्रांच्या इतिहासपृष्ठांवर सोन्याच्या अक्षरांनीं लिहून ठेवण्याच्या योग्यतेचा मजकूर उत्पन्न झालेला आहे. एरवीं, परिस्थितीनें तो उत्पन्न झालाच नसता असें नाहीं; पण त्यासाठीं पुष्कळ कालावधि लोटावा लागून, **क्रांति** हें नांव मिळण्यास आवश्यक त्या आकस्मिक स्थित्यंतराचें व नवीन घटनेच्या अकस्मात् उदयाचें स्वरूप त्याला निश्चित राहिलें नसतें. आणि त्यामुळेंच बहुधा इतिहासलेखनाचा तो विषयही होऊं शकला नसता.

असो; या जातीच्या महान् व्यक्तित्वालाच द्रष्टे, विभूति, अथवा महाकवि भवभूतीच्या परिभाषेंत आद्य ऋषि असें नांव दिलेलें आहे. त्यांच्या प्रतिभा-वीणेचा मधुर झंकार माधुर्यमय नादलहरींनीं मानवी जीवनाचे सांदीकोंपरे प्रथम निनादवीत असतो; त्यांच्या हृदयोद्गारांना काव्याचें शब्दस्वरूप येऊन त्यामुळें वाङ्मयोद्यान फुलणें ही त्यानंतर निदर्शनास येणारी अनुगत प्रतिकृति आहे इतकेंच. त्यांच्या उत्स्फूर्त उद्गारांतील ओजाच्या दीप्तीनें अन्याय्य आक्रमणांचा निःपात करण्याचें सामर्थ्य मानवी समाजांत प्रथम प्रगट होतें, व साहित्यपरिभाषेंतील ओजोगुणानें वाङ्मयप्रांत नंतर रसरसतो. तो त्याचा अनुकार आहे इतकेंच. त्यांचा प्रसादमय आविष्कार समता, प्रेम व बंधुत्व यांची प्रसन्नता ओततो प्रथम मानवी व्यवहारांत; प्रसादगुणानें वाङ्मयवाटिका फुलते मागाहून. तें एक सहज अनुरणन

आहे इतकेंच. त्यांचें साहित्य याचा वास्तविक अर्थ या आविष्काराचें शब्दरूप आवरण इतकाच आहे. आणि म्हणून ओज, प्रसाद व माधुर्य या सर्वसंमत अथवा कांहीं मर्मज्ञांनीं वर्णन केलेल्या दहा वाङ्मयगुणांच्या कसोटीवर त्यांच्या वाङ्मयाचें मूल्यमापन करणें हा विपर्यास होईल. आत्मप्रतीति, उदात्तता व सामर्थ्य हे त्यांच्या साहित्याचे प्रकृतिज गुण होत. व या कसोटीवरच त्यांच्या वाङ्मयाचें समीक्षण केलें पाहिजे. Rishi Bunkimchandra या आपल्या प्रख्यात लघुनिबंधांत योगीन्द्र श्रीअरविंद घोष यांनीं या जातीच्या साहित्याचें व साहित्यिकाचें जें यथार्थ विश्लेषण केलें आहे त्यांतला, या लेखाच्या प्रारंभीं उद्धृत केलेला उतारा, नीट मनन केल्यास ही गोष्ट ध्यानांत येते.

लग्नमुंजीच्या श्रीमंती थाटांतील मिरवणुकींत ठुमकत मिरवणाऱ्या घोड्यांना उच्चैःश्रव्याशीं नातें जोडण्याचा जितका हक्क; पावसाळी ओहळांना मंदाकिनीच्या प्रवाहाशीं स्पर्धा करण्याचा जितका अधिकार; अथवा वाऱ्याच्या झुळकीनें आपल्या पृष्ठभागावर उचंबळणाऱ्या लाटांकडे पाहून सागराच्या प्रलयंकर तांडवाच्या तुलनेंत बसण्याचा सरोवराचा मान जितका युक्त; इतकाच, या जातीच्या साहित्याशीं व साहित्यिकांशीं बरोबरीच्या नात्यानें हातमिळवणी करण्याचा साहित्याच्या तथाकथित वारसदारांना वास्तविक हक्क आहे. अर्थातच मी हें सापेक्षतेनें म्हणत आहें, व सापेक्षतेची ही मर्यादा न ओलांडण्यांतच साहित्यिकांचें महत्त्व—त्यांचा मान आहे. भामतिप्रस्थानाचे जनक, सर्वतंत्रस्वतंत्रप्रज्ञ वाचस्पति मिश्र व खंडन-खंडखाद्याचे प्रतिभाशाली निर्माते श्रीहर्ष यांची भारतीय तत्त्वज्ञानांतील कामगिरी अत्यंत मोलाची असली तरी आद्य शंकराचार्यांच्या प्रस्थानत्रयीवरील प्रसन्नगंभीर भाष्याला ' रथ्योदकमिव गंगाप्रवाहपातः पवित्रयति ' असें म्हणून त्यांनीं केलेलें सप्रश्रय अभिवादनच त्यांचा गौरव वाढविण्याला कारणीभूत झालेलें आहे. पैगम्बरवासी सर मुहम्मद इक़्बलांच्या " तेग़ों के साये में हम पल कर जवाँ हुए हैं । ख़ंजर हिलाल का है क़ौमी निशाँ हमारा ॥ ...... अय आबे रूदे गंगा वह दिन है याद तुझ को। उतरा तेरे किनारे जब कारवाँ हमारा ॥ " या ओळींतून व्यक्त होणारा ओजोगुण कोण्याही मर्मज्ञाचे डोळे निस्संशय भारावून टाकील. पण रानोमाळ भटकणाऱ्या रानटी टोळ्यांना जगज्जेतृत्वाच्या आकांक्षेनें उन्मत्त बनवून अर्ध्या अधिक जगाला त्यांच्या घोड्यांच्या टापांखालीं ठेंचून काढावयास कारणीभूत झालेल्या पैगंबर महम्मदाच्या अपत्यांच्या

दीप्तीशीं स्पर्धा करायला इक्बाल कांहीं धजले नसते. मोरोपंत आपल्या कृतींच्या मापानें ज्ञानेश्वर-रामदास या युगद्रष्टयांच्या वाङ्मयाचें मोल करण्याच्या भानगडींत न पडतां त्यांना अभिवादन करून मोकळे झाले; व कालिदासानें व्यास-वाल्मिकींच्या प्रतिभेशीं धडक न घेतां " मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवाऽस्ति मे गतिः " या विनयोद्गारांनीं आपली लीनता प्रगट केली; यांत त्या कविश्रेष्ठाचा व कविकुलगुरूचा गौरव सापेक्षतेच्या सोनेरी कोंदणामुळें उलटा वाढलेलाच आहे. शेक्सपियरला यूरपनें डोक्यावर घेतलें तरी ख्रिस्ताच्या संदेशाशीं कांहीं त्याची कोणी तुलना करणार नाहीं. तात्पर्य, **आद्यऋषिवाङ्मय** व **लौकिकसाधुवाङ्मय** या भवभूतीच्या परिभाषेनुरूप **द्रष्टयांचें साहित्य** व **वाङ्मयोपासकांचें साहित्य** असे साहित्याचे दोन प्रकार जगाच्या वाङ्मय-धनाकडे एकवार ओझरती नजर टाकली तर सर्वत्र आढळून येतात आणि त्यांचें स्वरूप मूलतःच विभिन्न असल्यामुळें त्यांचें समीक्षण करण्याच्या पद्धतीही सापेक्षतेच्या मर्यादेच्या अनुरोधानें भिन्नभिन्नच अस्तित्वांत आल्या पाहिजेत. समीक्षणाच्या प्रचलित पद्धतीनें, द्रष्टयांच्या वाङ्मयाचें समीक्षण व रसग्रहण करूं धजणें हें असूर्यंपश्या नीरेच्या आस्वादावरून अमृताच्या माधुर्याची कल्पना करण्यासारखें होईल.

मी सावरकरांना ख्रिस्त अगर श्रीकृष्ण समजत नाहीं; जगानें त्यांना तसें समजावें असा माझा आग्रह नाहीं. मीं सावरकरांना पैगंबर अगर शंकराचार्यांच्या नात्यानें अभिवादन केलेलें नाहीं; लोकांनीं तें तसें करावें अशी माझी अपेक्षा नाहीं. मीं व्यास—वाल्मीकि म्हणून सावरकरांची कधीं मानसिक पूजा बांधलेली नाहीं; लोकांनीं ती तशी बांधावी हें माझें अभिलषित नाहीं. मी आजवर ज्ञानेश्वर व रामदासांच्या अपेक्षेनें सावरकरांचा जयघोष केलेला नाहीं; कोणीं तसा तो करावा हें माझें वांच्छित नाहीं. या महान् विभूतींचा उल्लेख व्यक्तित्वाचे सागर म्हणून करावयाचा झाला तर त्या मानानें स्वातंत्र्यवीर सावरकर कदाचित् पुष्करणीही ठरत असतील. पण आजच्या साहित्यमतंगजांच्या दृष्टिपथांत मला इतकेंच आणून द्यावयाचें आहे कीं, सावरकर-साहित्याची जात व या द्रष्टयांच्या साहित्याची जात एक आहे. लौकिक साहित्याशीं त्याचा संबंध नाहीं. द्रष्टयाचें शब्दरूप-भावाविष्करण हें त्याचें यथार्थ स्वरूप असल्यामुळें त्या नात्यानेंच त्याचें समीक्षण केलें पाहिजे.

## व्यक्ति आणि वाङ्मय

काव्याचे अथवा वाङ्मयाचे ( १ ) भावाविष्करणात्मक व ( २ ) कल्पनाविष्करणात्मक–असे दोन मुख्य प्रकार सर्वच साहित्यिकांच्या परिचयाचे आहेत. (अंतरंगांतल्या तीव्र अनुभूतीनें शब्दाचें स्वरूप घेणें हें भावाविष्करणात्मक वाङ्मयाचें स्वरूप आहे; तर वस्तुस्थितींतल्या विसदृश पदार्थांतील सामान्य सादृश्यात्मक सूत्राचा उपयोग करून घेऊन वैचित्र्य निर्माण करणें हें कल्पनाविष्करणात्मक काव्याचें स्वरूप आहे. आरोपण हा ह्या वैचित्र्याचा आत्मा असतो.) व म्हणूनच कल्पनाविष्करणात्मक काव्यांत अलंकारांना प्राधान्य असतें. अलंकारांच्या साहित्यांतील फुगलेल्या संख्येकडे पाहिलें तर आरोपणाच्या विविध प्रकारांवरूनच त्याचे इतके भेद असल्याचें आढळून येतें. मर्मस्पर्शी निरीक्षणशक्ति, विविध अनुभवांचा सांठा, तीव्र स्मरणशक्ति, तसेंच ग्रहणशक्तीची भव्यता, सूक्ष्मता व सुपूर्तता यांच्या सांच्यांतून अभिजात कल्पनाविष्करणात्मक काव्याच्या मूर्तींची घडण होते. पण आल्हादैकमयता हें काव्याचें स्वरूप असल्यामुळें तेजस्वी रत्नहाराला जशी रमणीच्या कांतिमान् उरोभागाची, तशीच कल्पनेच्या सोनेरी पाण्याच्या प्रवाहाला इंद्रनीलमण्यांसारख्या मोहक नि पाणीदार शब्दांच्या सारणीचीही आवश्यकता असते. साहित्यशास्त्रांत रीति म्हणून उल्लेखिलेल्या या मणिकांचनसंयोगापासून जें तिसरेंच एक माधुर्याचें स्पंदन हृदयाला चाटून जातें त्याचें नांव गुण. अर्थातच त्या त्या रसाच्या अपेक्षेनें सारणीची, प्रवाहाची आणि स्पंदनाची चमक वेगवेगळें रूप धारण करीत असल्यामुळें आस्वाद्यमानतेच्या अथवा खुमारीच्या अपेक्षेनें त्याचे वेगवेगळे नियम अस्तित्वांत आले आहेत. भावाविष्करणात्मक काव्यांत अंतरंगांतल्या अनुभूतीच्या उत्कटतेलाच प्राधान्य असल्यामुळें या सर्व प्रकारांना स्वभावतःच गौणत्व आहे. खरें म्हणजे उत्कट भाव–भावना शब्दांच्या रूपानें ओसंडूं लागणें हेंच काव्याचें स्वरूप होय. वर वर्णिलेलें कल्पनाविष्करण ह्या भावभावनांना अधिकच उत्कटतेनें प्रतिबिंबविण्यास साहाय्यक होतें इतकेंच. अंतःकरणाच्या वृत्ति आन्दोलित करून सहभावनेच्या स्वरूपांत आपले उत्कट भाव दुसऱ्या हृदयावर चित्रित करण्यास वातावरणाचें साहाय्य आवश्यक असल्यानें असें अनुकूल वातावरण कल्पनाविष्करणात्मकता निर्माण करते. तात्पर्य, " कृताऽभ्यंगस्नाना कनकमणिभूषाविरहिता। विराजे सिंदूरें धवल वसनें भूपवनिता " अशा थाटाच्या अलंकार-विरहित राजरमणीप्रमाणें भावाविष्करणात्मक कवितेचें सौंदर्य अंगचेंच असलें व त्यानेंच उलटी

अलंकारांना शोभा येणार असली तरी अभिजात प्रतिभेच्या महाकवींच्या मानसकन्येचा शारदेच्या मंगलायतनांतील पदन्यास हा कण्वाश्रमांत वावरणाऱ्या शकुंतलेसारखा वल्कलांच्या लक्तरांसहितच असला पाहिजे असें नाहीं. उलट दुष्यंताच्या राजसभेंत पाऊल टाकणाऱ्या प्रसाधनमंडित शकुंतलेसारखा, देवेन्द्राच्या सभेंत प्रगट होणाऱ्या उर्वशीसारखा अथवा स्वयंवरमंडपांत प्रवेश करणाऱ्या दमयन्तीसारखा तो ऐश्वर्यपूर्ण व वैभवशाली असला तर बिघडलें कुठें ? किंबहुना, चित्‌शक्तीच्या पहिल्या स्फुरणांतून ज्याप्रमाणें डोक्यावर आकाशाचें मखमली आच्छादन असलेलें आणि कांतिमान् चांदण्याच्या मोत्यांची वेलबुट्टी काढलेलें जडावाचें छत्र घेऊन, समोर चंद्रज्योती पाजळीतच सृष्टिदेवतेचा वैभवपूर्ण आविष्कार झाला; त्याचप्रमाणें महाकवीच्या अभिजात प्रतिभेंतून होणारा काव्यदेवतेचा आविष्कारही वैभवपूर्णच असतो. अंतःकरणाच्या पिळवटून निघण्यावर जसा उत्कटभाव त्याचप्रमाणें ग्रहणशक्तीच्या भव्यतेवर, सुसूक्ष्मतेवर, सुपूर्ततेवर व निरीक्षणाच्या विविधतेवर व क्षमतेवर कल्पनाविष्करण अवलंबित असतें आणि अशी सुपूर्तता हाच महाकवीच्या प्रतिभेचा विशेष होय.

शब्द ही भारतीय तत्त्वज्ञानांत एक महान् शक्ति कल्पिलेली आहे. आणि निर्माण-क्षमता हें त्या शक्तीचें स्वरूप होय. शरीर व मन हें एक यंत्र असून त्याच्या क्षमतेवर त्यांतून बाहेर पडणाऱ्या नादाची, ध्वनीची अथवा शब्दाची ही निर्माणक्षमता अवलंबून असते. मनोरूपी यंत्राची उत्कट प्रेरणा ही जितकी उदात्त व आत्म-प्रतीतीची असेल तितकें समष्टीच्या अंतःकरणावर ताबा चालविण्याचें सामर्थ्य तिच्यांत निर्माण होऊं लागतें. ही मनाची प्रेरणा स्वतःच्या शरीरावर ताबा चालवीत असल्याचा अनुभव सर्वांनाच आहे. पण समष्टीच्या अंतःकरणाला प्रेरणेचे धक्के देण्याचें सामर्थ्य व शाश्वत सत्यावरील भ्रमपटलाची जवनिका ओढून काढण्याचें सामर्थ्य शब्दांत उत्पन्न व्हावयासाठीं ज्या शरीररूपी यंत्रांतून हा शब्द बाहेर पडावयाचा असेल तें शरीर, बाहेर पडणारा शब्द ज्या उदात्त ध्येयाचा प्रतिनिधिभूत असेल त्या ध्येयासाठीं, लोखंडाचे चणे खाण्याचे कष्ट सहन केलेलें असलें पाहिजे. याचेंच नांव तपस्या. सारंगीची तार जितकी ढिली तितकी बदसूर वाजूं लागून मैफलीचा विरस होतो. एकतानतेचें माधुर्यमय नादब्रह्म उभें करावयास सूर आणि सारंगी यांचा जसा एकीभाव व्हावा लागतो तसा उदात्त व आत्मप्रतीतीच्या प्रेरणेनें भारावलेलं मन व क्रियात्मक शरीर यांचा एकीभाव झाल्यावरच, त्यांतूनच निघणाऱ्या

शब्दांत समष्टिजीवनाच्या ध्येयदर्शी प्रेरणेचें व शाश्वत सत्याच्या प्रतीतीचें सामर्थ्य निर्माण होतें. अशा शब्दालाच महाकवि भवभूति "वाचमर्थोऽनुधावति" असें गौरवून त्याच्या जनकाला "आद्य ऋषि" म्हणून गौरवितो. हृदयांत स्फुरलेल्या ह्या उदात्त व आत्मप्रतीतीनें रसरसलेल्या उत्कट प्रेरणांचा आवेग स्पष्ट शब्दांच्या थेंबांनीं व्यक्त होण्याइतपत ज्या वेळीं संयतच राहूं शकत नाहीं तेव्हां तो स्वयंसिद्धपणेंच सुराच्या श्रुतिरम्य धाराप्रवाहांत वाहूं लागतो. त्यावेळीं या शब्दाला काव्याचें स्वरूप येतें. ह्यालाच लेखाच्या प्रारंभीं दिलेल्या उताऱ्यांत श्री. अरविन्द घोष वेगळ्या पद्धतीनें 'मंत्र' व त्याच्या निर्माणकर्त्याला "Seer" (द्रष्टा) म्हणून संबोधितात. हें द्रष्ट्यांचें उत्स्फूर्त शब्दरूप भावाविष्करण असल्यामुळें उदात्तता, सामर्थ्य व आत्मप्रतीति यांच्या निकषावरच या जातीच्या काव्याची समीक्षा होते.

महाकवीच्या, द्रष्ट्याच्या अथवा 'आद्य ऋषी'च्या ह्या मानसकन्येचें स्वरूप आतांपर्यंत वर्णन केल्याप्रमाणें नारायणसंभवा उर्वशीसारखें अथवा शामसुंदराच्या वंशीसारखें नुसतें भावपूर्ण, मधुर, प्रेरणागर्भ व मोहमयच आहे असें मात्र नाहीं. एकाच प्रकाशमयी चित्‌शक्तीचें जसें माधुर्यभावमयी राधेंत, तसेंच हातांत नरकपाल घेऊन, रुधिरपिपासेनें हातांतील खड्गानें स्वतःचेंच मस्तक कापून धो धो स्रवणाऱ्या त्या रुधिरप्रवाहानें सर्वांग माखून घेऊन रणतांडव करीत सुटणाऱ्या छिन्नमुंडा चंडिकेंतही उपासकांना दर्शन होतें. तसेंच ह्या काव्यदेवतेचेंही विकराल स्वरूप समष्टिजीवनाच्या त्या त्या गरजेच्या वेळीं प्रगट झाल्यावांचून राहात नाहीं. चिर प्रवासानंतर द्वारकेंत शिरतांना सुहृदांसाठीं वाजणारा भगवान् श्रीकृष्णाचा शंख ज्याप्रमाणें रुक्मिणीच्या हृदयाची बाग नादाच्या मधुर निर्झरानें फुलवूं शकत असे; त्याचप्रमाणें कुरुक्षेत्रावर वावरणाऱ्या योद्ध्यांच्या हृदयाचें पाणी करीत कर्णेंद्रियांच्या चिंध्या उडवीत त्याच शंखाचा ध्वनि संहारदेवतेचें भीषण गर्जितही ऐकवूं शकत असे. तात्पर्य, महाकवीच्या काव्यांत कवितेचें जसें रम्य तसेंच रुद्रदर्शनही सारख्याच उत्कटतेनें होत असतें, हा त्या काव्याचा आणखी एक विशेष होय.

वर केलेल्या विवेचनांतून शब्दशक्तीसंबंधींच्या उल्लेखावरून व्यक्तित्वाचे सारे विशेष अशा कवींच्या वाङ्मयांत जागजागीं प्रभावितपणें आढळतात, हें कांहीं मुद्दाम सांगायलाच पाहिजे असें नाहीं.

आतांपर्यंत महाकवीच्या अथवा द्रष्ट्याच्या काव्याचें जें तात्त्विक विश्लेषण केलें, त्याचीं सर्व लक्षणें स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर यांच्या काव्यांत आढळतात, असें त्यांचें काव्यवाङ्मय वरवर चाळून पाहिलें तरी आढळून येतें. त्यांच्या मानसकन्यकेचा शारदेच्या मंगलायतनांतला पदन्यास इन्द्रसभेंत होणाऱ्या उर्वशीच्या पदन्यासासारखा जसा भावगंभीर व वैभवपूर्ण रणत्कारी आहे तसाच तिचा संभवही उर्वशीसारखाच "अभीद्धात्तपसोऽध्यजायत" "प्रज्वलिततपांपासूनच" झालेला आहे. प्रख्यात 'कमलें'तील

छोटेंसें स्फटिकांचें हें अष्टपैलु मधें खुले
लीलासर सदा पूर्ण स्वादु शीतलशा जलें
कारंजें शतधारांचें कासारांत तया उडे
नृत्यबिंदुवरी त्याच्या तेजोबिंब यदा पडे
तदा गमे असा लीलासरा उडत येत या
थवा इंद्रधनुष्याच्या पिलांचा विहरावया
जलार्धमग्ननाला ह्या शोभती नलिनी तशा
शोभती लाजत्या गोपी यमुनेंत तईं जशा
हृच्चोर पोर नंदाचा वसनें हरि ज्या क्षणा
आणि त्या प्रिय पाप्याच्या हट्टी तुष्ट करूं मना
शक्य तों नग्न तन्वंगें करूनि वरती जला
' दे ना रे हरि वस्त्रें तीं ' गोपी याचिति आकुला
नायकेचि परी खोटा ' या तशाच ' म्हणे ' वरी '
छंदें त्या कीं मृगी तैशा होत कर्षित सुंदरी
आल्या तीरीं अहा तीरावरी नवनवें तधीं
लावण्याचे पुटांतूनी पुट दिव्य पदोपदीं

* * *

प्रभातिंच्या हिमें कांती घनीभवन घे नवें
चकाकती फुलें ना हीं, चांदण्याचे रवे रवे

* * *

ह्या फुला करुनी लागू त्या फुलांशिं परोपरी
हिचें चुंबन दे त्याशीं त्याचें देत हिला अली

दयितादयितांमाजी सुमलोकांतल्या पहा
घाली खेपा मधावारी मदनाचा दलाल हा

*       *       *

नौकेंत कौमुदीच्या ही नटली कितीदां तरी
बाग योजनगंधा त्या वनदेवपराशरीं

*       *       *

आणि हे सोनचाफ्या तू शिकलासि तरी कुठें
ही दिव्य किमया ? आम्हां स्वयंमन्य नरा जिथें
रुप्याचेंही करायासी जड स्वर्ण न साधतें
ओल्या मातींत सूर्याचीं किरणें पिळुनी तिथें
मृदुचेतन सोन्याचीं स्वर्णचंपक हीं फुलें
सुगंधी तुज पाहोनी निर्मितां मन हें भुले ! '

*       *       *

फुलें ? अहा फुलें ना तीं उद्यानीं विहरावया
रात्रींत चोरुनी येतां अप्सरा धरिलें जयां
नोंद त्या दिव्य पाप्यांची ठेवूं जाइवरी असें
चुंबनाचेचि त्यांच्या घे देवी द्वारप हे ठसे

*       *       *

दलें सुलोल, हीं सारीं दाटतां मिसळोनि ते
अव्यवस्थितशी शोभा बघूनि मनिं भासतें
कालिंदीपुलिनामाजी जयांहीं उपभोगिला
यथेच्छ वनमालीसी; पूर्त, तृप्त, सुशीतला
भुक्तकामा, रतिश्रांता, आत्मा एक जयां हरी-
सखी म्हणूनि ज्या झाल्या, समतृप्त परस्परीं
विगतेर्ष्या म्हणूनीया जातां वल्लभ त्याच का
तशा शून्यमना मार्गीं उभ्या ह्या व्रजगोपिका ?

हें बागेचें दिव्योन्मादी वर्णन, अथवाः—

चंद्रिकेच्या प्रभाताच्या मिश्रणांत उषा जशी
कैशोर यौवनामाजी शोभे ती सुदती तशी
पूजेसि जैं बसे भोंती हीं रचूनि दलें फुलें
कल्पनांच्यामधें जैशी कविताच तशी खुले
सुरम्य मखरामाजी रमणी मग जैं बसे
श्लोकांत कालिदासाच्या उपमाच तशी दिसे
हास्यीं वामास्वनांमाजी त्या युवस्वन जाहले
स्वरांच्या सनयांच्या कीं जसे मंजुळ चौघडे
त्या ऋचा, मंत्रची ते कीं; नवीन अभिषेचिती
प्रेमसिंहासनीं सम्राट् काम तो आणि ती रती
ह्या खुमासदार उपमा,
आणि पुष्पवतीचें त्या मन शंकित जाहलें
टाकितां चूळ येताती बाले कां बकुला फुलें ?
आणि लज्जितही किंचित् कीं ऋतूंत सुवासिनी
जशा पुष्पलता तैशा न कां पुष्पवती जनीं
हे मुग्धमधुर भावाचे संदेह,
तोंच सर्सरलें कांहीं कुंजांतूनि पहा पहा
कोण तो कमले येई चोर ओळखिचाच हा
आला सांभाळ आलाची थांबरे क्षणची तरी
असावधावरी घाला रीत ही न तुझी बरी
धरिलाचि परी पक्षी ! वार्द्धक्यें आजि आंधळी
वदतीच नभोवाणी ' धर्मयुद्ध न हें ' तरी
चोरट्या कटिला गुंफी कांपता कर तो झणीं
लाजऱ्या लागती गाला ओठ लाजत त्याहुनी
साचीकृताननना, लज्जाचित्र, हृद्य, अशा तईं
प्रियेच्या पहिल्याची तो चुंबनासि युवा पिई

* * *

पुष्पमाला गुढीसाठीं होती गुंफित ती जिथें
उद्यानांत युवा पाही गवाक्षांतुनि तो तिथें

पाही अले, जपूनी कीं ही मनोभवपंजरीं
फसवो न वसंताची तुला मोहक मंजिरी
आणि धीर सुटे सारा आजि निश्चियलें मनें
तिच्याशीं पहिलेंची तें लज्जाव्याकुल बोलणें
आईशी चुकवोनीया धीर एकवटूनिया
गनीमी धरसोडीनें येत जात टपूनिया
आला ! आला तिच्या पार्श्वीं येतांचि परि सन्मुखीं
नीट आला तसा गेला शब्दही निघतां न कीं !
जाणेंचि परि ते घाली मूक प्रश्न तिला अणी
पृच्छे त्या अश्रुता ' हो ! हो ! ' उत्तरें उठलीं मनीं
उठे वरी, बघे खालीं, रंगे गाल, सुई गळे
सुमासम गमे कांहीं हृदांत तिज बोचलें !

ह्या मधुमधुर भावांचे कल्लोळ उठविणाऱ्या गोडगोड स्वभावोक्ति वाचल्यानंतर इंद्रनीलाच्या सारणींतून वाहणाऱ्या ह्या कल्पनारूपी सोन्याच्या पाण्याच्या प्रवाहाची गंगोत्री एखाद्या भोजाच्या दरबारांतल्या कविकुलगुरूची प्रतिभा एखाद्या हर्षानें ' हेम्नो भारशतानि ' समर्पून गौरविलेल्या सुखोन्मत्त बाणाची प्रतिभा अथवा एखाद्या वैभवशाली समुद्रगुप्ताच्या राजसभेंतल्या महाकवीची स्फूर्ति असावी असें वाटूं लागतें. पण इंद्रधनुष्याच्या पिलांचा कमलेच्या बागेंतल्या कारंजाभोंवतीं बागडणारा थवा कल्पनाचक्षूंनीं निरखण्यांत धुंद झालेला हा महाकवि प्रत्यक्षांत अंदमानच्या नृशंसक गुहांच्या अंधेरींत तेलाच्या घाण्याला जुंपला जाऊन केवळ कवित्वाच्या अपराधावरून सप्ताहचे सप्ताह लोहशृंखलांनीं जखडून टांगला गेलेला असे, याची कोणी कल्पना तरी करूं शकेल काय ? **' कमला ' हें सावरकरांचें काव्य–हें केवळ एक काव्य–जरी त्यांच्या प्रतिभेंतून स्फुरतें तरी ते महाकवि ठरावे इतक्या योग्यतेचें आहे.** इतकें भावपूर्ण, इतकें मधुर, इतकें प्रेरणागर्भ, व्यक्तित्वाचा ठसा इतक्या उत्कटतेनें प्रतिबिंबित करणारें, इतकें कल्पनाविष्करणात्मक, इतकें स्वभावरेखनसुपूर्त, इतकें ध्वनिपूर्ण, उदात्तता आणि आत्मप्रतीतीनें इतकें रसरसलेलें आणि म्हणूनच पण्डितराज जगन्नाथाच्या काव्यव्याख्येप्रमाणें " लोकोत्तराल्हादजनकज्ञानगोचरता हि रमणीयता " ज्याच्यांत पूर्णत्वानें सांठविलेली असें; आणि तेंही कोकिळेचा गळा पिचून आवळला तरी

त्यांतून मधुर पंचमाचाच तारध्वनि निघावा त्याप्रमाणें धैर्यपूर्ण हृदयांनाही आत्महत्येची प्रबळ संवेदना उत्पन्न करणाऱ्या महान् नृशंस आपदांच्या चिमटींत शरीर व मन पिचून-पिळून निघत असतां स्फुरलेलें काव्य भारतीय काव्यवाटिकेंत तरी दुसरें नाहीं.

तुषारमय धारांच्या झाऱ्यांहीं सुजलांत ती
शुचिस्मिता स्वयें न्हाणी वेली पुष्पलतांप्रती
पुशी मल्मलिनें त्यांचीं पानें साहस ना परी
मऊ मल्मलिनेंही ती पुसाया कुसुमें करी
पाकळ्यांनीं गुलाबांच्या पुशी अन्य सुमें अणी
ओठांच्या पाकळ्यांहीं ती गुलाब नव चुंबुनी

हें स्त्रीहृदयाच्या कोमलतेचें ध्वनिपूर्ण वर्णन—

कीं घे माहेरिंही जातां पाय मागुति मागुती
मायशी जों तिची सासू असें न समजाविती
' उगी उगी मुली ! येशी तों तुझी लतिका फुलें
तुझ्याच मानुनी ठायीं प्रतिपाळिन मी बरें '

हें किशोर पण गोड अल्लडतेचें ध्वनिपूर्ण चित्रण आणि

ऋजुत्व, शुचिता, दैवी सात्त्विकत्वहि कां हवें
त्या मनाचें पुसाया ! त्या भ्रूकौटिल्यहि कां शिवे ?
शांत तद्दृष्टिसी सारी सृष्टि शांतिमया गमे
रूपीं यौवन तोंही ती बालताच हृदीं रमे
रूपीं, कुलीं, वयें होता रुचला पति जो तिनें
वेशींत यौवनाच्या कीं विशींत शिरला कुठें

* * *

देवमूर्ति तशी जी कीं पूजनार्थेचि निर्मिली
चंद्रलेखा तशी जावी जी दुरूनचि प्यायिली
मनींच जपली जावी गायित्रीच अशाहुनी
काय भाव दुजा यावा पतिमूर्तिस पाहुनी

हें निर्व्याज मनाच्या विषयस्पर्शरहित स्थितीचें भावपूर्ण रेखन, नवोदित यौवनसुलभ मानसिक व शारीरिक स्थित्यंतरांचें अथवा अननुभूत पण मधुर अशा अर्धस्फुट आकर्षणाचें—

वेणी घालावया सासू हौसेनें मग जैं बसे
कांहीं चिंतितची तों ही मधें खुदकनी हंसे
'हंससी कमले कां तें' 'नाहीं एक पडे मशी
स्वप्न काल मजेचेंची, माझी ती नलिनी जशी
सराच्या उजव्या बाजू नाहीं काय ? जिच्या कळ्या
पहिल्याच बहाराच्या झाल्याहेति फुलावया
ती आणि मी जशा गेलों शोधूं तत्प्रियसा अली
उषःकालाचिया एका बसूनि झुळकेवरी
गेलों गात 'तुझीची ज्या वाट पाहत राहिल्या
ये, शिलीमुख ! ये स्पर्शें फुलीव चल ह्या कळ्या
आला लुब्ध अलीही तों ! सोडुनी नलिनी परी
मेला माझ्याचि ओठाला दंश येउनि हो करी'

*          *          *

वेणी होतांच दे सासू जी पाठीस तया दिशीं
थाप जी आइच्या लागे चुंबनाहुनि गोडशी

*          *          *

न्हातां एकासनीं ऐसें किती चोरियलीं तरी
अंगें स्वयेंचि अंगांसी लागताति परस्परीं
मऊ मऊ असें कांहीं मऊ तें सुख लागलें
धरीच वक्षिं तो तीतें, झोंक जाउनिया बरें
पडद्यांत गुलालाच्या जळांच्या गव्ह्यामधीं
घेववे न तिला दे ती संधि साधुन तो तधीं
अशी परिचिता होतां प्रियमूर्ति अनुक्रमें
दुरोनि नच, ओठांहीं प्यावी चंद्रकला गमे

हें मधुस्पन्दी चित्ररेखन सावरकरांच्या प्रतिभेची, महाकवित्वाच्या कल्पनाविष्करणाची व भावरेखनाची सारी सुपूर्तता उत्कटतेनें व्यक्त करण्यास पुरेसें आहे असें आम्हांस वाटतें. काव्य हें जर जीवनाच्या अंतर्गत उमाळ्यांचें प्रतिबिंब असेल तर 'कमला' हें सावरकरांच्या **क्रांतिकारक आयुष्याचें आत्मनिवेदनच होय.**

भारतीय संस्कृतीच्या सुवर्णयुगांतच उमलूं शकणाऱ्या अभिरामलावण्या पण निर्व्याज किशोरीच्या यौवनोन्मुख म्हणूनच मुग्ध व अस्फुट प्रीतिकलिकेचा पहिला बहारदार उन्मेष स्फुरण्यांत कांहीं सावरकरांच्या प्रतिभेचें वैशिष्ट्य नाहीं. तर परवशतेच्या अमावास्येंत सारें भारतीय राष्ट्र चांचपडत असतां आणि "गव्हाणाला तोंड पुरून दोन पेंढ्या जिभेला लागतील इतकेंच दावें सैल असूं द्या" "तुरुंगाच्या भिंतींना खिडक्या जरा अधिक असूं द्या" अशा थाटाच्या प्रयत्नांत भारतीय नेतृत्व गुरफटलें असतांना दामोदर चाफेकरांच्या बलिदानाची वार्ता ऐकतांच छोटी कट्यार हातांत घेऊन महिषासुरमर्दिनी कुल-स्वामिनीसमोर प्राणार्पणाची प्रतिज्ञा करावयास उभ्या ठाकलेल्या विनायकरावांच्या चिमुकल्या मनांत संपूर्ण स्वातंत्र्यासाठीं प्रचंड राज्ययंत्र उलथून पाडणाऱ्या राज्यक्रांतीची दैदीप्यमान कल्पना स्फुरली हें त्यांच्या प्रतिभेचें खरें वैशिष्ट्य होय. नोकरी मिळत नाहीं म्हणून, आई आजारी म्हणून, प्रियतमा प्रसन्न होत नाहीं म्हणून, अथवा जगांत कोणी विचारीत नाहीं म्हणून रडणारे तरुण शेंकड्यावारी सर्वत्र आढळतील. पण आपली राष्ट्रमाता गुलामगिरीच्या खातेऱ्यांत खितपत पडली आहे म्हणून हृदयाचे बंध तुटून डोळ्यांतून अविरत प्रवाह चालू असणारा—मातृभूमीसाठीं रडणारा—तरुण कोणीं कधीं पाहिला आहे? बिपिनचंद्र पालांचे चिरंजीव निरंजन पाल एका आठवणींत लिहितात "मी आणि सावरकर एकदां लंडनच्या एका विभागांतून फिरत होतों. मंदमंद पावलें टाकीत व एक स्वकृत पद ( सागरा प्राण तळमळला ) ते गुणगुणत होते. मीं त्यांच्याकडे पाहिलें तों डोळ्यांतून अविरत अश्रूंचा प्रवाह सुरू होता. मीं आजवर अनेक देशभक्त पाहिले आहेत पण मातेच्या परवशतेच्या कल्पनेनें धाय मोकलून रडणारा भावनोत्कट देशभक्त सावरकरांवांचून मला कोणीही आढळला नाहीं." समष्टीच्या विकासासाठीं तळमळणाऱ्या हृदयांत भावभावनांचे आवेग इतके उत्कट झाले कीं, ते आपोआपच सुराच्या धाराप्रवाहांत वाहूं लागून सावरकरांची कविता तयार झाली—ती मुद्दाम अनुरंजनासाठीं तयार केलेली नाहीं. कारण काव्याच्या सुरांत वाहण्या-

इतपत हा आवेग मर्यादित नव्हता; तर श्यामसुंदराच्या दर्शनासाठीं आतुर होऊन स्वतःच्या चिताप्रकाशांत तें मधुर स्वरूप पाहूं इच्छिणाऱ्या *ताजप्रमाणें स्वातंत्र्याचें अव्यक्त प्रकाशांत आणण्यासाठीं सावरकरांनीं धिम्या हातानें आपल्या साऱ्या संसाराचीच सपरिवार चिता पेटविली. चितेची पहिली आंच लागतांच क्वचित् पतिव्रतेलाही ती जाचेल पण धाड्धाड् पेटलेल्या त्या संसाराचें करुण स्वरूप पाहून यशोदा वहिनींचें हृदय करपलें असेल हें जाणून स्वातंत्र्यलक्ष्मीचा हा धुरंधर वैतालिक घनगंभीर स्वरांत म्हणतो.

अनेक फुलें फुलती । फुलोनिया सुकोन जाती
कोणीं त्यांची महती गणती । ठेविली असे ?
परी जें गजेंद्रशुंडेनें उपटिलें । श्रीहरीसाठीं मेलें
कमलफूल तें अमर ठरलें । मोक्षदातें पावन
त्या पुण्य गजेंद्रासमची । मुमुक्षुस्थिती भारतीची
करुणारवें ती याची । इंदीवरश्यामा श्रीरामा
धन्य धन्य अपुला वंश । सुनिश्चयें ईश्वरी अंश
श्रीरामसेवापुण्यलेश । आपल्या भाग्यीं लाधला
आशीर्वादपत्र पावलें । जें लिहिलें तें ध्यानीं आलें
मानस प्रमुदित झालें । धन्यता वाटली उदंड
पूर्वज अनंत ऋषीश्वर । अजात वंशजांचे संभार
साधु साधु गर्जतील । ऐसें वर्तणें या काला

* * *

ज्या होति तैं प्रियजनांसह आणभाका
त्या सर्व देवि वहिनी स्मरती तुम्हां का ?
दीप्तानलांत निजमातृविमोचनार्थ
हा स्वार्थ जाळुनि अम्ही ठरलों कृतार्थ

---

* अकबराच्या कारकिर्दीत दिल्ली येथें एक ताज नांवाची मुसलमानीण रहात असे. ती श्रीकृष्णाची परमभक्त होती. आपल्या एका कवितेंत ती कृष्णाला म्हणते, " या दिल्ली शहरांत अनेक दीपमाळांचा प्रकाश सभोंवतीं पसरला आहे. पण प्राणनाथ, तुझी मूर्ति प्रकाशायला त्यांचा प्रकाश असमर्थ आहे. माझ्या चितेच्याच प्रकाशांत मी तुझी मूर्ति पाहूं का ?"

कीं हे ठरोहि अथवा न ठरो परंतू
हे मातृभू अम्हि असों परिपूर्णहेतू
त्वत्स्थंडिलीं ढकलिली गृहवित्तमत्ता
दावानलांत वहिनी नवपुत्रकांता
त्वत्स्थंडिलीं अतुलधैर्य वरिष्ठ बंधू
केला हवी परम कारुण पुण्यसिंधू
त्वत्स्थंडिलावरि बळी प्रिय बाळ झाला
त्वत्स्थंडिलीं बघ अतां मम देह ठेला
हें काय बंधु असतों जरि सात आम्ही
त्वत्स्थंडिलींच असते दिधले बळी मीं

आणि (स्वातंत्र्याच्या घोषाच्या व राज्यक्रांतीच्या आवेगाच्या रुद्रगंभीर शंखरवानें सारा शारदेचा परिसरच सावरकरांनीं निनादून सोडलेला आहे) लतांचीं फुलें तोडतांना कमलेला त्यांतून निघणारा रस पाहून जणूं आपण लतेचें रक्तच काढलें आहे असें वाटतें. त्यावेळीं तिच्या प्रेमळ सासूच्या तोंडीं

देवकार्यीं अहा बाले लतांचींच सुमें किती
यौवनाचीं सुमें वीरप्रसू तोडुनि अर्पिती

हे प्रेरणागर्भ उद्गार घालतांना अंदमानाच्या यातनागृहांत लोहशृंखलांनीं जखडलेल्या ह्या स्वातंत्र्यसिंहाच्या मनश्चक्षूंसमोर मदनलाल धिंग्रा व अनंत कान्हेरे यांच्या मूर्ति असणें जितकें शक्य, तितकेंच आपलें स्वतःचें स्मृतिचित्र असण्याची शक्यता आहे. किंबहुना ब्रिक्स्टन्च्या तुरुंगांतून स्वतःच्या पेटलेल्या संसारासंबंधीं वहिनींना पाठविलेल्या ओवीबद्ध पत्रांतल्या

परि जें गजेंद्रशुंडेनें उपटिलें । श्रीहरीसाठीं मेलें
कमलफूल तें अमर ठरलें । मोक्षदातें पावन

या आत्मप्रतीतीच्या ओळींचाच त्यांच्या हातून अभावितपणें झालेला हा अनुकार आहे. तसेंच या आरंभरम्य पण रुद्रान्त काव्याचा तारुण्याच्या दारवंठ्यावरचा नायक मुकुंद कमलेसारख्या उमलत्या लावण्यसंपदेबरोबरच्या पहिल्याच सहवासाच्या आतुर उत्तररात्रीं सोन्याच्या संसारचित्रावर होतात्म्याचे निखारे फुलवीत श्रीमंत भाऊसाहेब पेशव्यांच्या आज्ञेनुसार रणयज्ञांत उडी घ्यावयास निघून जातांना जे—

आगींतही असें फेकूं कमला न अयुक्त कीं
जरी प्रज्वलली ती कीं देव-कार्य-महामखीं
मुकुला सखया! तूंची वदलासि सरावरी
धर्मार्थिची कधीं होती आपद्धर्मे असे बळी

*　　　*　　　*

अहिंदु उठला सारा ! हिंदु जो तितुका अणी
काय पाहोंचि तें शय्यागेहांच्या खिडक्यांतुनी
उठो हिंदु उठो वा ना मराठा तितुका तरी
आबालबालिका आतां मरो मारित संगरीं
समर्थांची अम्हीं दीक्षा घेतली नचि का ? म्हणीं
हातावरी शिरा तूंही घेउनी घुससी रणीं
सरदारचि तूं वीरा श्रीमंत प्रभु भाउचा
तरी मीहि नसे कां रे देहची दुसरा तुझा ?

हे उद्‌गार काढतो, त्यांत, डोंगरीच्या तुरुंगाच्या गजांशीं नुकताच यौ भरांत आलेला अभिनव भारताचा हा सेनानी मृत्यूची तरवार डोक्यावर लटकत असतांना सतरा वर्षे वयाच्या भेटावयास आलेल्या आपल्या पत्नीला जें स्वसमर्थन-पर उत्तर देतो त्याचें प्रतिबिंब पडलेलें आहे, हें काय कुणाला सांगावयास पाहिजे ? क्रांतिकारकांनीं व मातृभूच्या बलिवेदीवर प्राणार्पण करावयास सजलेल्या नेत्यांनीं विवाह करून संसार उभारावा कीं नाहीं या बाबतींतली सावरकरांची तत्त्वप्रणाली त्यांच्या पुढील ओळींतून त्यांनीं विस्तृत मांडली आहे :

यद्यपी राष्ट्रधर्माचा बीजमंत्र विवाह रे
गंगाची आटतां गंगास्नान-पुण्य कसें घडे
परंतु परतेची जैं आपदा प्रिय भू छळी
धर्मार्थेची सख्या होती आपद्धर्म तदा बळी
अर्धभुक्तचि तैं अर्धांगीच्या बाहुलतेंतुनी
होयरे सखया जाणें हाय ह्या विषमीं रणीं
भीति धीरहि तैं द्याया प्रीतिचा असल्या हवी
चळती अचलांचींही शिखरे पडतां पवी

पुण्यही श्लाघ्यही होती तैं वैवाहिक बंध रे
आत्मदुर्बल जे माझ्यासम, घातुक त्यां त्वरें
रोग्यां पौष्टिक तैसें त्यां रतिमंगल वर्ज्यसें
प्राप्तची न तयाचा कीं त्याग दुष्करसा नसे
चुकोत अल्पधर्मीं ना महद्धर्म करावया
म्हणूनि विहिताची कीं अविवाहिततांचि यां
परंतु जो मनस्वी हे दोन्ही धर्म शके करूं
कामिनींच्या कटाक्षांहीं जातां येइ न जो धरूं
धर्मवीर्यत्व तीसंगें ज्याचें लुप्त न जो परी
तिलाचि अपुल्या संगें धर्मवीर्यवती करी
धन्य धन्यचि तो धीमान् धर्मवीर चितोरचा
राजीवाक्ष अयोध्येचा तान्हा भारतभूमिचा

* * *

आमुची देशभक्ती तों निर्नदीकसरोपमा
तुझी जयांत जन्मा घे गंगा संतत त्या समा
धर्मार्थे एकची त्यागूं आम्ही प्राण तुम्ही परी
कान्ता, सुता, स्वतां आत्मत्याग हा त्रिगुणें तरी

हें वर्णन वाचतांना वसंततिलकावृत्तांत आपल्या वहिनींना पाठविलेल्या पत्रांतल्या

त्वत्स्थंडिलीं ढकलिली गृहवित्तमत्ता
दावानलांत वहिनी नवपुत्र कांता

या ओळी त्यांच्यासमोर नसतीलच असें कसें म्हणावें ? धैर्य कितीही अभंग असलें तरी विनायक दामोदर सावरकर हे अंतःकरणशील मनुष्य आहेत. आणि कठोर वज्राघात सहन करायची अस्वाभाविक क्रिया संयमानें अंतःकरणशील व्यक्ति करते म्हणूनच तिचें असामान्यत्व नि महत्त्व ! चेतनाहीन पाषाणाच्या तापण्याला कोणी ‘ हौतात्म्य ’ म्हणत नाहीं. त्यामुळें काळ्यापाण्याच्या कांटेरी विजनवासांत त्यांच्या स्वाभाविक कोमल भावनांना पूर येई आणि सुखद स्मृति डोळ्यांसमोर तरळून अंतरंग करपून जाई. विवेकाच्या लगामानें त्याला बांध घालतांना भावना आणि विवेक यांचा जो संघर्ष होत असे त्यामधून ‘ सप्तर्षि ’ आणि ‘ विरहोच्छ्वास ’ या काव्यांचा जन्म झालेला आहे. कमलेंतल्या पहिल्या चुंबनाच्या वर्णनांतील

स्नेहशून्य सहारे जे आयुष्यांतिल घोर रे
विवासनीं अशा जेव्हां जीव व्याकुल हा झुरे
किंवा विणी कसें जाळें कोळी हीच मजा जिथें
काळखोलींत बंदीच्या तैं तिथेंहि, सख्या, तिथें
प्रियेच्या पहिल्याची हे मुग्ध प्रेमल चुंबना
तुझीच स्मृति जावोनी भेटवीं विरही मना

विरहोच्छ्वासांतील

प्रिय विरह दिवस देवांहीं
पर्यायपीत गे मम ही
पांडुरा मूर्तिची पाही
त्वत्प्रीतीच्या । संभोगाच्या
गतपुनवेची साक्ष तनुकला करुणा
छळि विरहवेदना प्राणा

इत्यादि ओळी म्हणजे विवेकाच्या खडकावर आपटणाऱ्या भावनांच्या लाटांचीं प्रत्यंतरेच होत. तरी पण ह्या भावना व विवेकाच्या संघर्षाचें यथावत् स्वरूप सावरकरांच्या **सप्तर्षि** ह्या काव्यांतून अतिशय वेधकपणें स्पष्ट झालेलें आहे. त्यांच्या प्रतिभेची भव्यता आणि विश्वात्मता जर वैनतेयाच्या जगाला गवसणी घालणाऱ्या भरारीप्रमाणें, कुठें प्रत्ययास येत असेल तर ती मुख्यतः सप्तर्षि, जगन्नाथाचा रथोत्सव व अनंताची आरती या तीन कवितांमधूनच होय. “हिंदु मनुष्य ज्यावेळीं हिंदुत्वातीत होतो त्यावेळीं त्याला विश्वात्मतेचाच साक्षात्कार होऊं लागतो” असें जें विधान त्यांनीं आपल्या प्रख्यात हिंदुत्व या प्रबंधाच्या शेवटीं केलेलें आहे त्याचें ह्या तीन कविता हें प्रत्यक्ष निदर्शनच होय. त्यांनींच वर्णिल्याप्रमाणें

लांब नऊ न पदें जी रुंद पदें पांचही नसे पुरती

अशा अंधाऱ्या काळकोठडींत “वाग्दुष्काळानें जीव तळमळत” असतांना खरखरीत खादीची चड्डी आणि बंडी अंगांत, डोक्यावर पिवळी टोपी आणि तरट, कांबळें व

स्नानापाना प्रातर्विधिसमयास्तवहि एकची होतें
जलपात्र, अपात्रहि जें जस्ती हस्तार्थ मापटें हो तें
जस्ती पदक प्रतिपदिं वक्षिं पुकारित सजा सदा रुळतें
चरणांत लोहदंडा बेडी दुस्वन भयाण खळखळते

वाळे जिचे सकीलक-कंटक, ती तीन शेर वजनाची
खाई दैवहतांचीं सोलुनि जी कातडीं नव जनांचीं
बिलगे कटिसी ती; पद टाकूं नेदीच सहज दिवसाही
वळतां स्वप्नीं पुसल्याविण डसतेची, न भंग लव साही
नवपद खोलीमाजी जेवूं बैसे तिथेंचि जड कुंडी
हट्टें फुंकुनिया जी घाण, घ्राणा करीत रडकुंडी
"तूनु घृण्य ! निंद्य तनु ही" बोधित अवधूत कीं पिसा कोणी
शौचादि नित्यकर्मा एक अनावृत असे चतुष्कोणी
खायासि खापराची थाली लंगोटि ही क्वचित् सारा
संसार आमुचा हा ! शिकवी तदधिक अवश्य न पसारा

अशा सक्तीच्या वानप्रस्थाश्रमांत त्यांना भारतीय अध्यात्मशास्त्रांतील वैराग्य प्रकरणांतला अपरिग्रहाचा पहिला सिद्धान्त पुढीलप्रमाणें स्फुरलाः—

जितुका जनीं अवश्यक समजुनि झटताति लोक मिळवाया
अनवश्यक तो, ज्वर तो क्षीण करी श्रांत मनुजबळ वाया

तरी पण आशेचें मृगजळ पुरतें वाळलें नव्हतें. आणि श्रीज्ञानेश्वरांनीं

"पिंडें पिंडाचाचि ग्रासू
हा नाथपंथीचा संकेतु"

म्हणून कुंडलिनीनें अमृतपान करून योग्याचें शरीर विश्वात्म होण्याचा जो प्रकार वर्णन केलेला आहे त्याच्या पावलावर पाऊल टाकून सावरकरांच्या प्रतिभेलाही विश्वात्म होण्यापूर्वी, त्या अष्टांगयोगाप्रमाणेंच शरीर व मन यांचें पूर्ण शोषण होणें अत्यंत आवश्यक होतें. न्यायालयांतील "५० वर्षें शिक्षा" ह्या शब्दांनीं पुरतें काम केलें. ते म्हणतात—

कारानलांत हुत मी तिळतिळ जाळोनि देह, कार्यातें
अत्युत्तमाचि उद्धाराया जननी स्वभूमि आर्या ते
द्वीपांतरांतुनी कीं धैर्या उत्साह एक दे हाची
येऊं शकेन रक्षा ठेवूं या पुण्यभूत देहाची
वर्षें पन्नास परी ऐकुनि उत्साह तोहि कोसळला
सुकला तरंग अंतिम होता जो मृगजळांत सळसळला

## विश्वात्मतेचा साक्षात्कार

आणि मग जागृत झालेली योग्याची कुंडलिनी ज्याप्रमाणें शरीरांतील मांसाचा कणन् कण खाऊन आणि सारें द्रवत्व ओरपून शुष्क करून टाकते, त्याप्रमाणें सावरकरांच्या प्रतिभेनें आशेचा ओलावा पार ओरपून काढला आणि अमृतप्राशनानंतर दिव्य व गगनगामी शरीर जसें योग्याला लाभावें त्याचप्रमाणें सावरकरांच्याही प्रतिभेला चिदानंदाचा साक्षात्कार होऊन, अनुरागाचा विकास असणारें वैराग्य लाभलें. पातंजल शास्त्राच्या ईश्वरप्रणिधानाच्या मार्गानेंही प्रतिभा त्याच एकतान अवस्थेंत कांहीं वेळ विलीन झाली. आणि नंतर ती जों जगाकडे पाहूं लागली तों सारे कष्ट, सारे आयास भासविणाऱ्या आभासाची मर्यादा ओलांडून "गगनापैलीकडील देखें" अशी तिची स्थिति झाली. मग वाग्दुष्काळ जाचण्याऐवजीं रोज तेजःपुंज सप्तर्षि वनोपवनांचे चाबुक कडाडवीत किरणाश्वांचे घोडे चौखूर उधळून काळकोठडींतल्या ह्या स्थितप्रज्ञ जीवन्मुक्ताची भेट घ्यावयास धावूं लागले. त्यांच्या मदतीनें प्रकाशवर्षांची सोय होऊन मानवजातीच्या आजवरच्या स्थित्यंतराचा क्रम कधीं तो पटावर रेखल्याप्रमाणें पाही तर कधीं देवदानवसंग्राम आणि विश्वमोहनाचें मोहिनी रूप ह्यांचा साक्षात्कार घेत बसे. ह्याप्रमाणें "गगनापैलीकडील" भरारीनें अनेक गूढांचा साक्षात्कार घेतां घेतां एक दिवस निळ्या नभाची कोर नव्हे;

देवी अनंततेच्या चुनडीचा पदर पालवी मजला

असें त्या प्रतिभेस दिसलें. आणि तिच्या पालवण्यावरून अथवा बोलावण्यावरून ह्या प्रतिभेनें सखि म्हणून चिदाकाशाला मिठी मारून अनंताच्या आसनावरून जों विश्वरूपाकडे नजर फेंकली तों तिला काय प्रतीति आली ? जी काय शब्दातीत अतीन्द्रिय अशी भव्य प्रतीति अनुभविली तीच आधुनिक भारताच्या या महाकवीनें—

## जगन्नाथाचा रथोत्सव

ह्या अद्भुत काव्यांत शब्दबद्ध करून ठेवली आहे. युगाच्याच कोसांचे खुणेचे दगड लावलेल्या कालपथाच्या अतुट उतरणीवरून दिक्क्षितिजांच्या दैदीप्यमान रथांत बसून वेगानें चाललेल्या जगन्नाथाला, त्याच्या रथाच्या वेगानें मागें उडत असलेल्या नक्षत्रकणांचा धुराळा बघून बावरी झालेली ही वैनायक–प्रतिभा विचारूं लागली:

ऐश्वर्यें भारी । या अशा । ऐश्वर्यें भारी
महाराज आपुली कथा ना कुठें निघे स्वारी ?

समोर धूमकेतूचे बाण सुटत आहेत, सूर्यमाला शतावधि चंद्रज्योति उडवीत आहेत, सभोंवार शेंकडों सूर्यांच्या मशाली पाजळल्या आहेत, मज्जापिंडांतील रसाच्या स्पंदनापासून तर भौतिकतेंतील सर्व स्फोटांचा अंतर्भाव करणाऱ्या महान् गतीचाच अश्व रथाला जुंपून आणि आपल्या परमप्रेरणेचाच रश्मि खेंचून ह्या निरावलंबी मार्गावरून देवाधिदेव " महाराज आपुली कथा ना कुठें निघे स्वारी ? " आणि नंतर जणूं कांहीं जगन्नाथानें आपलें हृद्गत तिला सांगितलेंच अशा डौलांत त्याच्या स्वारीला आरती करायला ही प्रतिभा पुढें सरसावते. पण आकाशाच्या अंगणांत त्याच्या स्वागतासाठीं लागलेली सहस्त्रावधि सूर्यांची दीपमाळ बघून आपल्या पणतीचा येथें काय पाड अशा भावनेनें ती ओशाळते. पण भाविक भक्तीच्या पणतीचा प्रकाश सूर्यसहस्त्रांच्या दीपमाळेहून विश्वात्मकाला अधिक प्रकाशित करूं शकेल अशा भावनेनें आत्मज्योतीची आरती त्याला ओवाळून शेवटीं म्हणते—

आईच्याची बागेमधुनी
ताजीं ताजीं वेंचुनि वेंचुनि
मुली गुंफिती आईच्याची वेणींतूनि फुला
दाविती देवा दीप तुला

" जगन्नाथाचा रथोत्सव " ह्या कवितेंतील सुभव्य विश्वात्मतेचा आविष्कार स्वातंत्र्यवीर सावरकरांना ' संकुचित ' म्हणून संबोधणाऱ्या आक्षेपकांनीं खरोखरच एकदां निरखण्यासारखा आहे. मात्र 'विश्वकवि' म्हणून मिरवणाऱ्या पण 'मानवते' च्या मर्यादांचें अभावित आवरण न उल्लंघूं शकणाऱ्या कविपुंगवासारखी त्यांची प्रतिभा अर्धवट भरारी न मारतां सृष्टिचक्राचा ती पूर्ण ठाव घेत असल्यामुळें, भारतीय संस्कृतीप्रमाणेंच तिच्यांतही दिव्यतेऐवजीं दया व देवत्वाऐवजीं दुर्बलता निवसूं शकत नाहीं. त्यामुळेंच शाश्वत दिव्यतेच्या पूर्णबिंदूहून ढळून पुन्हा शाश्वततेकडे जाण्याचा विश्वयंत्राचा क्रम बघून, त्या मार्गांत अडथळे आणण्यासाठीं जेव्हां पशुभाव मानवतेवर कुरघोडी करूं लागतो त्यावेळीं भारतीय संस्कृतीप्रमाणेंच ही वैनायक–प्रतिभाही छिन्नमुंडा व रुधिरपिपासिनी चंडिकेचें रूप धारण करते. ' मूर्ति दुजी ती ' या काव्यांत सावरकरांच्या प्रतिभेचें हें स्वरूप पूर्णपणें प्रगट झालेलें

आहे. किंबहुना, त्यांच्या जप्त वाङ्मयांत हें स्वरूप अधिकच स्पष्टपणें प्रत्ययास येतें आणि या महत्कार्यासाठीं त्यांचें शरीरयंत्र इतकें पिचलें गेलेलें आहे कीं, त्यामुळें शरच्चंद्र चटोपाध्यायांनीं एकच सव्यसाची निर्माण केला पण सावरकरांच्या ह्या उत्स्फूर्त उद्गारांत अनेक सव्यसाची निर्माण करण्याचें सामर्थ्य प्रगट झालें आहे.

तात्पर्य, सावरकरांच्या प्रतिभेची व तिच्या पाठीमागें असलेल्या व्यक्तित्वाच्या पार्श्वभूमीचीं हीं वैशिष्ट्यें ध्यानांत घेतल्यानंतर कोणत्याही समीक्षकाच्या तोंडून “**आधुनिक भारताच्या महान् वैतालिकांत सावरकरांचें स्थान व्यासाचें आहे, शुकाचें नव्हे; कारण दिव्यत्वाकडे जाणाऱ्या प्राकृतिक ओघाची परागतिक वंचनेपासून मुक्तता करणें तिचें स्वरूप आहे**” असे उद्गार अभावितपणें बाहेर पडल्यावांचून रहावयाचे नाहींत.

---

# सावरकरांचीं भावगीतें

## प्रो. दत्तात्रेय केशव केळकर, बी. ए.

सावरकरांच्या स्फुट कवितांचा संग्रह आज प्रो. मायदेव प्रसिद्ध करीत आहेत. त्यांतील जें कवन माझ्या प्रथमच ऐकण्यांत आलें व ज्यानें माझ्या मनाला चटका लाविला तें कवन म्हणजे "ने मजसी ने परत मातृभूमीला। सागरा, प्राण तळमळला" हें होय. वीस पंचवीस वर्षांपूर्वींची ती गोष्ट. आम्ही कांहीं स्नेही मंडळी प्रतापगड, रायगड वगैरे शिवशाहींतील स्फूर्तिप्रद स्थलांचें दर्शन घेण्याकरितां सहल करीत चाललों होतों. वाटेंत वाचण्याकरितां साहित्य घेतलें होतें तें सावरकरांचे पोवाडे व इतर कवनें! अंदमानांत खितपत पडलेले सावरकर हे त्यावेळच्या तरुण पिढीला त्यागाची साक्षात् मूर्ति वाटत. मायभूमीपासून दुरावलेल्या पण मायभूमीचें दर्शन घेण्यासाठीं तळमळणाऱ्या त्यांच्या हृदयांत कोणत्या भावनांचे कल्लोळ उठत असतील याचीच आम्ही मित्रमंडळी चर्चा करीत चाललों होतों तोंच आमच्यापैकीं एकानें आपल्या पोतडींतून हस्तलिखिताची वही बाहेर काढली व त्या वहींतून 'सागरास' हें गीत गाऊन दाखविलें. त्या स्नेह्याला सुरेल आवाजाचेंहि देणें होतें. त्यावेळीं माझ्या कानावर जो परिणाम झाला तो आजहि नष्ट झालेला नाहीं. उत्कृष्ट भावगीताचे गुण त्या गीतांत एकवटले आहेत. साधीं सुटसुटीत चार कडवी. निरर्थक पाल्हाळाचा अभाव, करुण रसाला अनुकूल असें 'अक्रूर' वृत्त व मायभूमीच्या विरहामुळें जिवाची होणारी तळमळ ही एकच एक भावना सर्वत्र खेळलेली. भावनेच्या आविष्काराला साजेल अशी प्रसादपूर्ण भाषा, कल्पनाविलास भावनेच्या तंत्रानें वागेल एवढयाच बेताचा. सावरकर इंग्लंडमध्यें असतांनाच सरकारची त्यांच्यावर अवकृपा झाली. मायभूमीला कदाचित् कायमचें अंतरावें लागेल हें दृश्य त्यांना दिसूं लागलें. अशा स्थितींत सागराच्या कांठीं बसून आपल्या हृदयाची कथा ते सागरास सांगत आहेत. ज्या सागराच्या पृष्ठावरून मायभूमि सोडून आपण दूरदेशीं आलों त्यालाच पुन्हा आपणांस परत घेऊन जाण्याविषयीं ते विनंति करीत आहेत.

ने मजसी ने परत मातृभूमीला। सागरा, प्राण तळमळला!

सागरा! तुझ्यावर विसंबून ना मी येथें आलों? वाटलें, जसा सुखरूप तूं मला येथें घेऊन आलास तसाच परतहि नेशील. परत गेल्यावर मातृभूमीच्या उद्धाराचें व्रत अधिक जोमानें, अधिक कार्यक्षमतेनें मला चालवितां येईल. पण माझी फसगत झाली.

शुक पंजरीं वा हरिण शिरावा पाशीं। ही फसगत झाली तैशी

मी येथें आलों केवढया आशेनें कीं, माझ्यांतील सुप्त शक्ति विकसित होतील आणि त्याला येणारा फुलोरा मी परत गेल्यावर मातृचरणीं वाहीन!

गुणसुमनें मीं वेंचयलीं या भावें। कीं तिनें सुगंधा घ्यावें

पण आतां त्यांचा निर्माल्य होणार!

जरि उद्धरणीं व्यय न तिच्या हो साचा। हा व्यर्थ भार विद्येचा

सागरा! तूं म्हणशील कीं, येथेंच राहिलास म्हणून काय झालें? काय येथल्या आकाशांत नक्षत्रें नाहींत कीं येथल्या नगरींत प्रासाद नाहींत? पण तुला सांगतों:

नभिं नक्षत्रें बहुत एक परि प्यारा। मज भरतभूमिचा तारा
प्रासाद इथें भव्य परी मज भारी। आइची झोपडी प्यारी
तिजवीण नको राज्य मज प्रिय साचा। वनवास तिच्या जरि वनिंचा

सागरा! तुला माझी हृदयव्यथा कशी रे बोलून दाखवूं? सरित्पते, तुझ्या सरितेच्या विरहाची शपथ घालून तुला सांगतों कीं, माझा जीव तळमळतो आहे.

काय? फेसाच्या मिषानें तूं माझ्याकडे पाहून हंसतो आहेस? हंस, बाबा तुझ्यावर स्वामित्व गाजविण्याची सत्ता आज आङ्ग्लभूमीच्या हातीं आहे. आणि माझी मायभूमि आज दुर्बल झाली आहे. पण सागरा, लक्षांत ठेव. वरवर अबला दिसली तरी माझी भूमि अबला नाहीं बरें. आणि तुला तरी आठवण असावयास पाहिजे कीं, तुला एका आचमनांत पिऊन टाकणारा पराक्रमी अगस्त्य माझ्या मायभूच्या कुशींतच जन्मास आला होता.

अबला न माझि ही माता रे
कथिल हें अगस्तिस आतां रे
जो आचमनीं एक क्षणिं तुज प्याला। सागरा, प्राण तळमळला

असें हें एक उत्तम भावगीत आहे. कवीच्या प्रथमच ऐकलेल्या एखाद्या चांगल्या कवनाचा ठसा मनावर खोल उमटून जातो. तसा या कवनाचा माझ्या मनावर उमटलेला आहे, पण मीं या कवनाचा मुद्दाम विस्तारानें उल्लेख केला याचें कारण

म्हणजे सावरकरांच्या कवनांची भूमिका येथें स्पष्ट पहावयास सांपडते. सावरकरांच्या साहित्याचा स्थायीभाव देशप्रेम हा आहे, मग विषय कोणताहि असो. चुकलेलें कोकरूं असो वा गाडीला जुंपलेला बैल असो. या प्रेमाच्या क्रियारूप आविष्काराचा जातिवंत अनुभव त्यांनीं चाखलेला आहे. आणि आपलें प्रतिभेचें देणें देशप्रेमाच्या आविष्कारांतच वेंचिलें गेलें पाहिजे अशी त्यांची तळमळ आहे.

सावरकरांच्या एका अत्युत्कट भावगीताचें हें विवेचन झालें. याच्या मानानें भावोत्कटतेनें जरा कमी अशीं कवनें 'सावरकरांची कविता' या संग्रहांत वाचकांस बरींच वाचावयास मिळतील. स्वतंत्रतेचें स्तोत्र, प्रियकर हिंदुस्थान, प्रभाकरास, सांत्वन, माझें मृत्युपत्र, जा झुंज, मला देवाचें दर्शन घेउं द्या, तनुवेल या कविता भावगीताचे चांगले नमुने म्हणून उल्लेखिण्याजोगे आहेत. प्रियकर हिंदुस्थान या कवितेंतील,

कस्तूरीमृगपरिमलपूरित जिचें फुलावें रान
प्रभातकालीं कोकिलकिलकिलकूजित आम्रोद्यान

आणि

तुझ्या जलांहीं अनंत पितरां दिलें तिलांजलिदान
पुण्यभूमि तूं ! पितृभूमि तूं ! तूं अमुचा अभिमान

हे चरण विशेषच हृद्य आहेत. तसेंच

प्रभाकरास या कवितेंतहि वात्सल्यदर्शक आत्मलेखन किती सुंदर झालें आहे हें पहाण्यासारखें आहे. ते लिहितातः

परिसुनि यौवनलतिकेला तूं पहिलें फूल फुले
तनया, तनु थरथरली स्नेहें नेत्र स्निग्ध झाले
परंतु अमुचें अभिनव यौवन त्यांत पितृत्वाचा
प्रथम समागम, गमुनी लज्जाविनय मना साचा
नवप्रसव तव जननी मजला दावित असतांही
गुरुजनमर्यादेनें त्यां बहु पाहियलें नाहीं
चोरुनि घ्यावें कधीं कधीं तव अर्धचुंबनातें
सुखोत्सवें तंव आपण होउनि नयन झांकती ते
प्रभ्या प्रियकरा, हानासी बहु दिवस असा सखया
अमूर्त तूं कल्पना एक मधु-मधुर अशी हृदया

परंतु तोच प्रभाकर मृत्युवंचकानें हरून नेल्याचें त्यांना कळलें तेव्हां त्याच कवितेंत ते म्हणतात :

हृदय जोंवरी प्रभ्या प्रियाळा ! असाचि तिथ राहें
पूर्वार्जित मद्हृदय गृह असे तुझेंचि तनया हें !

आधुनिक कवींच्या प्रेमगीतांत मागें न पडणारी अशी तनुवेल ही कविताहि वाचकांनीं नजरेखालीं घालण्याजोगी आहे.

उत्कट काव्यगुणांनीं ओथंबलेलीं भावगीतें सावरकर कवितेंत फार आढळणार नाहींत. कारण सावरकरांच्या प्रतिभेचा कल काव्यगुणापेक्षां वक्तृत्वगुणाकडे कदाचित् अधिक झुकता असावा. वक्तृत्वाला ऐसपैस फैलाव मानवतो व शोभतो. पोवाड्यामध्यें या गुणांचा फायदा दिसून येतो. शिवाय त्यांची मनोघटना तर्कशील असल्यानें भावनेनें रंगतां रंगतां तार्किक प्रवचनाच्या प्रांतांत ते केव्हां केव्हां शिरतात आणि त्या स्थळीं कवित्वाला उणेपणा येतो. तोंडाला फेस आला तरी निमूटपणें गाडी ओढणाऱ्या बैलास पाहून कोणी हिंदु तुच्छतेनें हांसला. त्यावर ह्या बैलानें परक्याच्या निमूटपणें लाथा खाणाऱ्या हिंदूची चांगलीच हजेरी घेतली. पण

' जे. पी. बैल तसे महावृषभ सी. एस्. आय नंदी अशा
देईना पदव्या मला मम धनी नाना जरी शुष्कशा
देतो नित्य तृणास गार हिरव्या खाया पिण्यातें जला
नाहीं घेत मिठावरी कर नसे मी धन्य का आजला ?

असली भाषा वृषभाच्या तोंडीं कशी शोभेल ?

' बालविधवादुःस्थितिकथन ' म्हणून जी कविता आहे तिच्यांत बालविधवांच्या वकिली कैफियतीचा थाटच अधिक दिसतो. प्रासंगिक म्हणून मुद्दाम तयार केलेल्या काव्यांचा सामान्यतः हाच प्रकार असतो. पण सावरकरांचें जीवनच सामान्य कवीहून वेगळ्या प्रकारचें झाल्यानें त्यांच्या कवनांतील कांहींचे विषय हे स्वाभाविकपणेंच नाविन्यपूर्ण वठले आहेत. अंदमानांतील बंदिस्त परवशतेच्या जीवनानें त्यांच्या चरित्रपटांतील महत्त्वाची जागा व्यापून टाकली आहे. या जीवनखंडांतील विशिष्ट अनुभवांतून कांहीं कवनें निर्माण झालेलीं आहेत. कैद्याच्या पायांतील बेडी हें त्यांच्या परवशतेचें एक अखंड स्मरण जागविणारें मनःशल्य. पण या बेडीवर संतापून न जातां एखाद्या दागिन्याप्रमाणें ती स्वच्छ घासून पुसून ठेवावी

लागावी हा एक दैवघटनेचा विक्षिप्त मासला आहे. बेडी न घासली तर गंजायची व गंजली म्हणजे अधिक खुपायची ! कैद्याला बेडी काळजीपूर्वक साफ करीत बसलेला पाहून त्या दृश्यांतील विरोध कोणाच्याहि मनाला चटका लावील.

फोडुनि तोडुनि जी । जाळावी
तीच कशी उजळावी
आपण आपुलिची । रे बेडी
हौस तुझी ही वेडी !

बंदिवासांतील दुसरा अनुभव म्हणजे सुटका होण्यापूर्वीच मृत्यूच्या स्वाधीन व्हावें लागण्याची भीषण कल्पना. अशा वेळीं मृत्यूचा बेडर वृत्तीनें स्वीकार करण्यांत वीरवृत्तीचा एक विशेष आविष्कार दिसून येतो.

ये मृत्यो ! ये तूं ये, यावयाप्रती
निघालाचि असशिल जरि ये तरी सुखें !
कोमेजुनि जावया भिवोंत हीं फुलें
हीं द्राक्षें रसरशीत सुकुनि जावया
भ्यावें तें कां म्हणुनी तुजसि परी मीं ?

देशसेवेमध्यें आयुष्याचें ज्यानें सोनें केलें त्याला मृत्यूच्या स्पर्शानें तें गंजेल ही भीति कशाला ?

जरि असेल त्या अंधःकारलतेला
फुलत दुज्या दिवसाचें फूल ( पुनर्जन्म ) तरीही
भीति न मज, कीं येथें पेरिलें अम्हीं
फुलत आणि फलत तेंच.

या विषयावरची सर्वांत उत्कृष्ट कविता आत्मबल ही होय. हुतात्म्याला अमानुष छळ सोसण्याची तयारी नेहमींच करावी लागते. ती सिद्ध होण्यास कोणताहि छळ बोथट ठरेल अशा वज्रवृत्तीचें कवच निर्माण करणारे हें छोटें कवन आहे. सत्याग्रही वीराच्या जिभेवर अखंड रुळावें अशी त्याची योग्यता

आहे. फांसावर लटकणारे कांहीं हुतात्मे भगवद्गीतेंतील ' अच्छेद्योऽयमदाह्योऽयं ' इत्यादि मंत्र म्हणतांना आढळून येतात. त्याच धर्तीवर सावरकर लिहितात:

अनादि मी अनंत मी अवध्य मी भला
मारिल रिपु जगतिं असा कवण जन्मला ?
लोटि हिंस्र सिंहाच्या पंजरीं मला
नम्र दाससम चाटिल तो पदांगुला
आण तुझ्या तोफांना क्रूर सैन्य तें
यंत्र तंत्र शस्त्र अस्त्र आग ओकतें
हलाहला । त्रिनेत्र तो
मी तुम्हांसि तैसाची गिळुनि जिरवितों.

या वज्रकवच मंत्राची मोहिनी भावी वीरांना अखंड भारून टाकील यांत संशय नाहीं.

---

# सावरकर-काव्याचा पद्यरचनादृष्ट्या विचार

## श्रीयुत ना. ग. जोशी, एम्. ए.

स्वातंत्र्यवीर सावरकर यांचें काव्य एखाद्या उत्तुंग मनोऱ्याप्रमाणें वाटतें. दूरवर पसरलेल्या उजाड प्रदेशांत, विस्कळितपणें पडलेल्या जीर्णभग्न अवशेषांमध्यें, मागील काळाचा हा भव्य प्रतिनिधि पुढील काळाच्या उदरांतील गोष्टी आपल्या अतुल शैलीनें जनमनावर बिंबवीत अद्भुतपणें उभा आहे. आजूबाजूच्या खुरटलेल्या वाढींत आणि सुकटलेल्या जाळ्याझुडपांत मामुली जिवंतपणाही दिसत नसतां या अशोकाच्या जयस्तंभांतून तेजाच्या शलाका चौफेर उडत आहेत. अशा या महाकाव्याच्या पद्यरचनेचा विचार म्हणजे त्या मनोऱ्याच्या वा स्मृतिस्तंभाच्या वास्तुशिल्पाची चिरफाडच होणार. पण ताजमहालाच्या अनुपम सुंदरतेला त्याची शिल्पकलाच जशी कारणीभूत आहे, त्याप्रमाणेंच सावरकरांची विशिष्ट पद्यरचना हें त्यांच्या काव्याचें आधारभूत शरीर आहे. महाकाव्याच्या मुख्य लक्षणांत दोन गोष्टी प्रमुखपणें आढळतात. एक त्याची काव्यवस्तु नि दुसरी त्याची पद्यरचना. महान् आत्म्याच्या वसतीसाठीं बाह्य कलेवरही तसेंच महान् हवें, कारण ह्या रचनामय मूर्त प्रतीकांतूनच आंतील भावमय अमूर्त चैतन्य भासमान होतें. सावरकर-काव्यांतील भावना, कल्पना, चिंतना या इतक्या उदात्तरम्य आहेत कीं, त्यांची अभिव्यक्ति तितक्याच प्रमाणबद्ध नि अनुरूप पद्यरचनेंतून झाली पाहिजे; आणि एकंदर सावरकर-काव्याचा विचार केला तर त्यांतील पद्यरचनाही काव्यवस्तूप्रमाणेंच मनोवेधक वाटते. ‘ कवीनां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति । ’ सावरकर हे शब्दांचे दास नव्हत, अर्थाचे प्रभु आहेत, ही गोष्ट सुतराम् मानूनसुद्धां आपण असें म्हणूं शकूं कीं, ‘ गोमांतक ’ काव्यांतील नायकनायिका शंकरलिलीप्रमाणेंच महाराष्ट्रांतील रसिकगणही

शब्दमेघ ते द्रवुनी पत्रिकेंतले
स्वातीचे अर्थबिंदु टपकतांच तो
हृदयाच्या शिंपल्यांत झेलुनी धरी.

सावरकर-काव्यांतील उदात्तललित भावार्थाचे मुक्तामणि सुंदर पद्यशुक्तींत इतके परस्पर अनुरूप दिसतात कीं, त्यांना उपमा या दोन किशोर-किशोरींच्या मुग्ध प्रणयाचीच. त्यांच्या स्नेहाइतकेंच एकरूप नि उत्कट हें वागर्थमीलन आहे.

पद्यरचनेच्या दृष्टीनें ' सावरकरांच्या कविते 'च्या दोन अवस्था आढळून येतात; आणि अर्थात् त्या आंतील भावतत्त्वाच्या फरकाच्या दृष्टीनेंही समांतरच असलेल्या दिसतील. पहिल्या भागांत ( पान ६७ पर्यंत ) आपण पहात गेलों तर त्यांत वृत्तांची विविधता आढळेल, पण ' चंद्रकांत ' जातीचा अपवाद सोडल्यास ती बरीचशी प्रारंभिक व म्हणून मामुली स्वरूपाची वाटते. फटक्याची ' हरिभगिनी ' जाति व ' गोदावकिली 'मधील आर्या ( गीति ) ह्या पुढील म्हणजे " महाराष्ट्रभाटाचें विजयगीत " व ' सप्तर्षि ' या काव्यांमधील पद्यरचनेची अनुरूप पूर्वतयारी वाटते. मात्र ' चंद्रकांत ' जातीवरील श्री. सावरकरांचें प्रभुत्व प्रारंभापासूनच विस्मयकारक झालें आहे. दर्शनी पहिलीच कविता ' स्वतंत्रतेचें स्तोत्र ' किती प्रौढ, सालंकृत रचनेची झाली आहे ! याच ' चंद्रकांत ' जातीचा उपयोग, पुढील तानाजी-बाजींचे पोवाडे आणि ' तारकांस पाहून ' व ' प्रभाकरास ' या काव्यांत हृदयंगमपणें केलेला आहे. सावरकरांवर मोरोपंतांच्या आर्याबद्ध रचनेचा फार खोल परिणाम झालेला आहे. त्यांची ' गोदावकिली ' बहुतेक मोरोपंती विशेषांनीं सजलेली आहे. त्यांत अनुप्रास, अंत्यप्रास ( यमकें ), संस्कृत सामासिक शब्द, यांची रेलचेल आहे. ' बालविधवा–दुःस्थितिकथन ' मध्येंही आर्या वापरण्यांत आलेली आहे. ' टिळक–स्तवनां 'त तर स्वतः कवीच सांगत आहेत कीं,

गातो आर्यांतें श्रीमयुरेशस्फूर्तिनें ' विनायक ' तो

या ओळींतील ' श्री ' नंतरचा यतिभंग व ' यू ' ला ऱ्हस्व करणारी ओढाताण नवशिकेपणाचीं चिन्हेंच नाहींत काय ? मोरोपंतांप्रमाणेंच वामनपंडितांच्या वृत्तवैचित्र्याचा परिणामही सावरकरांच्या मनावर झालेला आहेसा दिसतो. ' लेडी ऑफ दि लेक 'च्या भाषांतरांत त्यांनीं भुजंगप्रयात, द्रुतविलंबित, शार्दूलविक्रीडित, स्वागता, मालिनी व वसंततिलका यांचा, व ' नाशिक येथील गोदातटाकीं, ' ' राजे कृष्णशहा ' यांमध्यें इंद्रवज्रा, उपेन्द्रवज्रा व उपजाति यांचा उपयोग केलेला आहे. पण त्यांच्या रचनेंत कांहीं विशेष वृत्तदोष नसले तरी एकंदर स्वरूप मात्र मामुलीच आहे. केवळ वृत्तांचा निरनिराळेपणा हेंच त्यांचें वैशिष्ट्य.

पण याच कालांतील ‘ चंद्रकांत ’ व ‘ परिलीना ’ या दोन जातींचा उपयोग मात्र फारच मनोवेधक झाला आहे. ‘ चंद्रकांत ’ जातीचा सावरकरांच्या पोवाड्याइतका ( कै. स्वातंत्र्यकवि गोविंदाचा अपवाद वगळून ) मनोहारी उपयोग इतर काव्यांतून क्वचितच आढळेल. नाटकांतून वापरली गेल्यामुळें या जातीला आधींच महत्त्व प्राप्त झालेलें होतें. त्या साहचर्यगुणाचा फायदा करून घेऊन कांहीं फेरफारही सावरकरांनीं केलेले आहेत. ‘ चंद्रकांता’ची तीच ती चाल एकसुरीपणा उत्पन्न करते, म्हणून विचारकल्पनांच्या चढउताराला साजेल अशा आरोह-अवरोहांचा अंतरा सावरकरांनीं वापरला आहे. लोकांच्या मनाची पकड घेण्यासाठीं रचलेल्या श्राव्य पोवाड्यांच्या रचनेंत ह्या अंतऱ्याची फारच जरूर होती.

घनदाट सभा थाटली । गर्जना उठली । घोर त्या कालीं ऽऽ
जय स्वतंत्रतेचा बोला ऽऽ
जय राष्ट्रदेविचा बोला ऽऽ
जय भवानिकी जय बोला ऽऽ
तुम्ही मावळे बोला हरहर महादेव बोलाऽऽ
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला ॥

आतां या अंतऱ्याची तुलना गोंधळ्याच्या डफतुणतुण्याच्या साथींत म्हटल्या जाणाऱ्या पोवाड्यांतील

पैसा काय् पडलाय् धरणीला
सायब लाग्‌ला कुरकुराय्‌ला

यासारख्या मिस्किल पण परिणामकारक अंतऱ्याशीं करून पहावी, म्हणजे त्याचें महत्त्व सहज कळून येईल.

‘ परिलीना ’ जातीचा उपयोग ‘ शिवाजीमहाराजांची आरती ’ आळवण्यासाठीं केलेला आहे. ती आरती रचनेच्या दृष्टीनें सुंदर झालेली आहे. फक्त ‘ बोला तत् । श्रीमत्शिव । नृप की जय बोला ’ या शेवटच्या ओळींत क्लिष्टता व यतिभंग असल्यामुळें खडबडीतपणा आलेला आहे. ‘ शिववीर ’ या स्त्रीगीतांत शिथिल लयीची ‘ परिलीना ’ जातीचीच रचना आहे. यांत जातिरूप व छांदस असें ‘ परिलीने’चें उभयविध मिश्रण असून, स्त्रीगीताला शोभेल अशी मात्रांतील आवर्तनांची शिथिलता आहे; म्हणून हा दोष नसून ती विशिष्टताच समजली पाहिजे.

यवनांचा झाला ऽऽ । अवनीला भार ( जातिरूप, प्लुतयुक्त )

सुंदर मंदीरें । भंगीलीं पार । ( छांदस, ऱ्हस्वाचें दीर्घ )

वेदशास्त्रें नष्टांनीं भ्रष्टविलीं सारीं ( दीर्घाचें ऱ्हस्वजातिरूप )

अधमांसी नाशोनी देशोद्धाराला ( जातिरूप )

प्रभुवर भूवर शिववीर झाला । ( जातिरूप व छांदस मिश्र )

येथवर आपण पद्यरचनेच्या पहिल्या अवस्थेचा विचार केला. त्यानंतरच्या दुसऱ्या भागाचे आणखी दोन पोटभाग पाडतां येतील. ( १ ) लंडन-युरोपमधील व अंदमानांतील लघुकाव्यांची पद्यरचना आणि ( २ ) 'सप्तर्षि', 'कमला,' 'विरहोच्छ्वास' व 'गोमांतक' या दीर्घकाव्यांची पद्यरचना. समर्पकतेच्या व आकर्षकतेच्या दृष्टीनें दोन्ही पोटविभाग सारखेच महत्त्वाचे आहेत. पण त्यांतल्या त्यांतही दीर्घकाव्यांतील रचनाविलास सावरकरी प्रतिभेचे खरे प्रतिनिधि वाटतात. लघुकाव्यांतील जातिरचना विविध स्वरूपाची आहे; फक्त एकदांच छांदस रचना केलेली आहे. ती म्हणजे 'सांत्वन' कवितेंतील ओवीबद्ध शिथिल रचना होय. या ओव्यांमधील तळमळ नि जिव्हाळा खरा सावरकरी पद्धतीचा आहे. आत्मीय उमाळा व्यक्त करावयास ओवीसारख्या शिथिल पद्याची रचना योग्य आहे; कारण ओवी ही ज्ञानेश-रामदासांनीं वापरून संकेतबद्ध केलेली आहे. विशेषतः समर्थांच्या 'संभाजीस पत्र' या ओवीबद्ध रचनेचें सौष्ठव आणि तळमळ या सांत्वनार्थ लिहिलेल्या ओव्यांतून प्रतीत होते. 'सागरास' या प्रसिद्ध कवितेला 'अक्रूर' गीताची परिचित चाल लावलेली आहे. माञ ती पुढील स्वरलेखना-प्रमाणें म्हटल्यास रसवर्धक होतेः—

सा नी सा ग रे ग ग रे सा नी नी सा रे ग सारे गरे सानी

ध नी सा सा नी सा रे ग सारे गरे सा ॥ ध्रु० ॥ ( पिलू )

" "

अंतराः— सा रे म म प प प ध म प ग

तेंच पुढीलप्रमाणें म्हटल्यास बरोबर वाटणार नाहीं :—

सा नी सा । ग म प नी प प ग रे सा रे नी सा
० ० — ० ० ◡ — ० ० ० ० ० ० — ऽ

” ”

अंतरा:—

ग म प प प म नी ध नी पध नीध प ( पिलू )
० ० — ० ० ० ० ० ० ◡ ◡ ०

आर्त आळवणीसाठीं या जातीसारखी अनुकूल जाति क्वचितच सांपडेल. ह्याच जातीचा उपयोग पुढील ‘ विरहोच्छ्वास ’ या काव्यमालेंत केलेला आहे. यांतील मनांतील दाबलेल्या विरहशोकाचे उच्छ्वास ‘ अक्रूर ’ रचनेमुळें मनाची ताबडतोब पकड घेतात. सावरकरांनीं यांतील अंतरा नेहमींप्रमाणें ‘ उद्धवा ’ च्या त्रिपदीचा घेतला आहे; पण त्यांत ‘— । भृ ’ यासारख्या आठ मात्रांच्या तोकड्या ओळींची दोनदां—क्वचित् तीनदां—योजना करून मनांतील विरहजन्य हुरहुर व्यक्त करावयास उत्तम साधन निर्माण केलें आहे.

जैं जाग मधुनि ये शयनीं
मम कंठिं करां गुंफोनी
तुज बघुनि निजेलें, फिरुनी
कधिं पिईन या । हिमकराचिया । नवउदित तया
तव मुखावरी मधुर खेळत्या किरणा । छळि विरहवेदना प्राणा

‘ पहिला हप्ता ’ मधील ‘ वसंतीं बघुनि मेनकेला ’ या चालीची जाति ‘ सुंदर-यादव ’ आहे. हीच जाति ‘ जगन्नाथाचा रथोत्सव ’ या भव्य कवितेची आहे. यांतील अंतऱ्यांत मात्र वरीलप्रमाणेंच फरक झालेला आहे. ‘ पहिल्या हप्त्या ’ मध्यें ‘ सारथी जिचा अभिमानी । कृष्णजी आणि । राम सेनानी ’ अशी ओळ व पुढें ‘ उद्धवा ’—ची त्रिपदी असा अंतरा आहे. पण ‘ रथोत्सवांत ’ आंतील भव्यतेला अनुरूप असा ‘ भूपती ’ चा त्रिचरणी अंतरा आहे व त्याची म्हणण्याची रीतही विशिष्ट आहे. ‘ अनंताची आरती ’ खरोखर ‘ माधवकरणी ’ मात्रावलीची आहे. पण ‘ असावरी ’ रागाच्या सुरावर म्हटली गेल्यामुळें हें आपल्या क्वचितच लक्षांत येतें. ‘ अटकेवर जरिपटका ’ हें विजयगीत त्यांतील आवेश व ओघ यांना साजेल अशा फटक्याच्या ‘ हरिभगिनी ’ जातींत आहे. शाहिरी कवितेचा जोरकस प्रवाह या

जातीनें उत्तम प्रकारे संभाळला गेला आहे. वरील दोन्ही काव्यें ' गोमांतक ' खंडकाव्यांतही मध्येंच गुंफलीं आहेत. त्यामुळें रसपरिपोष फारच उठावदारपणें होतो. ' भूपति ' जातीचा सुंदर उपयोग ' हिंदु नृसिंह ' मध्यें केला आहे.

वृत्तांपैकीं ' वसंततिलका ' (' माझें मृत्युपत्र ') व ' मन्दाक्रांता ' (' आकांक्षा ') हीं अतिशय कुशलपणें योजलेलीं आहेत. या उभय वृत्तांतील दीर्घाक्षरें व आंदोलनें आंतील उत्कट व भव्य विचारांना ध्वनित करावयास यथायोग्य आहेत. ' शार्दूल-विक्रीडित 'ही वापरलें आहे, पण तें मामुली असून प्रथमावस्थेंतील कवितांत व शेवटीं दोन कवितांत आढळतें.

' चामराचे सुरावर ' म्हणून ' आत्मबल ' कवितेस दिलेली चाल भ्रमोत्पादक आहे. चामर हें अक्षरगणवृत्त आहे. या कवितेंतील फक्त पहिली ओळ ' अनादि मी । अनंत मी । अवध्य मी भला ' हीच, शेवटीं ‿– अधिक घातलें तरच चामरवृत्ताची होईल. पुढील सर्व ओळी आद्यतालकपूर्व ऱ्हस्वावांचूनच्या असून शिवाय मात्रागणी जातींत आहेत. ती जातीच पुढें ' वैनायक ' स्वरूपांत पुढें आली. ' वैनायकां ' त तिचें रूप निर्यमक धावतें आहे, येथें तें ' धवलचंद्रिका ' जातीचें म्हणजेच सयमक व अन्तविरामी आहे.

‿–‿ – ‿–‿ – ‿–‿ – ‿–
अनादि मी अनंत मी अवध्य मी भला (चामर कलिंदनंदिनी)
मारिल रिपु। जगतिं असा। कवण जन्मला ( वैनायक धवलचंद्रिका )

दीर्घकाव्यांपैकीं ' कमलें ' तील व ' गोमांतका 'च्या पूर्वार्धातील ( १ ) ' अनुष्टुभ् ' छंद, ' सप्तर्षि ' मधील ( २ ) ' आर्या ' व ( ३ ) ' गोमांतक ' उत्तरार्धातील व ' सायंघंटा ', ' निद्रे ', ' मूर्ति दुजी ती ' यांमधील खास सावरकरी ' वैनायक ' जाति, यांचा विचार थोडासा विस्तारानें करावा लागेल. कारण सावरकरांची प्रतिभा संपूर्णपणें याच काव्यांतून आविष्कृत झालेली आहे. ( १ ) ' अनुष्टुभ् ' छंद हा व्यास वाल्मीकीसारख्या महाकवींनीं वापरून पवित्र व तेजस्वी केलेला पद्यप्रकार आहे. त्याच कवींप्रमाणें माधुर्य, ओज, भव्यता, व्याजोक्ति यांचा कुशल उठाव सावरकरांच्या खंडकाव्यांतही दिसून येतो. कालिदासीय व होमेरिक उपमा गुंफण्यासाठीं याचा धावता उपयोगही त्यांनीं केलेला आहे (' कालिंदीपुलिनामाजी ' इ. ' कमला ' ४–१४–१९ ). साध्या संवादासाठीं जसा त्याचा उपयोग केला आहे ( दे न रे, हरि, वस्त्रें तीं इ. ८–५४ किंवा

२५–२२२–२३ ' कमला ' ), त्याचप्रमाणें सावेश वक्तृत्वासाठीं किंवा आशीर्वादात्मक गांभीर्यासाठींही ( ४० ३७९ व १४–११२-१५ कमला ) केला आहे. गोमांतकां 'तील पुढील श्लोक याची उत्तम साक्ष देईल.

' कुठें धाम ? ' ' तिथें, बेटा, रामीं जीव जिथें रमे,
यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं च मे. ' ( गो. ३१–३४६ )

तीक्ष्ण व मर्मभेदक व्याजोक्तीसाठीं ' गोमांतकांत ' सात श्लोकांचा उपयोग केलेला आहे. यामध्यें बायबलांतल्या आज्ञा ' अक्षरशः ' ( भावशः नव्हे ) कशा रीतीनें पोर्तुगीजांनीं पाळल्या त्याचें वर्णन आहे.

' मा गृधः कस्यचित् किंचित् ' ह्या आज्ञेस्तव आणखी
किंचित् सोडूनि सर्वस्वी राज्येंची गिळिलींत कीं ' ( गो. ७३–६८३ )

सावरकरांच्या ' अनुष्टुभ् ' रचनेंतील मुख्य दोष भाषेचा खडबडीतपणा आणि यतिभंग हे होत. यतिभंगाचीं अनेक रसापकर्षक उदाहरणें मिळतात ( जसें १६ - १२८ ' कमला ' व ३०–२३५, ८३–८००, ७८–७४१ ' गोमांतक ' ). संस्कृतमयता हा सावरकरांचा विशेष आहे. पण ' —दारका तापहारका प्रतिपच्चन्द्रलेखेव तन्वंगी धवलोदका ' ( गो. १-१. ) किंवा 'वीथिका कदलींची ही उद्यानांतिल मर्मरी', ' कामसेनापुरोगामी रौप्यशृंगचि काय तें ' ( कमला पृ. ४, ८ ) यासारख्या संस्कृतमय रचनेप्रमाणेंच क्वचित् प्रसंगीं अगदीं घरगुती साधी भाषाही ते वापरूं शकतात. ' फुलांचा झुपका कोण्या रानमोगरीला जसा ' ( गो. १ ) किंवा ' घाली खेपा मधावारी मदनाचा दलाल हा ' ( कमला पृ. ८ ) यांसारख्या ओळींवरून याची खात्री पटते. परंतु बरेच वेळां साभिप्राय व म्हणून समर्थनीय संस्कृतप्राचुर्याऐवजीं संस्कृत शब्दांचाच मोह जणूं आवरत नाहीं, आणि मग काव्याची भाषा बहुधा संस्कृत वाटते, फक्त प्रत्यय मराठी म्हणूनच तिला मराठी म्हणावयाचें.

श्री. सावरकरांनीं परिष्करण केल्याचें दिसत नाहीं. ती त्यांची प्रकृतिच नव्हे, आणि तसें स्वास्थ्यही त्यांना नाहीं. परंतु जरा घासूनपुसून काढल्यास काव्य बरेच सुबोध होतें याचा मासला म्हणून आपणांस ' कमले'चें उदाहरण देतां येईल. लहान पुस्तिकावृत्तींतील बरींच कठीण स्थळें आतां ' रानफुलां 'तील द्वितीय संस्करणांत सुबोध झालेलीं आहेत. पण नवीन संस्करणाच्या वेळीं त्यांनीं जुन्यांतील ओळींतही फेरफार केला असून पुढील ओळी तर काढूनच टाकल्या आहेत.

‘ अर्धचंद्र शुभारी जो स्फूर्त आरबनी तसा
पुण्यश्लोक शिव श्रीमान्, गोविंद प्रभु धन्यसा ’

या ऐवजीं आतां

‘ हिंदु छत्रपति श्रीमान् शिव, वीरवराग्रणी
गुरु गोविंद वा बंदा धर्मवीर नवा कुणी ’

अशा प्रकारचा श्लोक आहे. हें परिष्करण सुबोधतेसाठीं नसून बदललेल्या मनोवृत्तीमुळेंच झालेलें आहे असें वाटतें. कारण आतांच्या हिंदुत्वाच्या प्रेषिताला अर्धचंद्र उभारणारा, आरबांचा स्फूर्त नायक ( नी=नयति असौ ) महंमद पैगंबर, जसा हिंदुस्थानांतून तसाच कवितेंतूनही ‘ अर्धचंद्र ’ देण्याइतका अयोग्य वाटणें साहजिक आहे. अंदमान ते रत्नागिरीपर्यंतच्या दोन–अडीच दशकांतील बदललेली विचारसरणीच याला कारणीभूत आहे.

( २ ) पण ‘ अनुष्टुभा ’पेक्षां ‘ आर्या ’ वृत्तांतलें कवन अधिक क्लिष्ट झालें आहे. तरीही ‘ सप्तर्षि ’ कविता विचारभावनांच्या दृष्टीनें भव्योत्कट झालेली आहे. व त्यासाठीं मोरोपंतांनीं वापरून सुश्लिष्ट केलेली ‘ आर्या ’ त्यांनीं वापरली तें योग्यच आहे. महाभारतासारख्या महाकाव्यांतील उपकथा ज्या गांभीर्यानें मोरोपंतांनीं आर्याबद्ध केल्या, तेंच गांभीर्य येथेंही आहे. पण पद्यरचनेची सफाई कमी असून, कृत्रिमपणा भरपूर आहे. शिवाय शब्दांची यमकांसाठीं ओढाताणही आहेच. यतिभंगसुद्धां ( सप्तर्षि १११।४७ ११५।७७ इ. ) बरेच ठिकाणीं झालेले आहेत. सुश्लिष्ट रचनेचें उदाहरण म्हणून खालील आर्या देतां येतील:—

कोर लहान नभाची दृश्या येथुनि, परंतु संगम ते
सप्तर्षींच्या सातामालांचें तीन ! – बघुनिया गमतें—
विलसे न विरल-तारक नील नभाची समोर कोर, मला—
देवी अनंततेच्या चुनडीचा पदर--पालवी गमला

( सप्तर्षि १२१।१४६-४७ )

( ३ ) आणि ‘ वैनायक ’ जातीचा त्यांचा उपयोग तर आर्ष-अभिजात अशा उभय महाकाव्यशैलींना अभिरूप असा झालेला आहे. अनुष्टुभ्-आर्या यांच्या बाबतींत त्यांच्यावर संस्कृत-मराठी महाकवींची खोल छाप पडलेली दिसते, तशीच वैनायका’च्या बाबतींत इंग्रजी मिल्टनची दिसते. ‘ वैनायक ’ रचनेंत लघु-गुरूंची

परिणामकारक योजना आहे, धावती प्रवाही चरणरचना आहे, यतींची मोहक पाळणूक आहे, अर्थानुसारी नादध्वनि आहेत, दीर्घ उपमा आहेत आणि लांब पल्लेदार पद्यपरिच्छेद आहेत. त्यांत सावरकरांचें प्रक्षोभक वक्तृत्व आहे नि घरगुती बोलीचा गोडवा आहे. कांहीं ठिकाणीं रचना प्रमाणबद्ध आहे, पण बहुधा ही संकोच पावणारी ( concise ) असून क्वचित् लांबण लावणारीही (verbose) आहे. 'वैनायका'ची सयमक व अन्तविरामी रचना क्वचित् पहावयास सांपडते. निर्यमकत्व, धावतेपणा आणि पठण-वाचन-प्रायता हेच 'वैनायका'चे विशेष आहेत. सावरकर म्हणतात त्याप्रमाणें तें कुठल्याही रूढ चालीवर गावयाचें नाहीं, फक्त वाचावयाचें आहे; आणि तें विशिष्ट ठिकाणीं विराम घेत आपण वाचीत गेलों, तर सावरकरी वक्तृत्वपूर्ण शैलीचें तें अनुरूप वाहन आहे याचा प्रत्यय आपणास येतो. मात्र मला असें वाटतें कीं, श्री. सावरकर वाचतात तसेंच सर्वत्र वाचल्यास—म्हणजे 'सावेश' 'साघात' वाचल्यास गंभीर, वक्तृत्वपूर्ण व संभाषणात्मक भाग जसे उठावदार दिसतात तसे उठावदार केवळ वर्णनपर, संथ प्रवाहाचे, घरगुती वातावरणाचे भाग वाटत नाहींत. उलट भलत्याच ठिकाणीं आवेश दाखविला गेल्यामुळें जरासा रसभंगच होतो. अशा ठिकाणीं साधीच वाचनाची पद्धति ठेवली पाहिजे.

महाकाव्य शैलीला अनुरूप असें फक्त वैनायक वृत्तच आहे असा दावा श्रीं. सावरकर करीत नाहींत. मात्र त्यांना तें तसें वाटलें. त्याचें कारण मागेंच दाखविल्याप्रमाणें त्यांच्या मनांत —᳘ किंवा ᳘— अशा मात्रावलींचें, 'चामरा'च्या किंवा 'देवराज' वृत्ताच्या सारखें दुडदुडतें व प्रवाही वृत्त योजावयाचें होतें. 'आत्मबल' कवितेसाठीं त्यांनीं खरोखर 'वैनायक' वृत्तच अभावितपणें वापरलें आहे. त्याचेंच विविध रीतीनें संस्कारिलेलें रूप आपणांस 'गोमांतका'चा उत्तरार्ध व 'मूर्ति दुजी ती' या अनुपम काव्यांत आढळतें. या वृत्ताचा मुख्य दोष हा आहे कीं, धावत्या निर्यमक रचनेस लागणारा अखंडपणा या मात्रावलींत नाहीं. शेवटच्या नियत=दीर्घाक्षरानंतर चार मात्रांचा विराम राहतो. तेथें थोडेंसें खटकल्यासारखें होतें. पण त्यासाठीं पुढील ओळींतील पहिल्या सहा मात्रांच्या आवर्तनानंतर थांबणें, नंतर पुढेंही तसेंच थांबणें व अशा रीतीनें वाचीत जाणें हाच उपाय आहे. स्वतः सावरकरांच्या वाचनपद्धतींत हा विरामी खटका ओघाचा भंग करतांना आढळत नाहीं याचें कारण ही यतीची खुबी आहे. सावरकरांच्या 'वैनायकी' पद्यरचनेचा

विचार विस्तारानें 'वैनायक-वृत्त-विचार' ( म. सा. प., एप्रिल, १९३८ ) नांवाच्या लेखांत प्रस्तुत लेखकानें केला आहे. जिज्ञासूंनीं तो अवश्य पहावा.

श्री. सावरकरांच्या पद्यरचनेचा येथवर सुटा विचार केला. पण एकंदर दृष्टीनें पाहतां सावरकर-काव्यांत वृत्तरचनेला दुय्यम महत्त्व आहेसें वाटतें. नदीचा ओघ जसा स्वतःचें पात्र तयार करतो, त्याप्रमाणेंच सावरकरांची भव्य प्रतिभा स्वतःचीं वृत्तें शोधून काढते किंवा जुन्याचें संस्करण करिते. जुन्या गंभीर छंदाचा ते गंभीरतेसाठीं उपयोग करतात आणि नव्यांत नवीन उत्कटता ओततात. त्यांनीं बऱ्याच गेय जातींचा उपयोग केला आहे. पण त्या सावरकरी पद्धतीनें वाचल्यास आपणांस रसोद्ग्रहण उत्तम प्रकारें करतां येईल. परंतु या जातींमध्येंही गायनसुलभ भावगीतांसाठीं वापरल्या जाणाऱ्या नखरेबाज जाति नाहींत. एकंदर प्रकार जुन्याच वळणावर गेलेला आढळेल. पण म्हणून कांहींच बिघडलें नाहीं. त्यांच्यांतील आवेश, भव्यता, गांभीर्य, तेजस्विता हे विशेष त्यांनीं योजलेल्या पद्यप्रकारांच्या द्वारे संपूर्णपणें व्यक्त होतात, आणि पद्यरचनेचें हेंच खरें कार्य आहे.

---

# सावरकरांचें काव्य आणि त्यांतील तत्त्वज्ञान

## श्रीयुत दाजी नागेश आपटे, बी. ए., एल्‌एल्. बी.

मराठी सत्तेचा उत्कर्ष ( Rise of the Mahratta Power ) हें पुस्तक कै. न्या. रानडे यांनीं लिहिलें, त्या वेळीं आरंभींच त्यांना एका कल्पनेचें, दुर्विचाराचें निराकरण करावें लागलें. ती कल्पना त्यांनीं आपल्या ग्रंथाच्या सुरुवातीसच पहिल्या प्रकरणांत ग्रँट डफच्या शब्दांतच दिली आहे; ती मूळ इंग्रजींत अशी आहे: " The turbulent predatory spirit of the Hindus of Maharashtra, though smothered for a time, had its latent embers stirred by the contentions of their Mohomedan Conquerors till, like the parched grass kindled amidst the forests of the Sahyadri mountains, they burst forth in spreading flames, and men afar wondered at the conflagration."– "महाराष्ट्रांतील हिंदूंच्या मूळच्या आडदांड व आक्रमणशील वृत्तीचा अग्नि जरी कांहीं वेळ दबला गेला, तरी त्यांच्या समकालीन मुसलमान जेत्यांच्या परस्पर झगड्यांनीं त्याच्या ज्वाला सह्याद्रीच्या जंगलांतील वणव्याप्रमाणें वर उफाळल्या व त्यांनीं भोंवतालच्या गवताचा पाचोळा भस्मसात् केला. या दृश्यानें लोक आश्चर्यचकित होऊन त्या वणव्याकडे पहातच राहिले."

मराठ्यांच्या उत्कर्षाची ही मीमांसा निवेदून ती कशी चुकीची आहे, हें कै. रानड्यांनीं आपल्या ग्रंथांत परिश्रमपूर्वक सिद्ध केलें व त्या उत्कर्षाची आपली स्वतःची चिकित्सा म्हणून पृष्ठ १४४ वर असें विधान केलें कीं, " The close connection between the religious and political upheaval in Maharashtra is a fact of such importance, that, to those who without the help of this clue have tried to follow the winding course of the growth of the Mahratta power, the purely political struggle becomes either a puzzle or dwindles down into a story of

adventures without any abiding moral interest."
"मराठ्यांच्या उत्कर्षातील धार्मिक व राजकीय तत्त्वांचा मिलाफ हा इतक्या महत्त्वाचा आहे कीं, तो समजल्याशिवाय मराठ्यांच्या उन्नतीच्या नागमोडी वळणाचें ज्ञान घेऊं इच्छिणाराला ती राष्ट्रीय उन्नति म्हणजे एक कोडें आहे असें तरी वाटेल; नाहीं तर कोठल्याही प्रकारचें नैतिक अधिष्ठान नसलेल्या उपटसुंभाच्या उठावांसारखी ती वाटेल."

कै. रानड्यांनीं केलेली ही मराठ्यांच्या उत्कर्षाची मीमांसा पुढें सर्वमान्य झाली व म्हणूनच प्राच्य, पाश्चात्य वगैरे सर्व इतिहासकारांच्या आदराला तो उत्कर्ष पात्र झाला.

कै. रानड्यांच्या या दोन उताऱ्यांतील 'महाराष्ट्रीय' अथवा 'मराठे' यांच्या संबंधानें केलेला उल्लेख श्री. सावरकरांच्याही बाबतींत पुष्कळ अंशीं लागू पडण्यासारखा आहे. त्यांच्याही असामान्य चरित्राचें केवळ राजकीयदृष्ट्या अवलोकन केलें, तर त्यांत सह्याद्रीच्या वणव्यासारखाच विचित्रपणा दिसेल. पण त्याचें मनन करणारांस त्यांतील अबाधित-नैतिक, धार्मिक अथवा तात्त्विक काय वाटेल तें म्हणा-भूमिका स्पष्टपणानें दिसून आल्याशिवाय राहणार नाहीं, व तशी ती दिसल्यावर त्यांच्या कृतीतील सूत्र सुसंगत असल्याची खात्री पटेल. त्यांचें काव्य हें त्यांच्या चरित्राचें पूर्ण प्रतिबिंब आहे; कारण केवळ जनरंजनासाठीं, स्वतःच्या करमणुकीसाठीं, बुद्धिप्रदर्शनासाठीं, वा लोकैषणेसाठीं त्यांनीं केव्हांही काव्य लिहिलेंच नाहीं; तर तें त्यांच्या क्षुब्ध अंतःकरणांतून पिळवटून निघालेले उद्गार आहेत. म्हणून त्यांवरून त्यांच्या मनाची घडण सहज समजून येण्यासारखी आहे. या घडणींतील कोणत्या तात्त्विक कल्पना त्यांच्या काव्यांत व्यक्त झाल्या आहेत, तें येथें पहावयाचें आहे.

श्री. सावरकरांचें काव्य इतर काव्याप्रमाणेंच वस्तुनिष्ठ (Objective) व आत्मनिष्ठ (Subjective) अशा दोनही प्रकारचें आहे. अशा या दोन प्रकारांपैकीं स्वभावतःच वस्तुनिष्ठ काव्यापेक्षां आत्मनिष्ठ काव्यांतच तात्त्विक भूमिका अधिक स्पष्टतेनें सांपडते. आत्मनिष्ठ काव्याचा साधनसंभार फार अल्प असतो, कारण तें चिंतनपरच असतें. अर्थात् या चिंतनांतून अंतःकरणांत दृढमूल झालेल्या तात्त्विक कल्पनाच अधिक व्यक्त होतात. वस्तुनिष्ठ काव्याला, निसर्ग अथवा सृष्टि, तिच्यांतील असंख्य बहुरंगी देखावे व काव्यविषयक व्यक्ति व त्यांच्या कृति, इतका अपरंपार साधनसंभार असल्यानें त्याच्या वर्णनानेंच काव्याचा

पुष्कळसा भाग व्यापला जाणें स्वाभाविक आहे. अर्थात् अशा काव्यांत एकेका घटनापरिच्छेदाच्या अथवा वर्णनविभागाच्या अखेरीस सर्वसामान्यतः तत्त्वनिदर्शक काय विचार येऊं शकतील तेवढेच येतात. जसें एखाद्या श्लोकाच्या अखेरीस अर्थान्तरन्यासानें सामान्य तत्त्व व्यक्त केलेलें असतें, तसें वस्तुनिष्ठ काव्याच्या बाबतींत तत्त्वनिदर्शन असतें. हाच नियम श्री. सावरकर यांच्या या उभयविध काव्यांतही दिसून येतो.

श्री. सावरकर बॅरिस्टरीच्या अभ्यासासाठीं विलायतेस जाण्यापूर्वीच्या काळांत त्यांनीं विधवांच्या दुःस्थितीवर एक लहानसें खंडकाव्य लिहिलें होतें, तेंच सर्वांत मोठें होतें. त्याशिवाय सिंहगडाचा पोवाडा व बाजी देशपांड्यांचा पोवाडा हीं त्याहून लहान अशीं ऊर्जस्वल काव्यें त्यांनीं लिहिलीं. याशिवाय आरत्या, पदें, वगैरे लहान काव्यें त्यांनीं लिहिलीं होती. पण या सर्व काव्यांतून वर्णनात्मक शैलीचाच विकास झालेला दिसून येतो. त्या काळांत ते करीत असलेल्या अफाट वाचनानें त्यांची तात्त्विक विचारसरणी दृढ होत होती, पण तेथपर्यंत तिच्या अभिव्यक्तीला अवसर मिळाला नव्हता. त्यानंतर त्यांना आलेल्या विविध अनुभवांमुळें व त्यांच्यावर ओढवलेल्या अनंत संकटपरंपरेमुळें त्यांचें चित्त अधिक अंतर्मुख झालें व त्याचा परिणाम त्यानंतरच्या त्यांच्या काव्यांत तत्त्वविचाराच्या रूपानें दिसून आला. असे अनुभव, अशीं दुःखें त्यांनीं अनेक वर्षें भोगलीं व त्यानंतर अंदमानांतून सुटून आल्यावर त्यांनीं आपली कार्यदिशा निश्चित केली.

परंतु येथें कोणी असा प्रश्न विचारतील कीं, श्री. सावरकरांचे विचार व आचरण हें सर्व तत्त्वनिष्ठ व तात्त्विक असलें, तरी कल्पनाविहारालाच प्राधान्य असलेल्या काव्यसृष्टींत त्याचें महत्त्व काय ? आणि वाचकानें अथवा आस्वादकानें तरी काव्याच्या रम्य विलासोद्यानांत गुलाब अथवा मोगऱ्याच्या ऐवजीं गुळवेलीच्या अथवा काडेचिराईतासारख्या तत्त्वज्ञानाच्या रोपांचा शोध कां करावा ? या प्रश्नांचें उत्तर दोन प्रकारचें आहे. एक तर वरील विरोधाभास भ्रामक आहे. या आक्षेपांत वर्णिलेला काव्य व तत्त्वज्ञान यांतील फरक मुळींच खरा नाहीं. यासंबंधानें सन १९२२ सालीं पुणें येथें कै. श्री. कृ. कोल्हटकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या कविसंमेलनांत ‘ काव्य व तत्त्वज्ञान ’ या विषयावर मीं केलेल्या भाषणांतील एक लहानसा उतारा माझ्या मताच्या समर्थनार्थ मी देतों.

" काव्यांत काय अथवा तत्त्वज्ञानांत काय, दोहोंतही मुख्य तीन अवस्था दिसून येतात. वस्तुजात, मग तें स्थूलपदार्थात्मक असो वा स्थूलशब्दात्मक असो, हेंच पहिल्या अवस्थेंत बुद्धीला आनंद देतें. दुसरींत तिच्या आंतील भिन्न भिन्न गूढ विशेषात्मक कल्पनांकडे बुद्धीची धाव असते व अखेर बुद्धि ही त्या कल्पनांत–तत्त्वात्मक अथवा रसात्मक कल्पनांत–एकतान होते; व एक प्रकारच्या लीन अवस्थेला पोचते अशी दोन्हींची परंपरा आहे. आनंद हेंच दोन्हींचें साध्य आहे, व प्रथम बाह्यरूप, नंतर तदंतर्गत सूक्ष्म कल्पना व अखेर सर्वांतर्यामी एकतत्त्व ही तिची सोपानपरंपरा आहे. याप्रमाणें पाहतां काव्य व तत्त्वज्ञान हे दोन विषय प्रथमदर्शनीं भासत असल्याप्रमाणें परस्परविरोधी नसून दोन समांतर रुळांवर चालणाऱ्या आगगाड्यांप्रमाणें सहगामी आहेत असेंच दिसून येईल, व म्हणूनच उत्तम काव्य हें तत्त्वज्ञान होतें व उत्तम तत्त्वज्ञान काव्यात्मक होतें. रघुवंशांतल्या आठव्या सर्गांतील अजविलापाइतकें अप्रतिम काव्य जगाच्या इतर वाङ्मयांत सांपडणें कठीण आहे. परंतु त्यांत अत्यंत रसयुक्त वाणीनें इंदुमतीचा अंत व अजाचा शोक वर्णन केल्यावर ' मरणं प्रकृतिः शरीरिणां । विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः ॥ ' हें पर्यवसान स्वाभाविक वाटतें. त्याचप्रमाणें बृहदारण्यक उपनिषदांतील मरणोत्तर आत्म्याच्या गतीचें तत्त्वज्ञान वर्णन करितांना त्याची अखेर अशी केली आहे कीं, ' ज्याप्रमाणें एखादा महामत्स्य अफाट नदीच्या एका तीराकडून दुसऱ्या तीराकडे आंदोलनें घेत राहातो, अथवा एखादा प्रचंड गरुडपक्षी आपले दोन्ही पंख फडफडवीत आकाशांत इकडून तिकडे उड्डाण करीत असतो, व याप्रमाणें तो महामत्स्य उभय तीरांत हेलकावे खाल्ल्यानंतर कांहीं वेळ स्तब्ध राहून नुसत्या पाण्याच्या ओघाबरोबर वाहात जातो, अथवा तो सुपर्णपक्षी आपले दोन्ही पंख जुळवून घेऊन नुसता हवेंत तरंगतच राहातो, त्याप्रमाणें जीवात्मा हा स्वप्नान्त व बुद्धान्त या दोन अवस्थांत हेलकावत राहातो. ' हें वर्णन उत्तम काव्य नाहीं असें कोण म्हणेल ? अशा दृष्टीनें काव्य व तत्त्वज्ञान हीं परस्परपूरक, फार काय एकात्मकच होत. "

वरील उताऱ्यांत वर्णन केल्याप्रमाणें काव्यांतील तत्त्वज्ञान हें त्याचा गाभा असल्यामुळें तें पाहाणें आवश्यक ठरतें.

आक्षेपकांच्या म्हणण्याला दुसरे उत्तर असें आहे की, श्री. सावरकरांचे काव्य हे एखाद्या कारंज्याच्या रंगीत फवाऱ्याप्रमाणें पोकळ नाहीं. तें जीवंत आहे, तें ज्वलंत

आहे, तें स्वसंवेद्य आहे व तें स्वानुभूत आहे. श्री. सावरकर हे आधीं केलें मग सांगितलें या कोटींतील पुरुष आहेत. त्यांच्या काव्यांत त्यांनीं स्वतः न विश्वासिलेला, न आचरिलेला व न आत्मसात् केलेला असा एकही शब्द नाहीं. पोकळ शब्दजाल पसरणारे व त्यांतील एका शब्दाचीही आत्मप्रतीति नसणारे–इतकेंच नव्हे तर त्या काव्याच्या उलट जीवन व्यतीत करणारे शेंकडो कवि आहेत ! महाराष्ट्राच्या तिखट तरवारीचें वर्णन करणारे, पण तिचें प्रत्यक्ष दर्शनही न झालेले कवि आहेत; पत्नीप्रेमाचे पोवाडे गाणारे व तिच्या मृत्यूनंतर महिन्यापंधरा दिवसांत पुन्हा बाशिंग बांधणारे कवि आहेत; पतीच्या व पत्नीच्या एकनिष्ठेचें रसभरित वर्णन करणारे, पण त्यांच्या उलट स्वतः आचरण करणारे कवि आहेत; सत्याचा उदोउदो करणारे व पावलोपावलीं असत्याचरण करणारे कवि आहेत; कवीच्या व्यापारानें ' जगदोद्धार ' करण्याचा आव आणणारे, पण क्षुद्र लाभासाठीं काव्यशक्तीचा विक्रय करणारे असेही अनेक कवि आजपर्यंत झाले आहेत, होत आहेत, व पुढेंही होतील. पण श्री. सावरकरांची कोटी असल्या कवींहून भिन्न आहे. त्यांनीं आपलें काव्य लोकप्रसाधनार्थ केलेलें नाहीं, तर आपलें जीवनतत्त्व व्यक्त करण्यासाठीं त्यांनीं केवळ वृत्तांचा आश्रय केला आहे. त्यांत उत्तम काव्य आढळलें हें त्याचें आनुषंगिक फळ आहे. संस्कृतांत एका श्लोकांत म्हटलें आहे कीं,

अभिमानधनस्य गत्वरैरसुभिः स्थास्नु यशश्चिकीषतः
अचिरांशुविलासचंचला ननु लक्ष्मीः फलमानुषंगिकम्

आपल्या क्षणभंगुर प्राणांच्या मोलानेंही अखंड यशाची जोड मिळवणाऱ्या अभिमानधन पुरुषाला ओघानें मिळणारी चंचल लक्ष्मी हें केवळ आनुषंगिक फल आहे. त्याप्रमाणें आपलें जीवनविषयक तत्त्वज्ञान कविताबद्ध करणें या मुख्य हेतूच्या ओघानें उत्कृष्ट काव्यनिर्मिति हा श्री. सावरकरांना झालेला प्रसंगोपात्त लाभ होय.

या दोन्ही दृष्टींनीं श्री. सावरकरांच्या काव्यांतील तत्त्वज्ञान पाहाणें जरूर व मनोरंजक ठरतें. तेव्हां तो प्रयत्न आतां आपण थोडक्यांत यापुढें करूं.

श्री. सावरकरांच्या काव्यांतील तत्त्वज्ञानासंबंधानें लिहावयाचा उपक्रम करतांना आपल्याजवळ असलेलें त्यांचें ' गोमांतक ', ' रानफुलें' हा कवितासंग्रह व ' सावरकरांची कविता ' हा सांप्रत प्रसिद्ध होत असलेला काव्यसंग्रह, इतक्याच तूर्त उपलब्ध असलेल्या साधनांचा उपयोग केला आहे. याहून इतर थोडीबहुत कविता

त्यांनीं केली आहे परंतु ती तूर्त उपलब्ध नसल्यानें येथें उपयोगितां आली नाहीं. या तीन संग्रहांपैकीं 'गोमांतक' हें एक स्वतंत्र काव्य आहे व तें कथात्मक आहे. अर्थात् यांत स्वतंत्र तात्त्विक असे विचार कमीच असणार. कथाप्रसंगाच्या ओघानुरूप त्यांतील पात्रांच्या तोंडांतून थोडेबहुत तात्त्विक विचार निघतात, तसे यांनही निघाले आहेत. परंतु त्या उद्गारांची भूमिका तत्त्वविवेचनात्मक नाहीं. भारतीय लोकांच्या जीवनांत तत्त्वज्ञान इतकें मुरलेलें आहे कीं, 'यास्तेषां स्वैरकथास्ता एव भवन्त्युपदेशाः।' असें एके ठिकाणीं थोर पुरुषांच्या संबंधानें म्हटलें आहे, त्या वचनांत थोडासा फरक करून, त्यांतील दुसरा चरण 'ता एव भवन्ति तत्त्वार्थाः।' असें सहज म्हणतां येईल. तेव्हां त्यांच्या तत्त्वज्ञानाचा खरा पडसाद उपर्युक्त इतर दोन काव्यसंग्रहांतच सांपडेल म्हणून त्यांचाच परामर्ष आपण पुढें घेऊं.

विचारवान् मनुष्यप्राणि मोठा होऊन त्याला सुखदुःख कळूं लागलें, म्हणजे त्याच्यापुढें दोन मार्ग दिसूं लागतात. एक इंद्रियजन्य तात्कालिक सुखोपभोगाचा मार्ग व दुसरा आरंभीं त्यागाचा, दुःखाचा व क्लेशाचा असा विषप्राशनसदृश, परंतु परिणामीं अखंड सौख्यमय, अनामय व अविनाशी असा अमृतोपम मार्ग. यांतून ज्ञानी मनुष्य दुसऱ्याचाच अवलंब करितो. या दोन मार्गांस उपनिषदांत प्रेयस् व श्रेयस् अशा संज्ञा दिल्या आहेत. त्याचें वर्णन कठोपनिषदांत असें दिलें आहे :

'अन्यत् श्रेयो अन्यदुतैव प्रेयः उभे नानार्थे पुरुष सिनीतः
तयोः श्रेयः आददानस्य साधु भवति। हीयते अर्थात् यः उ प्रेयो वृणीते'

श्रेयस् व प्रेयस् हीं ध्येयें परस्परभिन्न आहेत. दोन्हींत नानाप्रकारचे लाभ दिसतात, पण त्यांतून जो श्रेयोमार्गाचा स्वीकार करतो त्याचें कल्याण होतें, व जो प्रेयोमार्गाचा आश्रय करितो तो आपल्या हेतूपासून दूर जातो. याचेंच पुढें अधिक विवेचन असें केलें आहे कीं,

'श्रेयोहि धीरः अभिप्रेयसः वृणीते। प्रेयो मंदो योगक्षेमात् वृणीते'

धीरपुरुष श्रेयाचा स्वीकार करितो. व मंदपुरुष आपल्या योगक्षेमाच्या इच्छेनें प्रेयाचा स्वीकार करितो. त्या दोन मार्गांचें व्यावहारिक स्वरूप असें वर्णिलें आहे.

"प्रियान् प्रियरूपांश्च कामानभिध्यायन् नैतांसृंकां वित्तमयीमवाप्तो यस्यां मज्जन्ति बहवो मनुष्याः"

प्रिय वस्तु, प्रिय रूप व इतर कामवासना इत्यादींच्या मागें बहुतेक मनुष्यें लागलेली असनात. पण धीरपुरुष

" कामस्याप्तिं जगतः प्रतिष्ठां क्रतोरानंत्यं अभयस्य पारम्

स्तोमं महदुरुगायं प्रतिष्ठां दृष्ट्वा धृत्या धीरो नचिकितोऽत्यस्राक्षीः "

कामाचें अस्थिरत्व व शाश्वत वस्तूंचें महत्त्व जाणून आपल्या नाकाच्या टप्प्याच्या पलीकडे पाहतो.

हीच कल्पना श्री. सावरकरांच्या ' मूर्ति दुजी ती ' या कवितेंत प्रतीत होते. ते लिहितात, कवितेच्या दोन मूर्ति असतात :

कारण कीं मूर्ति तिच्या असति दोन ज्या
कर्तव्या अनुसरुनी रक्षिती तिच्या
पूजकासि वा प्रियासि समयिं विभिन्ना

त्यांतील एक मूर्ति अशी :

...............नाचत हृदयमंचकीं
रसिक मनाची वीणा घेउनी करीं
तंतुतंतुंतून कुशल स्पर्श पुलकिता
प्रेमाची वीज थरारूनि देत जे
भावनांसि मोहन घालून ती करी
लोण्याहुन कोमलशा कोमला अशा
कीं जाव्या चांदण्यामध्येंहि वितळुनी

पण दुसरी मूर्ति याहून अगदीं भिन्न स्वरूपाची आहे, ती अशी :

आणि दुजी ती मूर्ति प्रखर ती तुझी
कविते घेऊन शिरे वाण सतीचें
अहह हास्य करित प्रज्वलित चिताग्नी

तिचेंच अधिक स्पष्ट चित्र ते असें चितारतात :

प्रथम मूर्ति तव, यमुनापुलिन भिजुन जैं
चांदण्यांत शीतल त्या रात्रिं जाहलें
त्या रात्रीं कमलनयन श्यामसुंदरा–
सहित रासलीलेमधिं गुप्त गोडशा

हृदयाहृदयांसि नाचनाचवी मुदें
आणी आनंदाच्या किंकिणीप्रती
हास्य-लास्य-मग्न-गोपिका-हृदांतल्या
नाल धरित मंजुल रुणुं झुणुं झुणूं झुणूं
परि यमुनापुलिनीं रसभरित कीं अशा
त्या कवळ्या नंदकिशोराचिया मऊ
लुसलुशीत अधरावरि मधुर होतसे
मुरली जी —

पण दुसऱ्या मूर्तीचें रूप जेव्हां पहिली मूर्ति धारण करिते, तेव्हां

—तीच अहा त्याच कोमला
अधरांवरि कर्कश रणशृंग होउनी
रणवेताळाच्या वेताळ-ताडवा
दंष्ट्रा विक्राळ गर्जे भयद कोण तो

असा देखावा दिसतो. तथापि हीच ' दुजी मूर्ति '

तूंची कर्तव्यमूर्ति मद्हृदापुढें

असें कवीला वाटत असल्यामुळें तो श्रेयाचा मार्ग आहे, असें तो निश्चित करितो व म्हणून तो असा समारोप करितो कीं,

मारक जें दुःसह जें कठिण कटुकटू
तेंचि आज आरोग्यद बलद हो तया

याप्रमाणें आयुष्याच्या सुरुवातीस श्रेयस् व प्रेयस् यांमधील तात्त्विक भेद श्री. सावरकरांनीं ओळखल्याची खूण या कवितेवरून मिळते.

वस्तुतः प्रेयोमार्गाचीं साधनें म्हणजे वर म्हटल्याप्रमाणें पंचेंद्रियांचे विषय व त्यांचे आकर्षक गुणधर्म हे होत. हे मनुष्याला त्या त्या इंद्रियांनीं तत्काल ग्राह्य असतात. मग ते सोडून देण्याची इच्छा त्याला कां व्हावी ? याचें उत्तर तत्त्वज्ञानांत असें दिलें आहे कीं,

इंद्रियाणि पराण्याहुः इंद्रियेभ्यः परं मनः
मनसस्तु परा बुद्धिः यो बुद्धेः परतस्तु सः

इंद्रियांचे विषय गोचर असतात, पण त्यांचें ग्रहण करणारीं इंद्रियें अगोचर असून विषयांच्या पलीकडे असतात; त्यांच्याही पलीकडे मन असतें, मनाच्या पलीकडे बुद्धि असते व अखेर बुद्धीच्याही पलीकडे आत्मा असतो.

तो आत्मतृप्त असतो.

यस्त्वात्मरतिरेवः स्यात् आत्मतुष्टश्च मानवः
आत्मन्येव च संतुष्टः तस्य कार्यं न विद्यते

त्याला इंद्रियांची वा त्यांच्या विषयांची सुखप्राप्तीसाठीं जरूर नसते. म्हणून शाश्वतसुखाभिलाषी पुरुषानें इंद्रियसंस्कारांच्या पलीकडे गेलें पाहिजे असें, तत्त्वज्ञान भगवद्गीतेच्या द्वारे सांगतें. तेंच तत्त्व श्री. सावरकर आपल्या ‘ सप्तर्षि ’ या कवितेंत असें सांगतात :

दुःखसुखाचे केवल अवलंबुनि बाह्य विषय जें असतें
सुखतत्त्व विशुद्धचि जें सुख तें जें आत्मरतिंनची वसतें

त्याचप्रमाणें,

रसरूपगंधशब्दस्पर्शासी जाणतीच तनु ज्यांसी
वसती वसुधेवरती अपुल्या आम्हांसमान मनुजांसी ?
उत्क्रांतिगतिपरत्वें वा जे इंद्रियरसांसि अनुभविती
पांचाहुनि या अधिकां नानाविध जीं विकीर्ण हीं भवंती
आम्हांसि अगोचर परि यास्तव गोचर जयाप्रती असती
गौप्यें विगूढ सृष्टीचीं कीं मानव असे तिथें वसती ?

अशा प्रकारे जर रसरूपगंधादिकांच्या पलीकडे असणारीं तत्त्वें आपल्याला पहावयाचीं असतील, तर इंद्रियसुखांच्या इच्छेला आळा घालण्यासच शिकलें पाहिजे. इंद्रियसुख आकंठ भोगून मग विनिवृत्तकाम होऊं व मग इंद्रियांच्या पलीकडचा प्रवास आरंभूं ही फ्रॉइडची विचारसरणी भारतीय तत्त्वज्ञानाला अगदीं असंमत आहे. इंद्रियसुखोपभोगानें विषयनिवृत्ति कधींच होणार नाहीं, उलट विषयेच्छा अधिकच वाढेल, असा त्याचा सिद्धांत आहे.

न जातु कामः कामानां उपभोगेन शाम्यति
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते

अग्नींत तूप घातलें असतां तो जसा थंड न होतां अधिकच प्रज्वलित होतो त्याप्रमाणें कामोपभोगानें कामशांति न होतां कामवृद्धीच होते असें तत्त्वज्ञानाचें म्हणणें आहे व म्हणून ज्ञाते लोक केवळ क्षुद्र कामवासनाच काय, पण त्याहून श्रेष्ठ दर्जाच्या ईषणांचाही त्याग करितात तेव्हांच त्यांना खरी शांति मिळते, असें वेदान्त सांगतो. बृहदारण्यकांत याबद्दल स्पष्ट म्हटलें आहे कीं, " तमात्मानं विदित्वा ब्राह्मणः पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थाय ब्राह्मणो भवति।" मुलांची कामना, वित्ताची कामना, फार काय लौकिकाची कामना, या सर्व वासनाच असल्यामुळें त्या सोडल्यावरच शाश्वत सुख प्राप्त होतें. श्री. सावरकरांनीं ' सप्तर्षि ' या काव्यांत म्हटलें आहे कीं,

उमजेल तरि तुला कीं बाह्यनिधिमधीं वसे न सुखधन तें
रागोपहतिर्भोगान्नचि कीं संतोष सौख्यसाधन तें

त्याचप्रमाणें

' मरणोन्मुख शय्येवर ' या कवितेंतही हीच कल्पना वर्णिली आहे. ते म्हणतात :

इच्छेच्या बीजा फल भोग लागतां
इच्छेचीं बीजेंची त्यांत फिरोनी;
आणी अनुभवुनी कीं एक भुकेची
एक जेवणानें जी तृप्ति जाहली
तृप्ति सहस्राव्याही भोजनामुळें
असते कीं तितुकीची आणि तशीची;

व म्हणून ते म्हणतात :

' मी दे तुज अनुमोदन संपवूं असा
हा जीवनलेख इथें–

परंतु ' जीवनलेख इथेंचि संपविण्याचा ' हा विचार श्री. सावरकरांच्या मनांत मृत्युशय्येवर असतांना आला, व त्याला कारण ते सांगतात, हे मृत्यो :

...अजि दोन वत्सरें
पाहतची अससी तूं मजसि हा असा
शरपंजरीं खिळला !

व या दोन वर्षांतील रोगयातनांनींच मृत्यु अप्रिय वाटल्याचा त्यांना एकदां भास झाला, कारण ते लिहितातः

········· परि विशेषतः
मृत्यो ! तूं अप्रियसा जगतिं जें तुझें
सैन्य, पुरःसर, पीडक हें हिडिस्ससें,
रोगाचें क्रूर असे, त्यामुळेंच कीं !

या प्रसंगीं मोरोपंतांच्या

कृतान्तकटकामलध्वज जरा दिसों लागली
पुरःसर गदांसवें झगडतां तनू भागली

या केकेचें स्मरण झाल्याशिवाय राहत नाहीं. असें एक प्रकारचें दुःख श्री. सावरकरांना त्या वेळीं वाटलें, तरी देहनाशानें सर्वस्वनाश होत नसल्यानेंच त्यांच्या तत्त्वज्ञानानें त्यांना असें म्हणावयास लाविलें कीं,

·········मरण एक सुषुप्ति
अथवा प्रत्यक्ष मुक्ति पंचद्दी असे
मिश्रित भूतांश पृथक् मुक्त होउनी
विहरोत स्वेच्छ नव्या मिश्रणांतुनी
··· ··· ··· ··· ···
विपलांतचि हा माझा ‘ मी ’ हि कीं जरी
विश्वाच्या अंतर्हित ‘ मीं ’त मावळे
तरि मरणा ! मरण ! न तूं मरण मुक्तिची !

या चरणांत मरण म्हणजे सुषुप्ति असेल काय, ही कवीला आलेली कल्पना दरेक विचारी अंतःकरणाला प्रथम सुचणारी अशीच आहे. कविराज शेक्सपिअरनें हॅम्लेटच्याही तोंडीं तीच घातली आहे. हॅम्लेट म्हणतो :

To die–to sleep–no more; and by a sleep to say we end the heart–ache and the thousand natural shocks that flesh is heir to;–' tis a consummation devoutly to be wished. To die—to sleep; To sleep ! perchance to dream ! Ay, there is the rub.

मृत्यूच्या सुषुप्तीनें अथवा झोपेंत या जन्मांतील सर्व दुःखें नाहींशीं करणें अथवा विसरणें—एथवर ठीक आहे. पण जर कां त्या सुषुप्तींत स्वप्नें पडूं लागलीं व तीं सांप्रतच्या दुःखमय जीवनाइतकींच दुःखपूर्ण असलीं तर ? तर मात्र अडचण आली खरी !

या परिच्छेदांत मृत्यूची सुषुप्तिमय कल्पना फार सुंदर रीतीनें वर्णिली आहे.

शांकरभाष्याच्या तृतीय अध्यायाच्या दुसऱ्या पादाच्या ७ व्या व ८ व्या सूत्रांतही या सुषुप्ति अवस्थेचा विचार केला आहे. त्यांत आचार्य म्हणतातः

तासु तदा भवति यदा सुप्तः स्वप्नं न कंचन पश्यति ।

ती खरी सुषुप्ति कीं जींत सुप्त प्राणि कांहींही स्वप्न पाहत नाहीं. त्यावेळीं ही सुषुप्ति म्हणजे

प्राणस्य च ब्रह्मत्वं समधिगतम् ।

ब्रह्मस्थितीच होय. पण ही सुषुप्ति गाढ नसून जेव्हां तींत स्वप्नें पडतात, तेव्हां ? आचार्य म्हणतात कीं,

किं प्रबोधे इव स्वप्नेऽपि पारमार्थिकी सृष्टिः
आहोस्मित् मायामयी इति ।

ही स्वप्नांतील सृष्टि खरी कीं मायामय ? तिचें उत्तर ते देतात कीं,

न सा तथ्यरूपेण सृष्टिर्भवितुमर्हति ।

ती सृष्टि काल्पनिकच असते. पण अशा प्रकारची सृष्टि उत्पन्न होते ही गोष्ट आचार्यांनाही मान्य आहे.

तेव्हां मृत्यूनेंही शाश्वत दुःखनाश होत नाहींच. मग त्याचा मार्ग कोणता ? तो मार्ग म्हणजे या जन्मांतच अवश्य प्राप्त कर्में निष्कामत्वानें करणें हाच होय, असा भगवद्गीतेचा उपदेश आहे. व तो श्री. सावरकरांच्या काव्यांत अनेक ठिकाणीं प्रतीत झाला आहे. 'तस्मात् असक्तः सततं कार्यं कर्म समाचार' 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' हेंच भगवद्गीतेचें तत्त्वज्ञान प्रथम ज्ञानराजांनीं प्राकृतांत अनुवादिलें. ते म्हणतातः

म्हणौनि जें जं उचित । अवसरें करूनि प्राप्त
तें कर्म तूं हेतुरहित । आचरें बा

हाच तात्त्विक मार्ग श्री. सावरकरांनींही ज्ञानराजांचा मागोवा घेत प्रतिपादिला आहे.

'सप्तर्षि' काव्यांत ते म्हणतातः हे तारकांनों,

स्मरुनी नैष्काम्याचा करितां उपदेश तैं जगाला जो
स्पृहणीय दाविलासी उत्साह अदम्यसा अगा लाजो

माझ्या मना! फलाची आशा करणें वेडेपणाचें लक्षण होय, या तत्त्वाला अनुसरून श्री. सावरकरांनीं ज्ञानेश्वरकालीन मुक्ताबाईची एक आख्यायिका पुनरुद्धारली आहे. ज्याची फलेच्छा विरली नाहीं, त्याचें डोकें म्हणजे कच्चें मडकें आहे, तें पुरे भाजून पक्कें झालें नाहीं, असे उद्गार मुक्ताबाईनीं काढले होते, त्यांचें अवतरण देऊन श्री. सावरकर म्हणतातः

आशाचि! फलाशाची! एक्या घावें धृती कशी तडके
मुक्ता वदली त्याचें कच्चेंचि तसें मना तुझें मडकें

या एकाच बाबतींत नव्हे, तर अनेक बाबतींत श्री. सावरकरांचें तत्त्वज्ञान म्हणजे भगवद्गीतेचें तत्त्वज्ञानच होय, असें स्पष्टपणें दिसून येतें.

सकल गुरुंचा गुरुवर भगवान् श्रीकृष्णजी स्वयें कथिती

या 'सप्तर्षि' काव्यांतील वचनावरून, तसेंच 'मरणोन्मुख शय्येवर' या काव्यांतील

ओळखिचें पत्र अम्हांजवळ त्या स्वयें
भगवान् श्रीकृष्णाचें--

या उद्गारांवरून त्यांना श्रीकृष्णोपदिष्ट गीतोपदेशच सर्वस्वीं मान्य असल्याचें दिसून येतें.

मनुष्य जसें कर्म करितो तसें त्याला फल येतें, हा कर्मफलाचा सिद्धांत उपनिषदांत अनेक ठिकाणीं प्रतिपादिला आहे. हें कर्म मानसिक, वाचिक, प्रत्यक्ष इत्यादि सर्व प्रकारचें असतें, व तें पुढील पुढील अवस्थांचें कारक असतें असें तेथें सांगितलें आहे.

यन्मनसा ध्यायति तद्वाचा वदति यद्वाचा वदति तत्कर्म कुरुते यत्कर्म कुरुते तदेव फलेन अभिसंपद्यते। यथाकारी यथाचारी तथा भवति। साधुकारी साधुर्भवति पापकारी पापो भवति। पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन।

असें बृहादारण्यकांत स्पष्ट वचन आहे. त्याला अनुसरूनच 'मरणोन्मुख शय्येवर' या कवितेंत श्री. सावरकर म्हणतातः

... ... कीं येथें पेरिलें अम्हीं
फुलत आणि फलत तेंच कथिति ते तिथें.
आणी मी पेराया कष्टलों असें
बीजें कीं तीं तीं जीं निवडुनी दिलीं
त्यांनींची ( साधूंनीं ) अत्युत्तम म्हणुनिया मला
पेरुं फलाशाविरहित--

तथापि या जगांत दिसणारा सर्व मायेचा पसारा क्षणभंगुर आहे, तो शाश्वत नाहीं, 'यद्दृष्टं तन्नष्टं।' अथवा, 'अन्तवंत इमे लोकाः' ही शिकवण श्री. सावरकरांच्या काव्यांत स्पष्ट रीतीनें आढळते. 'विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें' या कवितेंत हा बोध स्पष्ट रीतीनें दिला आहे. मात्र सांप्रतच्या पुस्तकाच्या ३४ व्या पृष्ठावर ही कविता छापतांना संपादकांनीं त्या कवितेचा पहिला ओजस्वी श्लोक कां दिला नाहीं, तें समजत नाहीं. माझ्या तत्कालीन स्मृतीप्रमाणें तो श्लोक असा आहेः

जे आसमुद्रवलयांकितभूप राजे
तेजें सकंप करणार महीस ते जे
ते स्वप्रधानवलयासह कीं निमाले
विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें ?

अशीं साम्राज्यें नाश पावतील यांत नवल नाहीं, कारण कवि म्हणतो त्याप्रमाणें

हा उन्नती अवनतीस समुद्र जातो
भास्वान् रवीहि उदयास्त अखंड घेतो
उत्कर्ष आणि अपकर्ष समान ठेले
विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें ?

पण हा दृश्य पसारा नाशवंत असला तरी त्याच्या आंतील अंतर्यामी आत्मा अविनाशी आहे हें तत्त्व मरणाच्या दारीं असतांनाही श्री. सावरकरांना प्रतीत झालें व त्यामुळेंच मृत्यूची अथवा देहरूपी जीर्णवस्त्र बदलण्याचा प्रसंग आला असतांही ही प्रतीति त्यांच्या 'आत्मबल' या कवितेंत स्फुरण पावली आहे. 'देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत।' हें वचन गीतेचा पाठ करितांना दरेकजण

घोकतो. पण त्या तत्त्वाचा कवचमंत्र म्हणून उपयोग करून खालील उद्गार किती जणांनीं स्वतः मरणाच्या दारीं असतांना काढले असतील ?

अनादि मी अनंत मी अवध्य मी भला
मारिल रिपु जगतिं असा कवण जन्मला ?
अग्नि जाळि मजसी ना खड्ग छेदितो
भिउनि मला भ्याड मृत्यु पळत सूटतो

यांत ' अच्छेद्योऽयमदाह्योऽयं ' या भगवद्गीतेंतील वचनाची व ' मृत्योः स मृत्युमाप्नोति ' या उपनिषद्वचनाची स्मृति कोणास होणार नाहीं ?

असा हा आत्मा केवळ स्वसंवेद्य आहे, तो इंद्रियगम्य नाहीं, हा बोध ' दृश्याच्या पलीकडे ' या कवितेंत उमटलेला आहे. दृश्य जग हें एखाद्या नाटकांतील रंगभूमीवरील पडद्याच्या पुढील देखाव्याप्रमाणें आहे, पण त्या सर्वांचें दिग्दर्शन करणारा सूत्रधार हा त्या पडद्याच्या पलीकडे असतो व तो सूत्रें हलवील त्याप्रमाणें पात्रांना अभिनय करावा लागतो, ही कल्पना जुनीपुराणी आहे.

क्षणं बालो भूत्वा क्षणमपि युवा कामरसिकः
क्षणं वित्तैर्हीनः क्षणमपि च संपूर्णविभवः
जराजीर्णैरङ्गैर्नट इव वलीमंडिततनुः
नरः संसारान्ते विशति यमधानीजवनिकाम्

हा भर्तृहरीचा श्लोक हा याच नाट्यकल्पनेचा वाचक आहे. हीच कल्पना श्री. सावरकरांनीं अशी मांडली आहे.

सूत्रधार अपुला । जरा तरि पडदा हा उचला
या दृश्याच्या पडद्यामागें कथिती कुणि मजला
रंगभूहुनी रंगकक्षची आश्चर्यी खचला

पण या रंगजवनिकेच्या आंत जाऊन पाहण्याचें भाग्य सूत्रधाराच्या प्रियजनांनाच लाभतें. हा सांप्रत कालाचा अनुभव या अनाद्यनंत रंगभूमीलाही लागू असल्यानें त्यांतील जगत्सूत्रचालकाला निष्कामकर्मयज्ञानें संतुष्ट करणारालाच तें भाग्य प्राप्त होतें, व तसें तें प्राप्त झालेले लोकच आत्मविश्वासाच्या बलानें असें अभिमानपूर्वक म्हणूं शकतात कीं,

त्रिरंगवाटी एक तिथें ती, तीमधुनी सकलां
दृश्यांसह नटवर्ग निपजतां आम्हीं पाहियला

व म्हणून त्यांनीं स्वतःसंबंधानें असे धन्योद्गार काढले कीं,

उचला उचला वा ! न ! धन्यची मम आत्मा धाला
तुझ्या जयें या रंगभूमिचा रंग पाहियेला !

परंतु हें दृश्यापलीकडचें दृश्य पहावयास चित्त स्थिर पाहिजे व तें कार्य तर फारच दुष्कर आहे ! अर्जुनासारख्या नारायणप्रिय नरानेंही भारतीय युद्धाच्या आरंभीं अशी कबुली दिली कीं,

चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद् दृढम्
तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम्

मग तसाच अनुभव येऊन श्री. सावरकरांनींही जर असे उद्गार काढले कीं,

मन हें चंचल भारी ! दुनिर्ग्रह भासलेंचि साधुजनां
जडर्जीव अनभ्यस्तचि त्यांत अम्ही, आंवरेचि तें मज ना

तर त्यांत आश्चर्य काय ? पण याला उपाय एकच आहे व तोही गीतेंत भगवंतांनीं सांगितला आहे तोच. ते म्हणतात :

अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते

असें हें वाऱ्यासारखें पळणारे मन अभ्यास व वैराग्य यांनींच काबूंत आणतां येतें व त्याचा शास्त्रशुद्ध आणि पद्धतशीर मार्ग म्हणजे पातंजल योगमार्ग होय. त्या पातंजलसूत्राच्या बाराव्या सूत्रांत ‘ अभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोधः ’ हें तत्त्व प्रतिपादिलें आहे. या सूत्राच्या टीकेंत त्याचें स्पष्टीकरण असें केलें आहे कीं,

“ आभ्यां विनिवृत्त बाह्याभिनिवेशानां चित्तवृत्तीनामंतर्मुखतया स्वकारणे चित्ते शक्तिरूपतयाऽवस्थाने सति निरोधाख्ये कैवल्याब्धौ चित्तनदी विलीयते ”

म्हणजे बाह्य विषयांपासून निवृत्त झालेल्या चित्ताचे वृत्तिप्रवाह अंतर्मुख होऊन स्वकारणभूत जें चित्त तेथेंच रुद्ध होऊन अखेर कैवल्यरूपी समुद्रांत विलीन होतात.

या योगसूत्रांचें प्रत्यक्ष आपण स्वतः आचरण केल्याचें श्री. सावरकर हे आपल्या ‘ सप्तर्षि ’ या काव्यांत सांगतात. ते म्हणतात :

परि करुनि चित्तवृत्तींचा तूं अपुल्या निरोध साम्यानें
मन हस्तगत स्ववशीं ठेविशि कीं खड्ग हा जसा म्यानें

असें सांगून त्यापुढें ते साक्षेपानें असें विवेचितात कीं,

ईशप्रणिधानाच्या उमजुनिया हृद्गता जसें जनकीं
गुण वर्तती गुणीं, मी साक्षी केवल तया निरंजन कीं

यांत २२ व्या योगसूत्राचा आधार दिला आहे. तें सूत्र

' योगप्रणिधानाद्वा । '

असें आहे. व त्याचा स्पष्टार्थ टीकाकारांनीं असा दिला आहे कीं,

वक्ष्यमाणलक्षणो यः ईश्वरः परमात्मा . . . तत्प्रणिधानाद् ' तज्जपस्तदर्थभावनम् ' इति वक्ष्यमाणात् धारणाध्यानसमाधित्रयतुल्यात् भवति ईश्वरानुग्रहः ।

म्हणजे तें चित्तैकाग्र्य ईश्वराच्या योगप्रसाधनानेंच प्राप्त होतें व मग त्या पुरुषाला ईश्वराचा अनुग्रह होतो. त्यासाठीं प्रकृतीच्या गुणपसाऱ्यापासून चित्त अलग ठेवावें लागतें, व ' गुणा गुणेषु वर्तन्ते इति मत्वा न सज्जते । ' अशी भगवद्गीतोक्त वृत्ति ठेवावी लागते. हेंच तत्त्व श्री. सावरकरांनीं ' गुण वर्ततीं गुणीं मी साक्षी केवल ' या चरणांत सांगितलें आहे. यापुढेंही जाऊन ते म्हणतात:

जें सत्य परमशाश्वत–तेथें स्थापुनि अचंचला मतितें
उपहसुनी तदितर या गुणवृत्तींच्या सहस्रविध गतितें

या आर्येंत ' गुणवृत्तिविरोधाच ' या तत्त्वाचें प्रतिपादन केलें आहे.

अशा प्रकारें कवि सांगतात :

... ... ... ... ...
चित्तैकाग्र्यासी मी साधित एकांत विगत षण्मासीं
ख्यात विवेकानंद प्रभु तो जो त्या महावितृष्णाचा
शिष्योत्तंस श्रीमान् भगवद्भूदेव रामकृष्णाचा
... ... ... ... ...
आम्हांसि कपिल पातंजलसूत्रित त्या सुसूक्ष्म सत्यांशीं
जडवस्तुशास्त्रभाषेंतचि तो पटवी, तदुक्तिनें पटतां
योग न गौप्य परी तें, शास्त्र करी एकतंतुता पटता

योग हें एक गौप्य नसून तें अभ्यसनीय शास्त्र आहे असें मला पटलें. त्यासाठी त्यांनीं श्रीरामकृष्ण परमहंस व श्रीमद्विवेकानंद यांना स्मरून

तत्रस्थ समाधिस्था तन्मूर्तिसि देवमूर्तिसमचि न तें
वंदुनि, नासाग्रीं कीं रोवियलेंची सद्दृष्टि म्यां मन तें

त्यांनाच ईश्वर मानून व भगवद्गीतोक्त उपदेशाप्रमाणें

संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन्
प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारि व्रते स्थितः
मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः

असें त्यांनीं योगसाधन केलें !

अशा मार्गांत असतांना यदाकदाचित् मृत्यु आला, तरी या जन्मांत आरंभिलेलें हें शुभकार्य पुढील जन्मांत आपल्यापुढें दत्त म्हणून येणारच आहे, हीही जाणीव श्री. सावरकरांच्या ' मरणोन्मुख शय्येवर ' या कवितेंत दिसून येते. तींत ते म्हणतातः

... ... ... स्मशानभूमिचा
परतटप्रदेश जो अनोळखी तिथें
सुखकर प्रवास करवि जें असें असे
ओळखिचें पत्र अम्हांजवळ त्या स्वयें
भगवान् श्रीकृष्णाचें—श्रीमतां गृहे
शुचीनां च ! बा गेहे योगिनामपि
' कश्चित् कल्याणकृच्च तात दुर्गतिम्
नहि गच्छति ' नहि गच्छति सांगती अणी

यांत ' नहि कल्याणकृत्कश्चित् दुर्गतिं तात गच्छति ' या व ' शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते । ' या भगवद्वचनांचा स्पष्ट उल्लेखच केलेला आहे.

अशा रीतीनें अनेक जन्मपर्यंत तपःसाधन करितां करितां निरिच्छ झाल्यावर जीवात्मा अखेर अशा अवस्थेला जातो कीं,

' यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते '

त्या अवस्थेला गेल्यावर महद्दुःखानेंही तो विचलित होत नाहीं. कारण

' यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम '

असें जें स्थान तेंच माझें घर असें भगवंत सांगतात. श्री. सावरकरांनीं ' मूर्ति दुजी ती ' या काव्यांत

योगिवराचा आत्मा, क्रूर हो, तया
आधींची गत तेथें: कीं ' विचाल्यते
गुरुणापि स दुःखेन न यत्र आगतः '

असें या स्थितीचें वर्णन तर केलें आहेच; पण त्यापुढें जाऊन ती अवस्था म्हणजे ' माझें घर ' असा निर्वाळा जर भगवान् देतात, तर तें घर आहे तरी कोठें तें पाहण्याचाही प्रयत्न त्यांनीं ' रुद्धद्वार ' या कवितेंत केला आहे. त्या प्रयत्नांत आलेल्या अनुभवांचें वर्णन ते असें करतातः

ज्या घरापासुनी मार्ग सर्व फुटणारे
येणार घरासी मार्ग त्याचि ते सारे

पण असें ऐकून त्या घराजवळ जावें तों प्रथम प्रथम अनुभव असा येतो कीं,

घ्यायासि विसावा माझ्या
जीवासि ये घरीं तुमच्या
ठोठावित थकलों ! अजुनि नुघडतीं बा रे
आंतूनि तुझीं तीं बंद सदोदित दारें

तेव्हां तो मार्ग सोडून देऊन कवि दुसऱ्या मार्गानें जातो. त्याचें वर्णन तो असें करितोः

ज्या गाति कथा राजांच्या
सोनेरि राजवाड्यांच्या
मी पथें पुराणज्ञांच्या
जावया घरा त्या त्यांच्या
चाललों युगांच्या क्रोशशिला गणितां रे
तों पथा-अंतिं घर एक तुझें तें सारें

अशा रीतीनें घर सांपडलें, तरी त्याचीं द्वारें बंदच. म्हणून कवीनें काय केलें ? तर

दुंदुभी नगारे शृंगें
गर्जती ध्वनींचे दंगे

क्रांतिचे वीर रणरंगें
बेभान नाचती नंगे
मी जात मिसळुनी त्यांत त्या पथें जों रे
अंतासि उभें घर तेंचि तुझें सामोरे !

अशा रीतीनें प्रयत्न करून शेवटीं कवि कंटाळतो व पंचतंत्रांत ज्याप्रमाणें एक आख्यायिका दिली आहे कीं, ‘ महाजनो येन गतः स पन्थाः । ’ हें सूत्र शिकलेले कांहीं पढिक विद्यार्थी महाजन वैश्यांची एक प्रेतयात्रा चालली होती तिच्याबरोबर चालले, त्याप्रमाणें सांप्रतचे कविही

क्रोदूनि आणखी कोठें
चिंता न किमपि करितां ते
ही मिरवणूक जी मातें
नटनटुनि थटुनि या वाटे
ये रिघूं तींत, तों नाचनाचतां मारे
पथ शिरे श्मशानीं !—

पण तेथें कवि पहातो तों चपापतो व म्हणतोः

—ज्यांत तुझें तें घर रे !

त्यामुळें अखेर सर्व लोकांचा संसर्ग कवीनें सोडला व

सोडुनी गलबला सारा
एकान्तपथा मग धरिला
ओसाडशा उजेडाला
चढउतार घेतां उंचनिंच वळणारे
अजि मार्ग तोहि ये त्याच घरासी परि रे !

तेव्हां कवीची खात्री झाली कीं, प्रल्हादानें सांगितल्याप्रमाणें भगवान् आब्रह्म-स्तम्भपर्यंतम् सर्वत्र व्यापून राहिला आहे व त्याचें घर सर्वत्र असून जेथें जावें तेथून तें दिसतें. भगवान् सर्व जगाचा स्वामी आहे व म्हणूनच त्याला जगन्नाथ म्हणतात. हा जगन्नाथ त्याच्या दगडाच्या प्रतीक मूर्तीप्रमाणें आपल्या घरांत बसून रहात नसून त्याची स्वारी सर्वत्र मोठ्या ऐश्वर्यानें फिरत असते. तिचें वर्णन कवि असें करतात :

या सूर्यशतांच्या किती मशाली जळती
मधुनीच शतावधि चंद्रज्योति या उडती
सरसरत बाण हे धूमकेतुचे सुटती
कितिदां आणि तरी । हीहि तैं । कितिदां आणि तरी
उठे चमकुनी राति पुरातन तिच्या अंधकारीं

म्हणून एकाद्या धृष्ट जीवात्म्याला, प्रत्यक्ष त्या जगन्नाथाला असें विचारण्याची इच्छा होते कीं,

ऐश्वर्यें भारी । या अशा । ऐश्वर्यें भारी
महाराज आपुली कथा ना कुठें निघे स्वारी ?

हा प्रश्न त्या जगन्नाथाला विचारावा कीं विचारूं नये ही शंका येऊन कवि ' जगन्नाथाचा रथोत्सव ' या आपल्या काव्यांत म्हणतात :

पुसूं नयेचि परी । पुसतसें । पुसूं नयेचि परी
मिरवणूक ही किमर्थ अथवा कुठें निघे स्वारी ?

जगन्नाथाच्या या स्वारीचें वर्णन बृहदारण्यक उपनिषदांतील चवथ्या अध्यायांतील तृतीय ब्राह्मणाच्या ३७ व्या परिच्छेदाची आठवण करवितें.

परब्रह्म परमात्म्याच्या स्वारीचें वर्णन तेथें असें दिलें आहे :

' तद्यथा राजानमायान्तं उग्राः प्रत्येनसः सूतग्रामण्यः अन्नैः पानैः आवसथैः प्रतिकल्पन्ते अयमायाति अयमागच्छति इति एवं हि इदं सर्वाणि भूतानि प्रतिकल्प्यन्ते इदं ब्रह्म आयाति इदम् आगच्छतीति ।

ज्याप्रमाणें एखाद्या राजाची स्वारी आली असतां उग्र, प्रत्येनस, सूतग्रामणी इत्यादि त्याचे अनेक दर्जाचे अधिकारी अन्न, पेयादि वस्तू नजर करण्यासाठीं घेऊन पुढें धावतात व ' महाराजांची स्वारी आली, राजाधिराजांची स्वारी आली ' असें पुकारतात, त्याप्रमाणें परमात्म्याची स्वारी येतांना सर्व प्राणी महाराज आले, अधिराज आले म्हणून ओरडतात.

तथापि परमात्म्याची ही स्वारी सखल जमिनीवरून पहाणाऱ्यांमध्येंही दरेकाची दृष्टि त्या स्वारीकडे जाण्याच्या मार्गांपैकीं एकेका भागालाच पाहूं शकते. अर्थात् ज्याला ती जशी दिसते, तसेंच तो तिचें वर्णन करितो, व म्हणून भक्ति, कर्म, ज्ञान, इत्यादि मार्गांचें वैशिष्ट्य ते ते लोक प्रतिपादतात; पण उच्च विचारांच्या

टेकडीवरून जर द्रष्टा त्या स्वारीकडे पाहील, तर हे सर्व विरोध त्याच्यापुढें अत्यंत सूक्ष्मरूप धारण करतील व त्याला त्या स्वारींतील मुख्य विभूतीचें दर्शन उत्कृष्ट तऱ्हेनें होऊं शकेल. म्हणून ' सप्तर्षि ' या काव्यांत कवि म्हणतातः

... ... ... ... ... ... ...

परि अचलाधिपशिखरीं निश्चल कांहीं मुहूर्त राहुनिया
विस्तीर्ण आसमंतात् भूमीचा चित्रपट अशेषतया
दृष्टिक्षेपीं घे त्या नाढळतो तो विरोधदोष तया
एक्याचि द्यौस्तनाच्या पिउनि पयासी अनंत मार्गानें
प्रभु नियत कर्म करितो ... ... ... ...
... ... ... ... ... ... ...
एकाचि नद नद्या त्या अंतीं आलिंगिती नदेशातें:
ज्ञानभक्तिकर्मादिक धर्ममतें तेंवि साम्यता वरुनी

अशा प्रकारें परमेश्वरप्राप्तीचे मार्ग अनेक दिसले, तरी सर्व मार्ग अखेर एकाच ठिकाणीं पोंचतात, असा निर्वाळा भगवद्गीतेंतही श्रीकृष्णांनीं दिला आहे.

पण परमेश्वरप्राप्ति अथवा परब्रह्मप्राप्ति अथवा मोक्षप्राप्ति म्हणजे काय, याही प्रश्नावर नाना मतें प्रसिद्ध आहेत. द्वैतवादी म्हणतात, परमेश्वरांत व जीवांत स्वरूपतःच भेद असल्यानें त्यांचें ऐक्य होणेंच शक्य नाहीं; फारांत फार म्हणजे जीव त्या परमात्म्याच्या अखंड सांनिध्यांत व सेवेंत राहूं शकेल इतकेंच. विशिष्टाद्वैती म्हणतात, परमात्मा व जीवात्मा यांत स्वरूपैक्य आहे, पण जीव हा देहोपाधीमुळें कांहीं काळपर्यंत परमात्म्यापासून निराळा होतो, तो ती उपाधि संपतांच परत परमात्मस्वरूपांत येऊन लीन होतो व शंकराचार्यासारखे 'केवलाद्वैती म्हणतात, कीं जीव हा परमात्म्यापासून भिन्न होतो व असतो ही भावना म्हणजेच माया होय. ही खोटी भावना नष्ट होणें याचेंच नांव मोक्ष. कारण ती नष्ट झाली म्हणजे जीवशिवाचें जें ऐक्य अखंड कायमच असतें तें प्रतीत होतें व त्या उभयांतील पूर्ण अभेदाची जाणीव होते, तोच मोक्ष होय. श्री. सावरकरांचें काव्य कांहीं केवळ कै. बाबा गर्द्यांच्या ' गीतामृतशतपदी ' प्रमाणें तत्त्वज्ञानाच्या सिद्धान्तांची पद्यमय आवृत्ति नव्हे. तरी पण त्यांतून जो ध्वनि निघतो, त्यावरून अनुमान काढावयाचें झालें, तर रामानुजाचार्यांच्या व शंकराचार्यांच्या अशा दोनही तत्त्वज्ञांच्या मतांचा अनुवाद तींत निघूं शकतो. उदाहरणार्थ :

' सप्तर्षि ' या कवितेंत ते म्हणतातः

तुमचें अम्हांत ऐसें अमुचें तुम्हांत रूप ओसरतें
सरतें रूपद्वैत प्रकट तरी सत्त्व एकची उरतें

त्याचप्रमाणें ' मरणोन्मुख शय्येवर ' या कवितेंतही ते म्हणतातः

विपलांतचि हा माझा ' मी ' हि कीं जरी
विश्वाच्या अंतर्हित ' मीं ' त मावळे

यावरून विशिष्ट अद्वैत मतांची छाप कवीच्या विचारांवर पडलेली दिसून येते व ' सप्तर्षि ' या कवितेंत त्यांनीं ' श्रीभाष्याची विणतां पावन वाक्-कुसुम-शुभ्र माला ही ' मीं धारण केली असा श्रीरामानुजाचार्यांच्या ' श्रीभाष्याचा ' गौरवपूर्वक स्पष्ट उल्लेखच केला आहे, त्यावरून वरील अनुमानाला पुष्टि मिळते. पण ' मरणोन्मुख शय्येवर ' या कवितेंत त्यांनीं जे असे उद्गार काढले आहेत कीं,

...स्वर्ग जीव बंध कर्म वा
ऐहिक तें इंद्रजाल मात्र...

त्यावरून श्रीशंकराचार्य म्हणतात त्याप्रमाणें विश्वाचा हा भिन्नरूपात्मक दिसणारा फापटपसारा हें केवळ इंद्रजाल म्हणजे माया आहे, असें श्री. सावरकरांचें मत असल्याचा ध्वनिही निघतो. मग या दोहोंत त्यांचें दृढ मत कोणतें आहे, हें ते स्वतःच सांगू शकतील.

पण यांपैकीं कोणतेंही मत सत्य मानलें, तरी त्याप्रमाणें जीवानें सर्वेश्वर परमात्म्याची उपासना केली पाहिजे हें प्राप्त होतें. पण या जगांत अशी कोणती वस्तु आहे कीं, जी परमेश्वराहून भिन्न आहे ? तेव्हां अशीं कोणतीं भिन्न साधनें वा पूजाद्रव्यें आपण त्याला अर्पण करूं शकूं कीं, जीं त्याचीं नव्हेत ? अर्थात् जगांत तद्भिन्न कांहींच नसल्यानें त्याची पूजा, आरती वगैरे करणें म्हणजे त्याच्याच वस्तु घेऊन परत त्यालाच अर्पण करणें होय. गंगोदकानेंच गंगेला अर्घ्य द्यावयाचें, त्याप्रमाणेंच ही कृति होय. याच कृतीला श्री. सावरकरांनीं एक सुंदर कौटुंबिक उपमा दिली आहे, व ती त्यांच्या अखेरच्या ' अनंताची आरती ' या कवितेंत आढळते. तींत ते म्हणतात :

निरंजनासी निरांजनाचा देवा दीप तुला
दाविती देवा दीप तुला
आईच्याची बागेमधुनी
ताजीं ताजीं वेंचुनि वेंचुनि
मुली गुंफिती आईच्याची वेणींतूनि फुला
दाविती देवा दीप तुला

येणेंप्रमाणें श्री. सावरकरांच्या काव्यांतील तत्त्वदर्शन आपण केलें. श्री. सावरकरांचें जीवनच कांहीं ठराविक तत्त्वांच्या आचरणाच्या स्वरूपाचें असल्यामुळें त्यांचे काव्यात्मक उद्गारही त्याच तत्त्वांचे पडसाद असावे, हें उघड आहे व म्हणून त्यांतून तत्त्वज्ञानाचा अर्थ ओढूनताणून काढण्याची जरूरच पडत नाहीं; किंवा पोकळ पांडित्यप्रदर्शन करण्याकरितांही ते साद त्यांत उमटविलेले नाहींत. ज्यावेळीं या कविता त्यांनीं रचिल्या, त्यावेळीं त्या कोणाला कधींकाळीं दिसतील, ही कल्पनाही त्यांना स्वप्नांत येण्यासारखी नव्हती. अर्थात् ते उद्गार केवळ आत्मप्रतीतीचे द्योतक आहेत. व म्हणूनच ते खऱ्या तत्त्वज्ञानाचे निदर्शक आहेत. 'आधीं केलें मग सांगितलें' अशा योग्यतेचे कवि सांप्रत महाराष्ट्रांत तरी असलेच तर अगदीं विरळ आहेत. अशा स्थितीत त्या कोटीचा एक अत्यंत श्रेष्ठ कवि महाराष्ट्राला लाभला आहे, ही महाराष्ट्राच्या भाग्याची गोष्ट आहे. अशा कवीसंबंधानेंच समर्थ रामदासांनीं खालील प्रकारचे उद्गार काढले आहेतः

अध्यात्मग्रंथांची खाणी । कीं हे बोलके चिंतामणी
नाना कामधेनूंचीं दुभणीं । वोळली श्रोतयांसी
कवि स्वधर्माचा आश्रयो । कवि मनाचा मनोजयो
कवि धार्मिकाचा विनयो । विनयकर्ते
कवि व्युत्पन्नाची योग्यता । कवि सामर्थ्यवंतांची सत्ता
कवि विचक्षणाची कुशलता । नाना प्रकारे
परोपकाराकारणें । नाना निश्चय अनुवादणें
शेखीं बोलिजे पूर्णपणें । संशयातीत.

हे उद्गार खरे नव्हेत, असें कोण म्हणेल ?

# " सावरकरांची कविता "

## प्रो. वसंत नारायण नाईक, एम्. ए.

काव्य हें ललित वाङ्मयाचें उत्तमांग समजलें जातें. ' जें न देखे रवी तें देखे कवि, ' असा कवीचा महिमा सांगण्यांत येतो. वर्तमानकाळाच्या काळ्याकुट्ट पडद्यावर भविष्यकाळाची सुवर्णमय आकृति चितारणें हें कार्य कवि जितकें सरस व ज्या हृदयस्पर्शी शब्दांत करूं शकतो तसें कार्य कोणताही लेखक करूं शकत नाहीं. मात्र हा कवि कवीच असावा लागतो.) काव्य हें त्याच्या व्यवसायाचें किंवा आयुष्यांतील इतर व्यवहाराचें एक अंग आहे. त्याच्या हातून काव्यद्वारा जगाला किंवा स्वदेशाला स्फूर्तिदायक संदेश मिळूं शकत नाहीं, म्हणून आपण होमर, डांटे, मिल्टन, शेक्सपिअर, वाल्मीकि आणि व्यास यांना जगाच्या इतिहासांत श्रेष्ठतम कवि म्हणून मानतों व त्यांच्या काव्यांचा रसास्वाद आजही घेतों. यांपैकीं डांटे आणि मिल्टन यांनीं आपआपल्या वेळेच्या राजकारणांत—क्रांतिकारक चळवळींत पूर्णपणें भाग घेतला होता. व तींत त्यांचें जीवितसर्वस्व होरपळूनही निघालें होतें आणि त्यामुळेंच या कवींचीं महाकाव्यें मध्ययुग आणि सतरावें शतक या युरोपांतील दोन कालखंडांतील विचारसर्वस्वाचें भावनारूपी मंथन करून काढलेलें नवनीत अशा दर्जाचीं आजही समजलीं जातात. डांटे यानें आपल्या जगांत लढाया मारल्या, स्वपक्षातर्फे राजकारणांत भाग घेतला व अनेक हालअपेष्टा भोगून कारागृहवासही सोसला. परंतु आतां तो महान् कवि म्हणूनच ओळखला जातो. मिल्टननें क्रॉमवेलच्या काळांत असेंच राजकारण लढविलें व त्याबद्दल पुढील युगांत म्हणजे दुसरा चार्लस गादीवर आला असतां त्याचें शिरही घेतलें गेलें असतें. परंतु ड्रायडन कवीनें त्याला वांचविलें आणि आतां त्याचें नांव महान् कवि म्हणूनच अजरामर ठरलें आहे. बॅ. सावरकर यांनीं काव्य लिहिलें पण काव्य हें त्यांचें जीवितसर्वस्व नव्हतें आणि नाहीं. त्यांचें कार्य निराळें ठरलें व स्वातंत्र्यवीर म्हणूनच त्यांची स्तुति हिंदुस्थानांत कायम उरेल. कोणत्याना कोणत्या कार्यक्षेत्रांत मनुष्य थोर पदास पोहोंचला, स्वकर्तृत्वानें जनतेच्या आदरास पात्र ठरला, एका विशिष्ट समाजाच्या गळ्यांतील ताईत बनला, म्हणजे अर्थातच त्याच्या प्रत्येक इतर कृतीबद्दल कुतूहल उत्पन्न होतें

व त्या कृतींत विशेष काय आहे, त्याच्या जीविताचे कोणते पडसाद आपणांला त्या विवक्षित कृतींत आढळतात हें अजमावयाची मनुष्याला सहजच जिज्ञासा होते. आमच्यापुढें ज्या काव्यगुच्छाचीं पानें आहेत त्याच्या परिचयासंबंधानें असेंच आहे. सावरकरांच्या कवितांनीं त्यांना थोर पद दिलें नसून त्यांच्या इतर थोर कार्याच्या प्रकाशांत त्यांचें काव्य थोर दिसतें. हा दृष्टिकोन कायम ठेवून आपण त्यांचें काव्य वाचलें पाहिजे. त्याचा आस्वाद घेतला पाहिजे. स्वतंत्र कवि, शब्दसृष्टीचे ईश्वर अशा भावनेनें या गुच्छाचा सुवास घेण्यास उद्युक्त होणें व निराशा झाल्यास त्याला नाकें मुरडणें ही वृत्ति या बाबतींत योग्य ठरणार नाहीं. अशा मर्यादित भावनेनें हा कवितासंग्रह चाळला तर आपणांला काय सांपडतें हें आपण थोडक्यांत पाहूं या. कारण मी असें ऐकतों कीं, या संग्रहाचें परीक्षण याच ग्रन्थांत निरनिराळ्या लेखकांनीं त्याचें योग्य वर्गीकरण करून व वाङ्मयसमीक्षा म्हणून केलें आहे. छन्द, वृत्त, प्रास, पदलालित्य वगैरे केवळ वाङ्मयीन टीकेचा उपद्व्याप सोडून व तें कार्य तज्ज्ञांकडे सोंपवून केवळ सामान्य वाचक या दृष्टीनें मला काय वाटतें हें मी आतां सांगणार आहें.

हें काव्यवाङ्मय वरवर चाळणाऱ्याच्याही लक्षांत एक गोष्ट आल्याशिवाय राहात नाहीं. आणि ती ही कीं, सावरकरांच्या **स्वातंत्र्यप्रीतीभोंवतींच ही काव्यमाला गुंफलेली** आढळते. काव्याचा विषय कोणताही असो, त्याचें ध्रुवपद नेहमीं स्वातंत्र्य, बंधविमोचन, तदंतर्गत दुःख, संताप, कित्येक वेळां निराशा, कित्येक प्रसंगीं उत्साह व एकंदरीनें पाहतां प्रोत्साहनपर संदेश हेंच असलेलें प्रतीत होतें. जर या जगीं जीव हा खरोखरीच प्रेमभावें नटला असला तर सावरकरांपुरतें या प्रेमाचें वर्णन करावयाचें झाल्यास तें प्रेम स्वातंत्र्यप्रेम असेंच करावा लागेल. त्यांच्या अंतः-करणाला दुसरा कोणताही विषय इतका मोहित करूं शकत नसेल. कवि प्रेमाचीं गाणीं गातो असें म्हणतात. सृष्टींत, मानवाच्या परस्परव्यवहारांत त्याला प्रेमच ओतप्रोत आढळतें. आणि काव्यांत सारे नवरस शृंगारराजाच पिऊन उरतो व स्वतःला व वाचकाला आनंदानें भारतो असें प्रेमी कवि सांगतो. पण हें सर्वथैव खरें म्हणतां येणार नाहीं. भावगीत हा काव्याचा जो एक भाग आहे यांत या रसाचें दर्शन कदाचित् आपणांला विशेष आढळेल. पण कवितेचा आत्मा प्रेम आणि मानवी हृदय यांचा संयोग हाच आहे, असें जरी घटकाभर मानलें तरी तें प्रेम केवळ लैंगिक असलें पाहिजे, त्यांत शृंगारच आला पाहिजे, असें नाहीं. आणि

उत्तम काव्यांत या प्रेमाला केव्हांही गौणच स्थान दिलेलें आढळेल. इंग्रजी काव्याचाच विचार केल्यास व आद्यकवि चॉसरपासून तों थेट हार्डी आणि ब्रिजिसपर्यंत त्या काव्याचें पर्यालोचन केल्यास त्यांत शृंगारराजाला प्राधान्य दिलेलें व तोच एक नवरस पिऊन उरतो व जीवाला प्रेमभावनेनें नटवितो अशा तऱ्हेनें लिहिलेलें काव्य मोठ्या प्रमाणांत आढळणार नाहीं. उलट देशाभिमान, स्वातंत्र्यप्रेम, स्वार्थत्याग यांच्या भावना उद्दीपित करून हृदयाच्या तारा हलविणारें काव्यच अधिक आढळेल. सावरकरांचा प्रस्तुत काव्यगुच्छ स्वातंत्र्याच्या उत्कट प्रेमानें भारलेला आढळतो असें वर सांगितलें. त्यांत याव्यतिरिक्त इतर कोणतीही भावना विरळाच आढळते. आपला देश पारतंत्र्यांत गचला आहे, त्याला त्यांतून सोडवण्याचे प्रयत्न केले पाहिजेत, त्याप्रीत्यर्थ राष्ट्रांतील हरएक व्यक्तीनें तळमळीनें कार्य केलें पाहिजे, आपल्या गतकालाच्या इतिहासाचा उपयोग या तत्त्वास पोषक असाच केला पाहिजे, ही एकच दृष्टि ठेवून हिंदुत्वाची व्याख्या केली पाहिजे, अखिल भारतीय संस्कृतीचें आलोडन करून राष्ट्राला पोषक असेंच तिचें रहस्य ओळखण्यास शिकलें पाहिजे, हेंच सावरकर–चरित्राचें व चारित्र्याचें सर्वस्व असल्यामुळें त्यांच्या उक्तींत व कृतींत यावेगळें कांहींच प्रत्ययास येत नाहीं. सावरकरांचें तारुण्य व त्यांची वृद्धावस्था यांच्यामध्यें अनुभव, संकटपरंपरा, भयंकर दिव्याचा शरीर आणि मन यांच्यावर होणारा अपरिहार्य परिणाम, यांमुळें फरक आढळला तरी तो साधनमार्गाचाच आढळेल, साध्याचा आढळणार नाहीं; हें लक्षांत वागवून त्यांच्या चरित्रसागरावरील केवळ लहरी अशी त्यांची कविता वाचल्यास तींत आपणांला स्फूर्तिदायक होणारा, त्याचप्रमाणें दुःखद प्रसंगांतूनही आनंद देणें हें जें काव्याचें एक लक्षण शेलेनें सांगितलें आहे तसा भाग बराच आढळेल. त्यांची कविता ज्याप्रमाणें इंग्रजी वाङ्मयांतील वर्डस्वर्थ, शेले, बायरन किंवा स्विन्बर्न यांच्या तोडीची ठरणार नाहीं, त्याचप्रमाणें मराठी वाङ्मयांतही तिचें स्थान केशवसुत किंवा गडकरी या आधुनिक कवींच्या पंक्तींत नाहीं. आणि याचें कारणही उघड आहे. आणि तें हें कीं, सावरकर हे 'विचारक' असले तरी 'प्रचारक' व 'आचारक' आहेत. त्यांना स्वातंत्र्याचीं केवळ गाणींच गावयाचीं नसून किंवा 'सुधारक' अथवा 'बंदीशाळा' सारखें काव्य लिहावयाचें नसून प्रचार आणि आचार या दोन्ही मार्गांनीं स्वातंत्र्य, सुधारणा व बंधविमोचन स्वप्नसृष्टींतून सत्यसृष्टींत उतरवावयाचें आहे. आपल्या आयुष्याचे ऐन उमेदींत या कार्याला

पतकरून त्यांनीं जें सतीचें वाण उचललें त्याच्याशीं त्यांनीं उतारवयांत प्रतारणा केलेली नाहीं. दारिद्र्य, संकट, छळ, कारागृहवास, सरकारची वक्रदृष्टि, हद्दपारी, सजा आणि सरतेशेवटीं मुक्त असूनही बंदिवानाची स्थिति या सर्व अवस्थांतून गेलेल्या व्यक्तीस कोणींही देशाभिमान, देशभक्ति आणि स्वार्थत्यागाचे धडे दिले पाहिजेत असें नाहीं. या निरनिराळ्या स्थित्यंतरांची पूर्ण छटा त्यांच्या काव्यांत आपणांस आढळेल आणि त्याबरोबरच त्यांतून आपणांला त्यांच्या जिवंत आशावादाचेंही दर्शन मिळेल. त्याचीं कित्येक ठळक उदाहरणें देऊन हें ओझरतें दर्शन पुरें केलें पाहिजे.

या गुच्छांतील पहिलेंच पुष्प " स्वतंत्रतेचें स्तोत्र " हें आहे. त्या स्तोत्रांतील पुढील पंक्ति पहा:

जें जें उत्तम उदात्त उन्नत महन्मधुर तें तें
स्वतंत्रते भगवती! सर्व तव सहचारी होतें
तुजसाठिं मरण तें जनन
तुजवीण जनन तें मरण
तुज सकल चराचर शरण

आणि

जीव तळमळे, कां तूं त्यजिलें उत्तर याचें दे
स्वतंत्रते भगवति! त्वामहं यशोयुतां वंदे

या पंक्तींत सावरकरांचें हृदयसर्वस्वच सांठविलें आहे. त्यांचें एकंदर आयुष्य याच मंत्रानें, आशेनें, त्या आशेंतून उत्पन्न होणाऱ्या विषण्णतेनें व त्याबरोबरच तत्संलग्न निश्चयाच्या बळानें भारलेलें अनुभवास येतें. आपणांला जो संदेश मिळाला तो इतरांना सांगून त्यांचींही मनें याच मंत्रानें भारलीं जावींत व हरएक प्रकारच्या स्वातंत्र्यकार्याला स्फूर्तिदायक अशी त्यांची सहानुभूति मिळावी याकरितांच त्यांनीं कविता लिहिल्या आहेत व उत्तरवयांतही ते तन्मयतेनें, तरुणाच्या उत्साहानें व धडाडीनें तेंच जीवितकार्य चालवीत आहेत. काव्याचें एक लक्षण एका इंग्रजी टीकाकारानें Communication of significant experience असें केलें आहे. स्वातंत्र्याची तळमळ, तें स्वदेशाला कोणत्या मार्गानें प्राप्त होईल याचें अहर्निश चिंतन, त्याप्रीत्यर्थ वाटेल तें दिव्य करण्याचा मनाचा ठाम निश्चय व तीच आयुष्याची सार्थकता, या सर्व साध्य-साधनांचा समुच्चय हा त्यांच्या

कार्याचा महत्त्वाचा अनुभव नाहीं असें कोण म्हणूं शकेल ? अर्थात् तोच अनुभव काव्यद्वारें आपणांला ते देतात हें उघड आहे. शेले कवीनें कवि काय करतात याचें गमक They learn in suffering what they teach in song असें सांगितलें आहे. आणि काव्य हें सावरकरांच्या कर्तृत्वाचें गौण अंग असल्यामुळें त्यांच्या कवितांतून तर शेलेच्या वरील वचनाचा आपणांला चांगलाच पडताळा मिळतो. उदाहरणार्थ, त्यांची " कोकरूं " ही कविता घ्या. त्या कवितेंत रानांत चुकलेल्या कोंकराचें वर्णन केल्यानंतर सरतेशेवटीं सावरकर काय म्हणतात तें पहाः

स्वातंत्र्य जयांचें गेलें
परक्यांचे बंदी झाले
त्रिभुवनीं सुख न ज्यां कसलें। कीं खरें

त्यांत human touch असेल तर तो इतकाच कीं, कोंकराची माता त्याला परत मिळाली, तें आनंदांत नाचूं लागलें, त्यासमयीं कवीला आपल्या मातेची आठवण होऊन तो हळहळतोः

हे प्रभो ! हर्षविसि यासी
परि मला रडत बसवीसी
मम माता कां लपवीसी। अजुनि रे ?

Blake या कवीचें Lamb वरील छोटें गीत वाचलें व त्यांतील विचार मनांत आणले, आणि सावरकरांचें कोकरूं हें काव्य पाहिलें म्हणजे पहिला कवि गूढवादी असला तरी सृष्टींत आढळणाऱ्या विसंगतीकडे डोळेझांक करणारा नाहीं हें जसें लक्षांत येतें, तसेंच दुसरा कवि, कोंकराला स्वातंत्र्य व समता पाहिजे असते, त्याशिवाय त्याचें कोणींही कोडकौतुक केलें तरी त्याचें दुःख ओसरत नाहीं, या भावनेभोवतीं प्रत्यक्ष व्यवहाराचीच उपासना करतांना कसा रंगतो, हें कळून येतें.

यानंतरचीं प्रासंगिक व ऐतिहासिक कवनें सोडून आपणांला पुढें गेलें पाहिजे. पान ६५ वरील ' हिंदसुंदरा ' ही कविता त्यांनीं लंडन येथें लिहिली असून त्यांत आपल्या मायभूमीच्या प्राचीन वैभवाची व उज्ज्वल परंपरेची साक्ष देऊन अशी ही जननी परकीयांच्या दास्यांत कशी पचेल असा सवाल त्यांनीं केला आहे. ते म्हणतातः

देइ अशा प्रसवा जिचा धन्य कुसवा
वसुमति ती, दासी कां क्षण तरि राहो ती ?

यापुढेंच त्यांची ‘ प्रियकर हिंदुस्थान ’ ही कविता आहे. तींत हीच भावना उत्कट स्वरूपांत व्यक्त केली आहे. या कवितेंतील दोनच ओळी येथें देतों. एकः

जिच्यास्तवचि त्या कुमारिकांसी विस्तवांत ये न्हाण !

आणि दोनः

जननि ! जगत्त्रयिं शक्त कोण जो करिल तुझा अपमान
प्राणदानसंसिद्ध असुनि त्वत्त्रिदशकोटि संतान ?

या दोन्ही कवितांतून सावरकरांचा जळजळीत व ओतप्रोत देशाभिमान व्यक्त होतो. मात्र या दोन्ही कवितांची चाल शारदा नाटकांतील “ घेउनि ये पंखा ” आणि “ म्हातारा इतुका ” या दोन गाण्यांची त्यांनीं उचलली आहे हें योग्य वाटत नाहीं. कारण शारदा नाटकांतील उपहासाला जें योग्य तें या दोन कवितेंत व्यक्त होणाऱ्या गंभीर विचाराला शोभत नाहीं हें खचित. वर दिलेल्या या दोन कवितांतील पंक्तीला इंग्रजी कवि ग्रे यानें केलेलें कवितेचें वर्णन तंतोतंत लागू पडतें. तो म्हणतो, काव्य आणि गद्य यांच्यांतील फरक सांगावयाचा असेल तर तो पहिल्याचें वर्णन Thoughts that breathe and words that burn असें करूनच दाखवावा लागेल. यानंतर आपण त्यांची ‘ सांत्वन ’ ही कविता अवश्य वाचली पाहिजे. आपल्या भावजयीचें त्यांनीं, या कवितेंत त्यांच्या पतींना जन्मठेप झाली असतां सांत्वन केलें आहे. त्या कवितेंतील तिसरा भाग विशेष हृदयस्पर्शी व स्वात्मार्पण-दर्शक अशा प्रतिज्ञेचा आहे.

अमर होय ती वंशलता । निर्वंश जीचा देवांकरितां
दिगंतीं पसरे सुगंधता । लोकहितपरिमळाची
एकदां नवरात्र संपली । नव माला पूर्ण झाली
कुलदेवी प्रकटेल काली । विजयलक्ष्मी पावन

‘ माझें मृत्युपत्र ’ हें काव्य त्यांनीं स्वतःवर असाच घाला पडला असतां आपल्या वहिनीकडे शेवटचा निरोप म्हणून रवाना केलें. त्या पत्रांतील तिसऱ्या व चौथ्या पादांत त्यांनीं स्वतःच्या प्राणाहुतीचें मर्म व कार्य सांगितलें आहे.

दीप्तानळांत निजमातृविमोचनार्थ
हा स्वार्थ जाळुनि अम्ही ठरलों कृतार्थ

*   *   *

जें दिव्य दाहक म्हणूनि असावयाचें
बुद्ध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें !

यांत व्यक्त केलेल्या भावना कोणत्याही उत्तम Patriotic Verse च्या मालिकेंत शोभण्यासारख्याच आहेत. वर शेलेचें जें एक वचन दिलें आहे त्याचें उत्तम उदाहरण दुसरें देतां येणार नाहीं. ‘ मृत्युपत्र ’ आणि ‘ सांत्वन ’ या दोन कविता वाचून सावरकरांच्या पुढील आयुष्याचा जो कोणी विचार करील त्याची जिव्हा ‘ यांत केवळ कृत्रिम भावना आहे ( Spurious Sentiment )’ असे शब्द उच्चारूं शकणार नाहीं. उलट, या कविता वाचून प्रत्यक्ष अनुभवाच्या मुशींतून जी कविता बाहेर पडत नाहीं ती कविताच होत नाहीं असें म्हटल्याशिवाय राहावत नाहीं. स्वतःला प्रियतमा नसून तिच्या कुरळ कुंतलांवर काव्य करणें व प्रेमानें बेहोश झाल्याची बतावणी करणें सोपें आहे. परंतु सावरकर स्वतः असे कवि नसून त्यांचें हें उत्तर त्यांच्यावर आलेल्या प्रत्यक्ष संकटांतून व उचंबळलेल्या अंतःकरणाचे उद्गार असल्यामुळें आपलें मनही हलवून सोडतात. आंदरे नांवाच्या फ्रेंच टीकाकारानें कविता कशी निर्माण होते हें पुढील शब्दांत सांगितलें आहे. तो म्हणतोः-- Poetry is the sister of sorrow; every man that suffers & weeps is a poet; and every heart a poem.

वास्तविक पहातां या गुच्छाचा निरोप येथेंच घेतला पाहिजे. कारण, यापुढची त्यांची कविता त्यांनीं अंदमानांत लिहिली आहे. केवळ स्वतःच्या मनाला विरंगुळा घालण्याकरितां व वर्णनात्मक अशीच ती लिहिली असल्यानें ‘ मृत्युपत्र ’ आणि ‘ सांत्वन ’ यांच्या जोडीला बसणारी अशी नाहीं. देशप्रेमानें व ऐक्याच्या भावनेनें ओतप्रोत भरलेल्या तदनंतरच्या कोणत्याही एका कवितेचा उल्लेख करावयाचा झाल्यास ती कविता ‘ तुम्हि अम्ही सकल हिंदू । बंधुबंधू ’ हीच सांगावी लागेल. त्यांतील प्रत्येक पंक्ति राष्ट्राभिमानी व राष्ट्रैक्याचा झेंडा मिरवणाऱ्या प्रत्येक हिंदी व्यक्तीनें हत्पटलावर खोदून ठेवण्याइतकी महत्त्वाची व खऱ्या देशभक्ताला मार्ग दाखवणारी अशीच आहे यांत संशय नाहीं.

सावरकरांनीं कविता लिहिल्या, नाटकें रचलीं, भाषणें केलीं, त्यांत एकच मुख्य हेतु असल्याचें वर सांगितलें. आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळावें याकरितांच

त्यांनीं हा सर्व उद्योग केला. याशिवाय केवळ काव्याकरितां काव्यनिर्मिति करणें हें त्यांचें ध्येय नव्हतें. म्हणून वर्डस्वर्थ कवीनें स्वतःच्या कवितेबद्दल जें म्हटलें आहे तें सावरकरांच्या काव्यकृतीलाही तंतोतंत लागू पडतें. Take me as a teacher or nothing असें वर्डस्वर्थ म्हणत असे. वर उल्लेखिलेल्या 'माझें मृत्युपत्र' या कवितेंत या हेतुपूर्ण कार्याचा आपणांला असंदिग्ध भाषेंत पुरावा मिळतो तो असा. ते म्हणतातः

हे मातृभूमि! तुजला मन वाहियेलें
वक्तृत्व वाग्विभवही तुज अर्पियेलें
तूंतेंचि अर्पिलि नवी कविता रसाला
लेखाप्रती विषय तूंचि अनन्य झाला.

म्हणजे या कविता त्यांनीं केवळ स्वतःची करमणूक करण्याकरितां लिहिलेल्या नसून त्यांनीं सबंध आयुष्यांत जें कार्य पतकरलें, त्याला पोषक असें जें विचारांचें वा भावनांचें खत घातलें, त्या प्रयत्नांचेंच शब्दचित्र त्यांनीं यांत रेखाटलें आहे. आणि आज त्या वाचल्या असतां त्या आयुष्याचें मर्म कशांत आहे हें उत्तम प्रकारें कळण्यास मदत होत असल्यामुळें या कवितांचें वर्णन human document असें केल्यास चूक होणार नाहीं. या दृष्टीनें पहातां या काव्य-गुच्छाचें महत्त्व अधिक वाटतें. केवळ वाङ्मय म्हणून याची योग्यता वर दर्शविल्याप्रमाणें थोर नसेल. तें अभिजात ठरेल किंवा नाहीं याचा आपणांला आज विचार करावयाचा नाहीं. हरिभाऊ आपट्यांच्या शब्दांत बोलावयाचें झाल्यास तें 'विदग्ध' आहे यांत संदेह नाहीं. त्यांच्या चरित्रदर्शनाचा एक महत्त्वाचा भाग म्हणून त्यांचें महत्त्व आहे व त्यांतील हृदयस्पर्शी भाग केव्हांही चिरंतनच म्हणावा लागेल. आणि या पर्यालोचनांत लेखकानें त्याच भागाकडे वाचकांचें लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला आहे. सावरकरांचें कार्य, त्यांच्या आयुष्याची फलश्रुति कशांत आहे असें विचारल्यास त्याचें उत्तर एका इंग्रजी कवीनें लिहिलेल्या Pioneers या काव्यांत मिळतें. त्यांतील पुढील ओळी येथें समारोपादाखल देऊन त्यांच्या काव्याचा निरोप घेतों.

He is the pioneer who climbs,
Who dares to climb,

His own high heart,
Although he falls
A thousand times;
Who dares to crawl
On bloody hands and knees
Along its stony ecstacies
Up to the utmost snows;
Nor knows
He stands on these......
Or knowing does not care
Save to climb from these !
He passes too,
The heavy bird
Limping along
Ah, but his song
His song !

---